## ॥ श्रीनारायणाष्टकम् ॥

श्रीज्ञानेश्वरभारतीकुमुदिनीगंधस्य यः पुष्पलिड् ।
यश्चासीद्भवदावतापितजनव्रातस्य धाराधरः ॥
प्रारब्धेरितकर्मभिर्जनचयैर्यः पूरुषो भावितो ।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम् ॥ १ ॥
यं दूरीकृतविश्वभासतिमिरं कौतूहलोत्पादकम् ।
अद्वैताब्जविकासकं स्वमहसा मायाक्षपानाशकम् ॥
जीवालेरपि मोचकं रविनिभं प्राहुश्च यं कोविदा ।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम् ॥ २ ॥
निर्मोहेन सदा स्वभक्तनिखिलस्वश्रेयसेनोद्भवत्- ।
प्राणांतांबुभृदोघतीव्रमरुता स्वीयाऽशुभं नाशितम् ॥
वैराग्यामृतसेविनश्च सुहृदा येनैव कालो जितो ।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम् ॥ ३ ॥
अंतःशत्रुजिते निजात्मकलया नित्यं जगद्व्यापिने ।
विश्वाभ्रस्य विहायसाय सततं यस्मै भवध्वंसिने ॥
संस्कारात्प्रतनाद्धि केशवपदे भक्तिः सदाऽरोचत ।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम् ॥ ४ ॥
यस्माच्छात्रगणस्य संसृतिभवं दुःखं च मायाकृत- ।
व्यामोहो विलयं जगाम सपदि स्वांतस्य यो मोहकः ॥

यस्माच्छांतिदमादिपीडिततमाः क्रोधादयो निर्गताः।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम् ॥ ५ ॥
सच्छिष्यैर्गुरुचिंतनं मलयजं कृत्वेंद्रियाणां गणं ।
पुष्पाणि प्रतिघादिकांश्च षडरीन्धूपं मनो दीपकम् ॥
नैवेद्यं च मतिं विधाय विहितं यस्याऽनिशं पूजनम् ।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम् ॥ ६ ॥
अज्ञाहंमतिहारके भवभयान्नित्यं नृणां तारके ।
सर्वेषां सुखकारके जनमनस्संतापसंहारके ॥
उत्कर्षस्तमसश्च सत्त्वरजसोर्यस्मिन्विनष्टोऽभवत् ।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम् ॥ ७ ॥
भो भोः संसृतिदुःखकर्षितजनव्रातस्य पीडापह ।
भोः सौख्यप्रद शांतियुक्तमनसां निर्द्वंद्वतैकप्रिय ॥
पाह्यस्मानिति यो मुमुक्षुनिवहैर्ज्ञानाप्तये प्रार्थितो ।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम् ॥ ८ ॥
अज्ञानौघनिवारणात्तवपुषो भक्ते दयां कुर्वतः ।
प्राप्तज्ञानचकोरवृंदशशिनस्तस्य प्रशांतात्मनः ॥
संचक्रे शिवराम आहततनोश्चैतद्गुरोरष्टकम् ।
तेनैवाल्पधिया समर्पितमिदं श्रीसद्गुरोः पादयोः ॥ ९ ॥

इति श्रीगुरुनारायणाष्टकस्तोत्रं संपूर्णम् ॥

ब्रह्मीभूत श्रीनानामहाराज साखरे.



जन्म शक १७५०. समाधि शक १८२५.

चित्रशाळा प्रेस, पुणें.

श्रीनानामहाराज साखरे यांचे चिरंजीव,



हरिभक्तिपरायण विनायकबोवा साखरे.

चित्रशाळा प्रेस, पुणे.

# प्रस्तावना.

—:*:—

सर्व जगतांत दुःखसंबंधरहित संपूर्ण सुखांच्या ऐश्वर्यानें मंडित असा कोण आहे, असें जर आपण सूक्ष्म रीतीनें विचार करून पाहूं लागलों, तर तशा प्रकारचा प्राणी फार विरळा, किंबहुना नाहींच म्हटलें तरी चालेल. प्रत्येकाचे पाठीमागें कांहींना कांहीं तरी दुःख आहेच. कोणास पुत्र नाहीं, कोणाची बायको कुरूप, कोणाजवळ द्रव्य नाहीं, अशा प्रकारें कोणत्याना कोणत्या तरी कारणामुळें दुःख हें आहेच. एतावता, दुःखसंबंधरहित केवळ परमानंदाचा अनुभव कोणी घेत आहे असें सामान्य रीतीनें पहाणारास दिसत नाहीं; पण प्रत्येक प्राण्याची इच्छा तर तशी स्थिती आपणास असावी अशी आहे, व ती प्राप्त होण्याकरितां आपआपल्या बुद्धीनें ते लौकिक उपायही करीत असतात; परंतु लौकिकउपायेंकरून अत्यंत दुःखनाश होत नाहीं, व परमानंदाचा लाभही मिळत नाहीं. त्यास आचार्यद्वारां शास्त्रैकशरण होणें हाच उपाय आहे, ह्यावांचून दुसरा उपायच नाहीं. ही गोष्ट श्रुतीमध्यें अनेक ठिकाणीं सिद्ध केलेली आहे. पण त्या श्रुतीचे ठिकाणीं सर्व प्राण्यांस अधिकार नाहीं. कारण केवळ श्रुतिवाक्यावरूनच तत्त्वार्थ ध्यानांत येण्याची योग्यता सर्वांचे ठिकाणीं नाहीं. जसा शूद्र किंवा स्त्रिया ह्यांचे ठिकाणीं अज्ञानाधिक्य असल्यामुळें त्यांस श्रुतींचे ठिकाणीं अधिकार नाहीं, तसाच स्मृतिवाक्यांचे ठिकाणींही नाहीं. ही जरी गोष्ट खरी आहे, तरी शूद्रांस किंवा स्त्रियांस दुःखाचे अत्यंत निवृत्तीची आणि परमानंदप्राप्तीरूप मोक्षाची इच्छा नाहीं, असें मात्र नाहीं. सर्वांसच मोक्षाची इच्छा आहे. अशा सर्व जीवांची भगवान व्यास यांना करुणा येऊन सर्व वेदांचें सार अशी भगवद्गीता भारताच्या भीष्मपर्वामध्यें त्यांनीं ग्रथन केली. भारत हा ग्रंथ म्हणजे फार प्राचीन काळचा इतिहास आहे. त्यांत जागोजागीं भगवद्यश वर्णन केलेलें आहे, म्हणून पुण्यरूप आहे. फार काय सांगावें! वेदामध्यें जितका अर्थ प्रतिपादित आहे, तितका सर्व अर्थ व्यासांनीं ह्या इतिहासांत प्रतिपादन केला आहे, म्हणून यास पांचवा वेद असें श्रेष्ठांनीं म्हटलें आहे. ह्या इतिहासाचें श्रवण करण्यास सर्वांस अधिकार आहे. याच्या श्रवणापासून वर लिहिलेल्या स्वरूपाचें मोक्षरूप फल श्रवण करणारास अथवा चिंतन करणारास प्राप्त होतें. त्यांतही भाषेच्या अडचणीमुळें सर्वांचाच प्रवेश होत नाहीं; व थोडेंसें संस्कृत भाषेचें ज्ञान असलें तर त्यापासून उत्तान अर्थ कळेल, परंतु त्यांतील रहस्य कळणार नाहीं; ह्याकरितां भगवान विष्णूंनीं ज्ञानेश्वराचा अवतार धारण करून सर्व अनाथ जीवांचा उद्धार करण्याकरितां त्यावर श्रीभावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी ) नांवाचा टीकारूप ग्रंथ केला. प्राकृत भाषेंत भगवन्मनोगत व्यक्त करून दाखविणारा ज्ञानेश्वरीशिवाय दुसरा ग्रंथच नाहीं, असें म्हणण्यास कांहींएक धास्ती वाटत नाहीं. हें खुद्द श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं आपले ज्ञानेश्वरीचे १५ वे अध्यायांत अश्वत्थपदाचें व्याख्यान करतेवेळीं लिहिलें आहे. तसें तेरावे अध्यायांतही महाराजांनीं स्पष्ट सांगितलें आहे. असो; संस्कृत समजणारांसही ज्याप्रमाणें शंकराचार्यांचें भाष्य समजून घेण्यास परंपरागत सांप्रदायिकांकडे जावें लागतें; त्यावांचून स्वबुद्धीनें भाष्य पाहूं म्हटलें तर कांहींएक समजत नाहीं, त्याचप्रमाणें ज्ञानेश्वरी हा प्राकृत ग्रंथ आहे, म्हणून स्वबुद्धीनें पाहून कृतार्थ होऊं असें कोणी म्हणेल, तर तें अगदीं व्यर्थ आहे. तो ग्रंथही परंपरागत सांप्रदायिकांस शरण जाऊन त्यांचेपासून समजून घेतला पाहिजे, अथवा साक्षात् श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं तरी एकाद्यावर अनुग्रह केला पाहिजे. त्यापैकीं दुसरी गोष्ट अत्युत्कट पुण्याईवांचून होणार नाहीं; असे पुण्यसंपत्तिमान् पुरुष फार थोडे, अशा भाग्यवान पुरुषांपैकींच **श्रीनानामहाराज साखरे** हे होत. ह्यांची परंपरा अशीः—

सुमारें १५० वर्षांपूर्वी श्रीज्ञानेश्वरमहाराज ह्यांचे कृपेस पुणें येथील केसकर ह्यांचे वंशांतील श्रीअच्युत महाराज नांवाचे पुरुष पात्र झाले. जन्मांतरींच्या बहुत पुण्याईनें ह्या भाग्यवान् पुरुषास अशी इच्छा झाली कीं, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं आपलेवर कृपा करून ज्ञानेश्वरी ग्रंथ समजून द्यावा! ही इच्छा पूर्ण व्हावी म्हणून त्या थोर पुरुषानें श्रीक्षेत्र आळंदी येथें उपोषित राहून महाराजांचे समाधीपुढें ज्ञानेश्वरीचें पारायण करण्यास आरंभ करून

असा निश्चय केला कीं, ज्या दिवशीं महाराजांचा अनुग्रह होईल, त्याच दिवशीं महाराजांस नैवेद्य समर्पण करून पारणा करावयाची; नाहींपेक्षां अनुष्ठान करीत करीत प्राणत्याग करावयाचा ! निश्चयाचें बळ । तुका म्हणे तेंचि फळ ! ॥ श्रीअच्युतमहाराज ह्यांचा हा तीव्र निश्चय पाहून २७ वे दिवशीं रात्रीं श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं स्वप्नामध्यें दर्शन देऊन मस्तकावर वरदहस्त ठेविला, आणि सांगितलें कीं, आजपासून तूं जो ज्ञानेश्वरीचा अर्थ सांगशील तोच बरोबर असेल. अशा रीतीनें श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे कृपेस पात्र झालेले श्रीअच्युत महाराज परमानंदाचा अनुभव घेत घेत शेवटीं परमानंदरूप झाले. त्यांस एक कनिष्ठ बंधु शामराज महाराज म्हणून होते, त्यांजवर त्यांनीं अनुग्रह केला. असा जीवनन्मुक्तिसुखाचा अनुभव घेत असतां अनंत जीवांवर त्यांनीं अनुग्रह केला. त्यांतच पुणें येथील रहाणार व चिमाजीआप्पा ( पेशव्यांचे बंधु ) यांचे खासगी कारभारी **रामचंद्रपंत जोशी** यांजवरही त्यांनीं अनुग्रह केला, तो प्रकार असाः—

एके दिवशीं रात्रीं रामचंद्रपंत घोड्यावर बसून हिंडावयास निघाले असतां, येथील बुधवारांतील पासोड्या मारुतीचे देवळांत श्रीअच्युतमहाराज यांचें कीर्तन चालू होतें. तेथें क्षणभर उभे राहिले. श्रीअच्युतमहाराज यांची ज्ञानपूर्वक भक्ति, व निष्कपट वैराग्य पाहून, आणि अप्रतिम वक्तृत्व ऐकून दैवयोगानें त्यांस उपरति झाली त्यांचेजवळ २१ लाख रुपये रोख होते. पोटीं पुत्रसंतान वगैरे कांहीं नव्हतें. अशा स्थितींत त्यांची अशी खात्री झाली कीं, ह्यांचेशिवाय आपलें संसारदुःख कोणी निवारण करणार नाहीं. ते दुसरे दिवशीं सकाळींच येथील सदाशिव पेठेंतील हौदापलीकडे श्रीअच्युतमहाराज यांजकडे गेले, आणि हात जोडून ह्मणाले कीं, माझेवर अनुग्रह व्हावा, मी आपला शिष्य असून आपणास शरण आलों आहें. तेव्हां अच्युत महाराजांनीं सांगितलें कीं, "बाबा, तूं श्रीमंत आहेस, आम्ही गरीब आहों, अशा स्थितींत तुझें व आमचें जमावें कसें ? परमार्थाला द्रव्य फार प्रतिबंधक आहे !" असें श्रीअच्युत महाराजांचे मुखांतील वाक्य श्रवण करितांच त्यांनीं लागलीच २१ लाख रुपयांवर त्यांचे समक्ष उदक सोडलें, आणि बुधवारांतून मोरोबादादांचे हौदाचें पाणी आपल्या खांद्यावर कावडीनें त्यांचे येथें भरलें. तेव्हां, श्रीअच्युतमहाराज यांचें अंतःकरण सुप्रसन्न होऊन त्यांनीं त्यांस उपदेश देऊन त्यांचेकडून श्रीज्ञानेश्वरी ग्रंथ अध्ययन करविला. तसेंच २१ लाख रुपये ब्राह्मणभोजनांत खर्च कर म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें त्यांनीं ब्राह्मणभोजनांत त्या द्रव्याचा व्यय केला. हें ब्राह्मणभोजन करतेवेळीं पुणें येथें व श्रीक्षेत्र आळंदी येथें अशी स्थिति झाली कीं, गांवांत व्यापाऱ्यांचे दुकानांत तूप व साखर मिळेनाशी झाली. तेव्हांपासून लोकांत त्यांचें नांव **साखरेबोवा** असें पडलें. साखरेबोवा हे पुणें येथें शनवारांतील मारुतीचे देवळासमोर आंग्रे यांचा वाडा आहे तेथें रहात असत. त्यांनीं गोपालकृष्णाची मूर्ति व गोपालकृष्ण महाराजांच्या पादुका यांची स्थापना ज्येष्ठ शु० १३ रोजीं केली. ते असतांना वाढदिवसाचा उत्साह ज्येष्ठ शु० १३ पासून १५ पावेतों तीन दिवस करीत. तसेंच श्रावणमासांत श्रावण वद्य १ पासून वद्य १० पावेतों गोकुलअष्टमीचा मोठा उत्साह करीत असत. पुढें पुण्यांतील त्यांचे भाऊबंदांपैकीं गोविंदपंत जोशी यांचे चार पुत्र केशवराव, हरीपंततात्या, विनायकराव व पंढरीनाथआबा हे चौघेही त्यांचे शिष्य झाले. पंढरीनाथआबा (हे जन्मभर ब्रह्मचारी होते ) ह्या चौघांची गृहस्थिति फार गरीबीची होती. तथापि त्यांची साखरेबुवांच्या ठिकाणीं असलेली गुरुभक्ति मोठी अप्रतिम होती. ज्या वेळीं साखरेबोवांच्या मनांत संन्यास करावयाचें आलें, त्या वेळीं हें संस्थान कोणाचे स्वाधीन करावें, असा प्रश्न सहजच त्यांच्या व त्यांचे हजार बाराशें शिष्य होते त्यांच्या मनांत आला. त्या मंडळींत श्रीमान् लोक बरेच होते, त्यांनीं त्यांचेजवळ संस्थान आमचेकडे द्यावें ह्मणून प्रार्थना केली, परंतु आह्मी सर्वांचे म्हणण्याचा विचार करून काय करावयाचें तें करूं, असें ते सांगत असत. शेवटीं त्यांनीं सर्वांस बोलावून असें सांगितलें कीं, जरी आमचेजवळ श्रीमान् लोकांनीं देवस्थानची मागणी केली, तरी आमचे मनोगताप्रमाणें देवस्थान चालविण्याचें हरीपंततात्या व पंढरीनाथआबा ह्यांचेशिवाय दुसऱ्याचे हातून होणार नाहीं; जरी ते गरीब आहेत, तरी भगवद्भक्ति म्हणजे काय हें त्यांस माहीत आहे. असें सर्वांसमक्ष सांगून देवस्थान त्यांचे स्वाधीन केलें. तेव्हांपासून ह्या जोशांचे घराण्यास **साखरे** असें नांव पडलें, तें अद्याप चालू आहे. पुढें ते संन्यस्त झाले त्या वेळीं त्या आश्रमांतील त्यांचें नांव ब्रह्मानंद स्वामी असें होतें.

ते पुणें येथें समाधिस्थ झाले, तेव्हां त्यांचे पट्टशिष्य जे चौघे जोशी त्यांनीं त्यांचे इच्छेप्रमाणें व निष्ठेप्रमाणें

त्यांची समाधि श्रीक्षेत्र आळंदी येथें सिद्धबेटांत त्यांस पुण्याहून नेऊन दिली, व पुढें ते त्यांची पुण्यतिथि करूं लागले. ह्या बंधुचतुष्टयांची आपले गुरूंवर इतकी श्रद्धा असे कीं, आपले गुरु ज्या ठिकाणीं रहात असत, त्या ठिकाणचा कोणी गडी, मोलकरीण, माणूस, कारकून कोणीही त्यांचेकडे येवो, हे सर्व बंधु त्यास वंदन करीत असत. इतकेंच नव्हे, तर साखरेबोवा समाधिस्थ झाल्यास सुमारें १०० वर्षें झालीं व त्यांचे संस्थानचा उत्साह अद्याप श्रीनानामहाराज जोशी साखरे यांचे वंशाकडे चालू आहे, तरीही पण आंम्रे ह्यांच्या वाड्यांतील जानवीं काढण्यास बसणारे तेलंगी ह्यांना पंढरीनाथ महाराजांनीं याही असें नांव दिलें; त्याप्रमाणें श्रावणमासाचा उत्साह सुरू झाला कीं, पहिले दिवशीं त्यांना भोजनास आमंत्रण करावयाचें ही गोष्ट अद्यापपावेतों साखरे यांचे घरीं चालू आहे. जोशीबंधुचतुष्टय यांचा "देह जावो अथवा राहो। पांडुरंगीं दृढ भावो ॥ अन्न आच्छादन। हें तो प्रारब्धाधीन" इत्यादि वचनांवर पूर्ण निश्चय असल्यामुळें उपजीविकेच्या साधनांत कोणीच प्रवृत्त झालें नाहीं. त्या चौघांपैकीं हरीपंत तात्यांस तीन पुत्र व चार कन्या असा परिवार होता. तथापि ते प्रपंचाकडे कधीं ढुंकून देखील बघत नसत. उपरामस्थितींत ते नेहमीं असत. कोणी अंतरंगी पुरुष आलाच, तर त्याच्याशीं अध्यात्मज्ञानाचीच गोष्ट बोलावयाची, ह्यामुळें त्यांचे ठिकाणीं सर्व बंधूंची गुरुबुद्धी असे. त्यांच्या परिवाराचे संगोपनाची खटपट आपण स्वतः ब्रह्मचारी असतां खुद्द पंढरीनाथआबाच करीत असत. हीं मुलें लहान असतांच हरीपंततात्या हे वारले; पुढें पंढरीनाथआबा यांनीं ह्या मुलांचा सांभाळ करून, गुरूकडून भाग्यानें प्राप्त झालेलें श्रीगोपालकृष्णाचें संस्थान व गुरूंची कार्तिक शुद्ध ९ ची साखरेबुवांची पुण्यतिथि हीं कृत्यें ते त्यांचे हातून करवूं लागले, त्याचप्रमाणें श्रीज्ञानेश्वरी व अमृतानुभव ह्या ग्रंथांचेंही त्यांनीं त्यांचेकडून अध्ययन करविलें. श्रीहरीपंततात्यांचे मुलांपैकीं **रामभाऊ** व **नाना** हेच काय ते अध्ययन करण्याचे वयांत होते; आणि ते त्यांचे शिष्य होते. तिसरे **दामुअण्णा** हे त्या वेळीं लहान होते. त्यांपैकीं पंढरीनाथ महाराजांचे मनाप्रमाणें श्रीज्ञानेश्वरीचें अध्ययन **श्रीनानामहाराज** ह्यांनीं केलें. साखरेबोवांचे देवस्थानचे संबंधानें गुरुवारीं व एकादशीस रात्रौ जागर व पहांटेस पंचपदी व रोज नित्य पंचपदी असा क्रम आहे; जागरास साखरेबोवांचे शिष्य व पुढें जोशी ह्यांचे झालेले शिष्य येत असत, त्यांचेपुढें पंढरीनाथ महाराजांनीं **श्रीनानामहाराज** ह्यांचेकडून ज्ञानेश्वरी सांगवावी; अशा रीतीनें **श्रीनानामहाराज** ह्यांचा सुमारें दहा बारा वर्षें श्रीज्ञानेश्वरी ग्रंथावर असा कांहीं अभ्यास झाला कीं, सर्व ज्ञानेश्वरी ग्रंथ त्यांस मुखोद्गत झाला. ते स्वप्नांत जरी बरळले तरी ज्ञानेश्वरीच्या ओंवीचा अर्थच बरळत, इतकी त्यांची त्या ग्रंथांत तयारी झाली. गुरुकृपेनें त्यांचे वक्तृत्वास इतका कांहीं मोहकपणा आला होता कीं, कोणीही सहज जरी श्रीनानामहाराजांचे मुखांतून ज्ञानेश्वरीच्या चार ओंव्या ऐकिल्या तरी त्याची चित्तवृत्ति रंगून गेल्याशिवाय रहात नसे. ह्या अप्रतिम गुणामुळें, वडील व चुलते वारल्यानंतर ह्या संस्थानचे पारमार्थिक कृत्याचा सर्व भार **श्रीनानामहाराजांवरच** पडला. पूर्वीं वडिलांनीं कीर्ति संपादन केली होतीच. त्यांतही **श्रीनानामहाराजांचे** अंगचे गुणानें हीं सर्व कृत्यें मोठ्या व्यवस्थेनें चाललीं. **श्रीनानामहाराज** यांनीं आपलें सर्व आयुष्य श्रीज्ञानेश्वरीचे अध्ययनांत व अध्यापनांत घालविलें. कोणी कोणत्याही वेळीं कोणतेही जातीचा कोणच्याही अधिकाराचा मनुष्य त्यांच्याकडे जावो, त्याला आतां मी सांगत नाहीं, असें त्यांनीं कधींही कोणास म्हटलें नाहीं. ते असत तोंपर्यंत त्यांचे घरीं रोज ज्ञानेश्वरीचा पाठ चालत असे.

महत्पुण्याईनें माझा साखरे ह्यांचे कुलांत **श्रीनानामहाराजांचे** पोटीं जन्म झाल्यामुळें **श्रीनानामहाराज** समाधिस्थ झाल्यावर ज्ञानेश्वरीचा पाठ सांगणें वगैरे संप्रदायिक कृत्यें चालविण्याचें काम माझी तशी योग्यता नसतांनाही ओघानें मजवर येऊन पडलें व तें कांहीं दिवस मी यथामति चालविलें. हल्लीं तीं कृत्यें माझे धाकटे बंधु चि० वासुदेवराव व पुरुषोत्तमबोवा चालवीत आहेत. **श्रीनानामहाराज** असतांना ज्ञानेश्वरीचा संप्रदाय शुद्ध अर्थ लोकोपयोगाकरितां प्रसिद्ध करावा, असें कोल्हापुरचे कै० रा० विश्वनाथपंत भावे वकील, व पुण्याचे कै० रा० कृष्णाजीपंत भिडे ह्यांचे मनांत आलें. उभयतां गृहस्थांनीं ग्रंथ प्रसिद्ध करण्याकरितां द्रव्यप्राप्तीची इच्छा यत्किंचितही न ठेवितां अपरिमित श्रम केले, ही गोष्ट सर्वथैव खरी; परंतु त्यांना स्वतः शास्त्राची माहिती नसल्यामुळें व वेदां-

तासारखा गहन विषय एकदां ऐकून ग्रंथ लिहिण्यांत जेवढे दोष होणें स्वाभाविक आहे, तेवढे झालेही आहेत. परंतु **श्रीनानामहाराजांचे** नांवावर तो ग्रंथ रा० भिडे ह्यांनीं प्रसिद्ध केला आणि त्यांत अर्थाच्या चुका तर प्रत्यक्ष दृष्टीस पडतात, हें चांगलें नव्हे; असें मला वाटल्यावरून व आपल्या बुद्धीप्रमाणें वडिलांची सेवा करावी म्हणून मी आज ही ज्ञानेश्वरीचे अर्थाची प्रत तयार करून प्रसिद्ध करीत आहें.

अलीकडे रा० राजवाडे ह्यांना मिळालेली फार जुनी व जिला तेच अत्यंत शुद्ध असें म्हणतात, अशी एक नुसत्या संहितेची प्रत त्यांनीं प्रसिद्ध केली. प्रसिद्ध करतांना तिची प्रस्तावना म्हणून एक लांबलचक लेख प्रसिद्ध करून त्यांत बाकीच्या सर्व ज्ञानेश्वरींच्या प्रती त्यांनीं आपल्या कोत्या बुद्धीनें कवडीमाल ठरविल्या आहेत. रा० भिडे ह्यांनीं जो अर्थ प्रसिद्ध केला आहे तो अथपासून इतीपर्यंत चुकलेला आहे, असें विधान करून त्याचे सत्यतेकरितां पहिल्याच ओंवीचा अर्थ त्यांनीं देऊन नंतर त्याचा यथार्थ अर्थ काय तो देण्यांत त्यांनीं आपल्या बुद्धीचे तारेच तोडले आहेत. वास्तविक भिडे यांनीं जो अर्थ प्रसिद्ध केला आहे तो बरोबर आहे. रा० राजवाडे ह्यांनीं जो अर्थ केला आहे तो सर्वथैव चुकीचा आहे. त्या अर्थावरून वेदान्तशास्त्रज्ञ पुरुषास असें वाटेल कीं, वेदांतशास्त्राची रा० राजवाडे ह्यांस यत्किंचितही अक्कल नसून नुसते जुने ग्रंथ शोधणें, किंवा व्याकरणाची काथ्याकूट करणें, ह्याच्या पलीकडे अर्थाच्या भानगडींत पडणें, म्हणजे चित्राची परीक्षा करतेवेळीं चांभारानें अंगरख्यांतील दोष सांगण्याइतकें हास्यास्पद आहे. बरें, जी प्रत त्यांनीं प्रसिद्ध केली आहे ती जुनी आहे कीं नाहीं हा वाद सोडून देऊन, ती शुद्ध आहे कीं नाहीं असें पाहूं लागलों; तेव्हां तिच्यांतही अनेक पाठ अशुद्ध आहेत असें दिसून आलें, व ज्या ओंव्या अवश्य असल्याच पाहिजेत असें राजवाडे ह्यांसही कबूल करावें लागेल, अशा कांहीं ओंव्या राजवाडे यांच्या प्रतींत मुळींच नाहींत. असें आढळून आलें. पहिले बारा अध्याय मीं तपासून पाहिले, त्यांत अनंत अशुद्ध पाठ सांपडले आहेत व ते मीं टिपून ठेविले आहेत. शिवाय रा० राजवाडे ह्यांस ह्या अमुक अमुक ओंव्या तुमच्या प्रतींत नाहींत हें काय ? असें विचारिलें असतां त्याचें कारण आम्हांस सांगतां येत नाहीं, असें त्यांनीं उत्तर दिलें! ओंवीचे अर्थासंबंधानें किंवा पाठाचे शुद्धतेबद्दल वाद करण्याची राजवाडे ह्यांची इच्छा असल्यास माझी तयारी आहे. लेखी वाद करण्यानें हें प्रकरण लौकर संपणार नाहीं असें माझें मत आहे. तथापि बडोद्याचे रा. चिपळूणकर हे ' यक्षानुरुपोहि-बलिः ' ह्या न्यायानें राजवाडे ह्यांच्या प्रस्तावनेचें खंडन करीतच आहेत. अस्सल प्रत सांपडेपर्यंत अमुक एक प्रत अशुद्ध आहे किंवा कुचकामाची आहे, व अमुक एक शुद्ध आहे व ती ग्राह्य आहे हें म्हणणें वास्तविक धाडसाचें व अयोग्य असलें तरी आग्रहशिरोमणी व गालिप्रदानपटु राजवाड्यांसच तें शोभतें.

ज्ञानेश्वरी ग्रंथाचा श्रद्धाळू जन नेहमीं पाठ करितात, पाठ करितांना दृष्टीस त्रास न होतां सुलभ जावें म्हणून ज्ञानेश्वरीच्या ओंव्या डाव्या पृष्ठावर मोठ्या अक्षरांत घातल्या आहेत. याच पानांत वाचकांच्या सोयीकरितां टीपा द्यावयाच्या, परंतु टीपा देणें म्हणजे नुसत्या शब्दास प्रतिशब्द देण्यानें मूळ ओंव्यांतील शब्दाचा अर्थबोध चांगल्या प्रकारें होत नाहीं; कांहीं कांहीं शब्दांचा अर्थ नुसता प्रतिशब्द न देतां, वाक्यानेंच द्यावयास पाहिजे. असें करणें स्थलसंकोचामुळें साधत नाहीं. शिवाय उजव्या बाजूस ओंव्यांचा साग्र अर्थ समोरच असल्यामुळें जिज्ञासु वाचकांस मूळ ओंवींतील शब्दार्थ थोडा विचार केल्यास समजण्यासारखा आहे. यामुळें टीपा दिल्या नाहींत. ज्ञानेश्वरींतील शब्दांचा विशेष प्रकारचा कोश सवडीप्रमाणें निराळाच प्रसिद्ध करण्याचा माझा विचार आहे. ह्या प्रतींत आरंभीं थोडीशी कौरवपांडवांची माहिती देऊन, गीताशास्त्र केव्हां उत्पन्न झालें व तें सर्व जीवांना आदरणीय कां, ह्यासंबंधीं उपक्रम करून शेवटीं गीताशास्त्राचें तात्पर्य कशांत आहे, हें ज्ञानेश्वरमहाराजांच्या ओंव्यांनीं थोडक्यांत उपसंहार करून सांगितलें आहे.

मी जी प्रत आज प्रसिद्ध करीत आहें, त्यापासून लोकांस शास्त्रसंस्कार उत्पन्न होईल ह्यापेक्षां जास्त कांहीं होणार नाहीं; किंवा ज्यांनीं ही कोणा विद्वानाजवळ वांचली असेल त्यास चिंतनाला उपयोगी होईल; ह्या दोन उपयोगाशिवाय यथार्थ रहस्य, ह्याच काय पण गुरुकृपेशिवाय कोणत्याही ग्रंथानें होणार नाहीं. तथापि वर सांगितलेल्या कारणाकरितां मीं ही प्रत प्रसिद्ध केली आहे. ह्यांत कांहीं नजरचुकीनें दोष झाले नसतील, असें मी म्हणत नाहीं, तथापि विद्वान् लोक ते दोष मला कळवून गुण मात्र ग्रहण करोत, अशी सर्व जीवांना बुद्धिदात्या नारायणाची प्रार्थना करून ही प्रस्तावना संपवितों.

**विनायक नारायण जोशी साखरे.**



# नमः परमात्मने ।



## मंगलम् ।

पार्थाय प्रतिबोधितां भगवता नारायणेन स्वयं
व्यासेन ग्रथितां पुराणमुनिना मध्येमहाभारतम् ।
अद्वैतामृतवर्षिणीं भगवतीमष्टादशाध्यायिनी-
मंब त्वामनुसंदधामि भगवद्गीते भवद्वेषिणीम् ॥ १ ॥
प्रपन्नपारिजाताय तोत्रवेत्रैकपाणये ।
ज्ञानमुद्राय कृष्णाय गीतामृतदुहे नमः ॥ २ ॥
सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः ।
पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥ ३ ॥
वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ।
देवकीपरमानंदं कृष्णं वंदे जगद्गुरुम् ॥ ४ ॥

---

# उपक्रम.

## गीताशास्त्र.

### कौरव-पांडवांचें पूर्ववृत्त.

पूर्वी भरत कुलामध्यें **शंतनु** नांवाचा राजा राज्य करीत असतां त्यास **गंगा** नांवाच्या स्वर्गस्थ देवीचें दर्शन झालें. एकमेकांवर प्रेम जडून पुढें विवाहही झाला. गंगा ही स्वर्गांतील नदी असतां शापामुळें ती या मृत्यूलोकांत आली होती. त्यांचें लग्न झालें खरें, परंतु त्यावेळीं असें ठरलें कीं, आपणांस होणारे संततीवर फक्त गंगेचाच हक्क असून तिचे मताविरुद्ध राजा वागल्यास तिनें राजास सोडून जावें. पुढें गंगेस सात पुत्र झाले. ते सर्व तिनें नदींत सोडून दिले, त्यामुळें राजास फार खेद झाला. परंतु गंगेचें अप्रतीम सौंदर्य व लग्नाचे वेळेचा करार या दोन कारणानें त्यास कांहीं बोलतां येईना. पुढें आठवा मुलगा झाला; त्यासही जेव्हां गंगा पाण्यांत सोडून देऊं लागली, तेव्हां राजाचा शोक अनिवार होऊन त्यानें "हा तरी मुलगा पाण्यांत टाकूं नको; माझ्यानें पुत्रशोक सहन होत नाहीं" अशी तिची करुणास्वरानें विनंती केली. त्यावरून गंगेनें पुत्रास मारिलें नाहीं, परंतु लग्नाचे वेळचा करार राजानें मोडला म्हणून ती स्वतः निघून गेली. तशा प्रकारचा तिला उश्शापच होता. असो. ह्या आठव्या पुत्राचें नांव देवव्रत होय. ह्यासच गांगेय म्हणतात. ह्यांनीं आपल्या गुणानें सर्व प्रजाजनांचीं मनें आकर्षण करून घेतलीं. त्याप्रमाणें राजाचेंही प्रेम त्याजवर होतें, म्हणून त्यानें लौकरच देवव्रतास युवराज पदवी देऊन आपण मृगया करूं लागला. पुढें एके दिवशीं **सत्यवती** नामक एक कोळ्याची कुलीन परंतु गरीब मुलगी त्याचे दृष्टीस पडली. गंगेच्या विरहदुःखामुळें आपण सत्यवतीचें पाणीग्रहण करावें अशी त्यास इच्छा झाली, व ती त्यानें तिचे बापास कळविली. माझ्या मुलीस होणारे पुत्रासच सर्व राज्य देईन, असें कबूल असल्यास सत्यवती देतों, असें बापानें सांगितलें. देवव्रतावरील प्रेमामुळें राजास तें कबूल करवेना आणि सत्यवतीवरील प्रेमही कमी होईना, ह्यामुळें राजा झुरणीस लागला. देवव्रतास ही हकीगत कर्णोपकर्णी समजली. आपल्यामुळें पित्याचे मनोरथ पूर्ण न होऊन त्यास कष्ट होतात हें चांगलें नाहीं, असें त्यास वाटून तो कोळ्याकडे गेला. कोळ्यानें आपली अट देवव्रतास कळविली, ती त्यानें कबूल केली. तथापि कोळ्यास देवव्रतानें जर आपला राज्यावरील हक्क सोडला नाहीं तर सत्यवतीचे मुलास राज्य मिळणार नाहीं, अशी शंका येऊन त्यानें ती देवव्रतास स्पष्ट कळविली. त्यावर देवव्रतानें उत्तर दिलें कीं, मी पूर्वींच राजास आपली प्रतिज्ञा कळविली आहे ती अशीः—

राज्यं तावत्पूर्वमेव मया त्यक्तं नराधिपाः ॥
अपत्य हेतो रपि च करिष्येऽद्य विनिश्चयं ॥
अद्य प्रभृतिमे दाश ब्रह्मचर्यं भविष्यति ॥

राज्यावरील माझा हक्क मी आतांच सोडून दिला आहे. कदाचित् माझ्या प्रजेपासून तुम्हांस त्रास होईल, असें तुम्हांस वाटत असेल तर "मी आजपासून आमरणांत ब्रह्मचर्यव्रतानें राहीन, हें तुम्हांस प्रतिज्ञापूर्वक सांगतों." हें ऐकून कोळ्यानें सत्यवती शंतनूस देण्याचें कबूल केलें. देवव्रताचें हें पित्यावरील प्रेम व पित्याचे सुखासाठीं राज्यवैभव व स्त्रीसुख आमरणांत भोगावयाचें नाहीं, अशा अर्थाची त्यानें केलेली घोर प्रतिज्ञा ऐकून आकाशांतून देवांनीं त्याजवर पुष्पवृष्टी केली आणि "भिष्मोऽयं" ( हा घोर प्रतिज्ञा करणारा भीष्म आहे ) अशी आकाशवाणी झाली. तेव्हांपासून त्याचें नांव भीष्म असें पडलें.

भीष्माचें हें कृत्य पाहून शंतनूस फार संतोष झाला. पुढें सत्यवतीपासून शंतनूस चित्रांगद व विचित्रवीर्य असे दोन पुत्र झाले. पुढें शंतनू मरण पावला. नंतर भिष्मांनीं चित्रांगदास राज्यावर बसविलें. तोही एका युद्धांत मृत झाला. नंतर अल्पवयी विचित्रवीर्यास गादीवर बसवून त्याचे नांवानें राज्यकारभार चालविला. पुढें काशी राजाच्या अंबा, अंबिका व अंबालिका ह्या तीन मुलींपैकीं अंबिका व अंबालिका ह्या दोन मुलींचा विचित्रवीर्याबरोबर विवाह केला.

शंतनू राजास गंगेपासून झालेला मुलगा भीष्म, पण त्यानें आजन्म ब्रह्मचारी रहाण्याची प्रतिज्ञा केली, व आपले दोन्ही पुत्र जाऊन त्यांच्या अंबिका व अंबालिका ह्या दोन विधवा राहिल्या, हें पाहून सत्यवतीस अत्यंत दुःख झालें. नंतर तिनें भीष्मास त्या सुनांचे ठिकाणीं नियोगानें पुत्रोत्पत्ती कर, किंवा स्वतः राज्याभिषेक करून घेऊन व विवाह करून आपलें भारत कूळ समूळ नष्ट होणार नाहीं, अशी तजवीज कर असें सांगितलें, व त्यास दुसऱ्या आप्तइष्टांनीं संमतीही दिली. परंतु आपली प्रतिज्ञा खरी करण्यासाठीं राजलक्ष्मी व स्त्रीसुख हीं त्यानें लाथेनें झुगारून दिलीं. केवढी सत्यप्रियता ही ! त्यांनीं सत्यवतीला एकच सांगितलें कीं, " सत्याच्युतिः क्षत्रियस्य न धर्मेषु प्रशस्यते " क्षत्रियानें कसल्याही प्रसंगीं सत्यभ्रष्ट होऊं नये, असें धर्मशास्त्र आहे. ह्या राज्याची काय किंमत आहे, परंतु त्रैलोक्याच्या राज्यसुखाकरितांही मी सत्य कधींही सोडणार नाहीं. आतां कुळाचें निसंतान होण्याचा दुर्धर प्रसंग आला असतां वेदवेत्त्या तपोनिष्ठ ब्राम्हणांकडून नियोगानें पुत्रोत्पत्ती करविण्याची क्षत्रियांना शास्त्राची आज्ञा आहे. पाहिजे तसें कर, असें सांगितल्यावरून सत्यवतीस आपण कोळ्याचे घरीं असतांना पराशरापासून व्यास नामक पुत्र झाल्याची हकीगत तिनें भीष्मास सांगून, त्याची योजना करण्याचें उभयतांचे मतानें ठरलें. लागलीच सत्यवतीनें व्यासांचें स्मरण केलें व व्यास तेथें आले. तिनें व्यासांना स्मरण करण्याचें कारण सांगितलें. व्यासांनीं त्या स्त्रियांस एक वर्ष व्रतस्थ रहाण्यास सांगितलें. परंतु इतका काल वाट पहाण्यास सत्यवती कबूल होईना. तेव्हां व्यासांनीं " ह्या राजकन्या जर माझें हें असलें वेडेंविद्रें रूप, हा वेष व ही माझ्या शरीराची दुर्गंधी सहन करतील तर मी आतांच तुझें मनोरथ पूर्ण करतों असें सांगितलें. नंतर सत्यवतीनें दोघी सुनांची मोठ्या कष्टानें व मिनतवारीनें संमत्ती मिळविली. योग्य वेळीं थोरली सून अंबिका ऋतुस्नात झाल्यावर आपल्याकडे भीष्म येणार असें समजून विचार करीत बसली. इतक्यांत कृष्णद्वैपायन एकदम प्राप्त झाले. त्यांचें तें रूप, पिंगट जटा, वाढलेली दाढी, व लाल डोळे पाहून अंबिकेनें आपले डोळे झांकले, ते व्यास तेथून निघून जाईपर्यंत उघडले नाहींत. त्यामुळें तिला

मंत्र देऊन असा वर दिला होता कीं, ह्या मंत्राच्या जपानें तूं ज्या ज्या देवांस बोलावशील ते तुला दर्शन देऊन त्यांचेपासून पुत्र होतील, त्या मंत्राचा पाहिजे तर उपयोग कर. कुंतीच्या ह्या ह्मणण्यास पांडूनें रुकार दिल्यावर तिनें प्रथम यमधर्मास बोलाविल्यावरोबर त्यांनीं दर्शन दिलें, व त्यांचेपासून तिला एक पुत्र जाला, त्याचें नांव **धर्म.** पुढें बलानें जेष्ठ असा पुत्र व्हावा, असें पांडूस वाटल्यावरून तिनें वायूस बोलाविलें. त्यापासून कुंतीस पुत्र जाहला त्याचे नांव **भीम.** नंतर इंद्रापासून अर्जुन असे तीन मुलगे उत्पन्न झाले. तिकडे हस्तनापुरींत धृतराष्ट्रास शंभर पुत्र व एक कन्या झाली हें पाहून माद्रीस फार वाईट वाटलें. नंतर पांडूचे आज्ञेवरून कुंतीनें एक मंत्र माद्रीस शिकविला. तो जपून माद्रीनें अश्विनी कुमारास बोलाविलें. त्यांचेपासून माद्रीस नकूळ व सहदेव असे दोन पुत्र जाहले, ह्यांसच पांडव असें ह्मणतात, व धृतराष्ट्राचे पुत्रांस कौरव असें ह्मणतात.

### कौरव-पांडवांमध्यें युद्धाचा प्रसंग येण्याचीं कारणें.

कर्म बलवान् आहे, तें कांहीं खोटें नाहीं. ऋषींचा तसा शाप झाला असतांही पांडूस माद्रीबरोबर रममाण होण्याची इच्छा झाली. माद्री निषेध करीत असतांही तो तिचा उपभोग घेऊं लागल्याबरोबर मृत झाला, नंतर माद्रीनें आपले दोघे मुलगे नकूळ व सहदेव कुंतीचे स्वाधीन करून आपण पतीबरोबर सहगमन केलें. पुढें कुंती व तिचे पांच मुलगे तेथील ऋषि मंडळींनीं हस्तनापुरास आणून पावते केले. तेव्हांपासून कौरव व पांडव एकत्र राहूं लागले. त्यांचा विद्याभ्यास भीष्मांनीं यथासांग करविला. त्यांचे प्रथम गुरु कृपाचार्य होते. नंतर धनुर्विद्येमध्यें पारंगत अशी ज्यांची ख्याति अशा **द्रोणाचार्यांनीं** कौरव पांडवांस युद्धकलेंत निष्णात केलें. तथापि पांडवांची आणि त्यांतही विशेषतः भीमार्जुनांची विलक्षण ग्राहकशक्ती पाहून द्रोणाचार्यांनीं धनुर्वेदाचें रहस्य त्यांस सांगितलें. पांडवांचें हें युद्धप्राविण्य पाहून कौरवांचे मनांत मत्सरबुद्धी उत्पन्न झाली. येथून कौरव-पांडवांमध्यें द्वेष उत्पन्न होण्यास आरंभ झाला. पंडूचीही थोडींच, परंतु सद्गुणी मुलें आणि **भीष्म व धृतराष्ट्र** ह्यांचेशिवाय सर्व वडील माणसांचे प्रीतीस पात्र झालीं. ह्यामुळें दिवसेंदिवस ज्यास्त द्वेष वाढूं लागला. शेवटीं पांडवांस राज्य द्यावें लागेल, निदान त्यांनीं अर्धा वांटा मागितल्यास तो तरी द्यावा लागेल, ही भिती कौरवांच्या मनांत उत्पन्न झाली, व तिला शकुनी मामांनीं जास्त भर घालून पांडवांचा नाश करावा; अशी सल्ला त्यांस दिली. ती सर्वानुमतें कायम झाल्यावर कौरवांनीं त्यांच्या नाशाचे पुष्कळ प्रयत्न केले. भीमास विष घातलें, पांडवांचें रहाण्याचे ठिकाणास आग लाविली, भीमास पाण्यांत बुडविण्याचा प्रयत्न तर केलाच, पांडूनें आपल्या सामर्थ्यानें अपार संपत्ति मिळविली. त्यामुळें कौरवांचे मनांत फारच खुपूं लागलें. ती त्याची संपत्ति हरण करावी या हेतूनें धर्मास द्यूत खेळण्यास बोलाविलें व लबाडीनें त्याची सर्व संपत्ति हिरावून घेतली, व त्याच प्रसंगांत त्याची महापतिव्रता व महासाध्वी द्रौपदी हिचा भर सभेंत अपमान केला आणि त्या द्यूताचे अटींत साधुवृत्तीचे पांडवांस १२ वर्षें वनवासालाही पाठविलें. एक वर्ष अज्ञातवासही सोसावयास लाविलें. असा पांडवांचा कौरव छल करीत असतांही प्रसंगविशेषीं पांडवांनीं कौरवांस साह्यही केलें. ह्यावरून घेण्यासारखी गोष्ट ही कीं,

कोणच्याही प्रसंगांत आपलें कर्तव्य काय आहे, हें कोणीही विसरूं नये. अशा रीतीनें दुःखभोग भोगून पांडव मुक्त झाल्यानंतर पांडवांनीं राज्यांतील आपला अर्धा वांटा मागितला. कौरवांचे मनांत त्यांना कांहींएक देऊं नये, असें होतें. म्हणून त्यांनीं अर्धा भाग देण्यास साफ नाकारलें. धर्म फार शांत होता, बाकीचे बंधु धर्माचे आज्ञेंत वागत असत. धर्माचे आज्ञेबाहेर जाण्याचें त्यांचें धैर्यच होत नसे. हा त्या वेळेच्या कालाचा महिमा आहे. हल्लींचे काळांत वडील बंधूचे आज्ञेंत वागण्याचें धैर्यच होत नाहीं, असो. धर्मांनीं कलहाचा प्रसंग येऊं नये, म्हणून वडिलार्जित मिळकतीपैकीं निदान पांच जणांस पांच गांव दिले तरी आम्ही संतुष्ट राहूं, असा दुर्योधनास निरोप पाठविला. आणि **भीष्म, द्रोण** व **विदुर** ह्या सर्वांनीं कौरव आणि त्यांचे मंत्री **शकुनीमामा** ( हे कौरवांस चिथाऊन देणारे ) अद्वितीय धनुर्धर आणि पांडवांशिवाय इतर सर्व लोकांशीं मोठ्या उदारवृत्तीनें वागणारा **कर्ण** ह्यांचें मन वळविण्याची खटपट केली, परंतु ती व्यर्थ गेली. आंधळ्या धृतराष्ट्राची न्यायानें वागावें अशी इच्छा खरी, परंतु पुत्रमोह आडवा आल्यामुळें ती मंद होऊन गेली होती. त्या मंदवृत्तीनें दुर्योधनास उपदेश केला, परंतु दुर्योधनानें किंवा त्याच्या मंत्र्यांनीं कोणाचेंही ऐकलें नाहीं. ह्याप्रमाणें सामाचे उपाय सर्व थकले. प्रत्यक्ष भगवान **श्रीकृष्ण**ही साम करण्यास गेले, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. आयुष्य संपण्याचे वेळीं अश्विनीकुमारांनीं येऊन त्रैलोक्यचिंतामणीची जरी मात्रा दिली, तरी ती सुद्धां जशी व्यर्थ जाते, त्याप्रमाणें जन्मास आल्याबरोबर गाढवासारखें रडणारा; व सर्व कुळांचे नाशाकरितांच ज्याचा अवतार, त्यास साक्षात् भगवान येऊन जरी उपदेश करून गेले, तरी तो कसा पटणार? असो. कोणच्याही उपायानें हा तंटा मिटत नाहीं, असें पाहून युद्ध करण्याविषयीं अत्यंत उत्सुक असे आपले बंधूस धर्मानें युद्ध करण्याची अगदीं निरुपायानें परवानगी दिली. राज्यांतील आपला वांटा मिळण्याकरितां व आपत्कालमध्यें सत्तेच्या जोरावर आपल्या धर्मपत्नीचा सर्व पांडवांच्या तोंडाला काळीमा लागेल अशीं कृत्यें करणाऱ्या दुष्ट कौरवांचा उत्तम प्रकारें सूड उगवावा, अशा हेतूनें पांडव युद्धास तयार झाले, कौरव तयार होतेच. दोन्ही पक्ष युद्धास सिद्ध झाले. त्यांत कौरवांचें सैन्य ११ अक्षौहिणी होतें आणि पांडवांचें ७ अक्षौहिणी होतें. एकंदर कौरव पांडवांचे युद्धांत १८ अक्षौहिणी सैन्य होतें.

कुरुक्षेत्रांत उभयतांचीं सैन्यें जाऊन दाखल झालीं. आतां युद्धास आरंभ होणार, तेव्हां साहाजिकच धृतराष्ट्रास युद्धांतील सर्व हकीगत समजावी अशी प्रबळ इच्छा झाली. परंतु तो जन्मांध असल्यामुळें तेथें जाऊन युद्ध पहाणें त्यास शक्यच नव्हतें. म्हणून त्याचे येथें घोड्याची परीक्षा करण्याकरितां ठेवलेला महाभाग्यवान संजय यांजवर भगवान व्यासांनीं अनुग्रह करून त्यास दिव्य चक्षू देऊन युद्धांत घडणाऱ्या सर्व गोष्टींचें ज्ञान येथें बसून होईल, असें सांगून त्यास धृतराष्ट्राजवळ बसविलें आणि तेथील हकीगत धृतराष्ट्रास सांगण्यास आज्ञा दिली, त्याप्रमाणें संजयानें धृतराष्ट्रास त्यासमयीं झालेली हकीगत सांगितली.

युद्धास आरंभ होण्यापूर्वीं कौरवांचें सैन्य पाहून त्यांतील कोणाबरोबर मी युद्ध करावें, असें अर्जुनास वाटल्यावरून त्यानें आपलें सर्व प्रकारें साह्य करणारा व ह्या युद्धाचे प्रसंगीं सारथी झालेला **श्रीकृष्ण भगवान** यांस आपला

रथ दोन्ही सैन्यामध्यें नेऊन उभा करण्यास सांगितलें व त्याप्रमाणें कृष्णांनीं रथ नेऊन उभा केला.

### गीताशास्त्र उत्पन्न होण्याचें कारण.

अर्जुन तेथें जाऊन पहातो तों दोन्ही सैन्यांत आपले आजे, चुलते, मामे, बंधु, मित्र, पुतणे, मुलगे, गुरु, आप्त, वगैरे सर्व आपलाच गोतावळा त्याच्या दृष्टीस पडला, आणि त्यास मोह उत्पन्न झाला. काय चमत्कार आहे! जसें कांहीं कोणामध्यें युद्ध होणार आहे हें तेथें जाईतोंपर्यंत अर्जुनास माहीतच नव्हतें! कौरव अन्यायानें वागतात म्हणून रात्रंदिवस द्वेष उत्पन्न होऊन त्यांच्या नाशाविषयीं उत्सुक असणारा, आपलेपेक्षां ज्यास्त धर्मानें वागणारा, सत्यप्रिय, व शांत अशा धर्माची युद्ध करण्याविषयीं आज्ञेची वाट पहाणारा अर्जुन मोहित झाला. इतकेंच नव्हे, तर समरांगणांत प्राप्त झाल्यानंतर शत्रूस पाठ दाखवून युद्धापासून पराङ्मुख होणें महत्पाप आहे. असें माहीत असणारे अर्जुनास त्या प्रसंगीं शत्रूशीं युद्ध करणें हेंच महत्पाप असें उलटें वाटूं लागलें. मोह काय करील याचा नेम नाहीं, येथेंही अर्जुन थांबला नाहीं; तर अज्ञानानें व मोहानें उत्पन्न झालेला विचार, सर्वज्ञ सर्व जिवांना ज्ञान देणारा, जो भगवान श्रीकृष्ण ह्यासच उपदेशाच्या गोष्टी सांगू लागला. देवा! आपल्या गोताचा नाश करणें हा अधर्म आहे आणि ह्या युद्धापासून पराङ्मुख होऊन उदरनिर्वाहाकरितां अरण्यांत जाऊन कंदमुळें सेवन करणें, अगर भिक्षा मागून निर्वाह करणें, हा धर्म आहे, असा माझा निश्चय आहे. म्हणून युद्ध करण्याविषयीं माझी प्रवृत्ति होत नाहीं. हें सर्व अर्जुनाचें भाषण ऐकून देव आश्चर्यचकित होऊन स्वस्थ बसले; परंतु अर्जुन खरोखरीच भाग्यवान् व त्याची आपले गुरु जे भगवान श्रीकृष्ण ह्यांचे वाक्यावर अत्यंत निष्ठा होती, म्हणून त्यानें देवांची सल्ला विचारली. देवांनीं प्रथम लौकिकदृष्टीनें वरवर उपदेश केला, परंतु तो अर्जुनास चांगलासा पटला नाहीं; म्हणून त्यानें आपली शिष्यबुद्धि प्रगट करून युद्ध करणें हें मला श्रेयस्कर आहे, किंवा युद्धापासून पराङ्मुख होणें हें मला श्रेयस्कर आहे, हें मोहामुळें माझें मला समजत नाहीं, म्हणून मी आपल्याला शिष्यबुद्धीनें शरण आलों आहें; माझें खरें कल्याण कशांत आहे, तें आपण कृपा करून सांगा. अशी प्रार्थना केल्यावर अर्जुनाचेंचसें काय, परंतु सर्व जीवांचें खरें कल्याण कशांत आहे, वर्णाश्रम भेदानें कोणाचा धर्म कोण, व अधर्म कोण वगैरे सांगून जो उपदेश केला त्यास भगवद्गीता म्हणतात. त्या वेळीं झालेला श्रीकृष्णार्जुन संवाद व्यासांनीं महाभारतांत श्लोकरूपानें ग्रथन केला. त्याचे सातशें श्लोक व अठरा अध्याय आहेत. त्यासच भगवद्गीता म्हणतात. ही गीता म्हणजे सर्व उपनिषदांचें सार असून मोक्षफल देणारी आहे, मोक्ष सर्वच जीवांना पाहिजे आहे, म्हणून गीतेचें यथार्थ रहस्य जीवांना समजावें म्हणून श्रीशंकराचार्यादिकांनीं त्यांजवर मोठमोठे व्याख्यानरूपी ग्रंथ लिहिले आहेत. परंतु संस्कृतानभिज्ञ लोकांस त्याजपासून उपयोग होत नाहीं. हें पाहून भगवान श्रीज्ञानेश्वरमहाराज यांनीं गीतेवर भावार्थदीपिका म्हणून प्राकृत टीका केली तिलाच **ज्ञानेश्वरी** म्हणून नांव आहे. ज्या अर्थीं भगवान श्रीकृष्णांनीं सर्व जीवांचे कल्याणार्थ गीता सांगितली आहे, त्याअर्थीं ही सार्थ भगवद्गीता म्हणजे ज्ञानेश्वरी सर्व मनुष्यांस आपल्याच कल्याणार्थ अत्यंत आदरणीय आहे. त्याप्रमाणें त्यांस बुद्धी होवो, अशी ईश्वराजवळ प्रार्थना आहे.

---

# अनुक्रमणिका.



# ज्ञानेश्वरी.

## अध्याय पहिला.

ॐनमोजी आद्या । वेदप्रतिपाद्या । जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥१॥ देवा तूंचि गणेशु । सकलार्थमतिप्रकाशु । म्हणे निवृत्तिदासु । अवधारिजोजी ॥२॥ हें शब्दब्रह्म अशेष । तेचि मूर्ति सुवेश । तेथ वर्णवपु निर्दोष । मिरवत असे ॥३॥ स्मृति तेचि अवयव । देखा आंगीकभाव । तेथ लावण्याची ठेव । अर्थशोभा ॥४॥ अष्टादश पुराणें । तींचि मणिभूषणें । पदपद्धती खेवणें । प्रमेयरत्नांचीं ॥५॥ पदबंध नागर । तेंचि रंगाथिलें अंबर । जेथ साहित्य वाणें सपूर । उजाळाचें ॥६॥ देखा काव्य नाटका । जे निर्धारितां सकौतुका । त्याचि रुणझुणती क्षुद्रघंटिका । अर्थध्वनि ॥७॥ नाना प्रमेयांची परी । निपुणपणें पाहतां कुसरी । दिसती उचित पदें माझारीं । रत्नें भलीं ॥८॥ तेथ व्यासादिकांच्या मती । तेचि मेखळा मिरवती । चोखाळपणें झळकती । पल्लवसडका ॥९॥ देखा षड्दर्शनें ह्मणिपति । तेचि भुजांची आकृती । म्हणऊनि विसंवादें धरिती । आयुधें हातीं ॥१०॥ तरी तर्कु तोचि परशु । नीतिभेदु अंकुशु । वेदान्तु तो महारसु । मोदकु मिरवे ॥११॥ एके हातीं दंतु । जो स्वभावता खंडितु । तो बौद्धमतसंकेतु । वार्तिकाचा ॥१२॥ मग सहजें सत्कारवादु । तो पद्मकरु वरदु । धर्मप्रतिष्ठा तो सिध्दु । अभय हस्तु ॥१३॥ देखा विवेकवंतु सुविमळु । तोचि शुंडादंडु सरळु । जेथ परमानंदु केवळु । महासुखाचा ॥१४॥ तरी संवादु तोचि दशनु । जो समता शुभ्रवर्णु । देवो उन्मेषसूक्ष्मेक्षणु । विघ्नराजु ॥१५॥ मज अवगमलिया दोनी । मीमांसाश्रवणस्थानीं । बोधमदामृत मुनी । अली सेविती ॥१६॥ प्रमेयप्रवाल सुप्रभ । द्वैताद्वैत तेचि निकुंभ । सरिसेपणें एकवटत इभ । मस्तकावरी ॥१७॥ उपरि दशोपनिषदें । जियें उदारेंज्ञानमकरंदें । तियें कुसुमें मुगुटीं सुगंधें । शोभती भाळीं ॥१८॥ अकार चरणयुगुल । उकार उदर विशाल । मकारु महामंडल । मस्तकाकारें ॥१९॥ हे तिन्ही एकवटले । तेथ शब्दब्रह्म कवळलें । तें मियां श्रीगुरुकृपा नमिलें । आदिबीज ॥२०॥ आतां अभिनव वाग्विलासिनी । जे चातुर्यार्थकलाकामिनी । ते शारदा विश्वमोहिनी । नमिली मियां ॥२१॥ मज हृदयीं सद्गुरु । जेणें तारिलों हा संसारपुरु । ह्मणऊनि विशेषें अत्यादरु । विवेकावरी ॥२२॥ जैसें डोळयां अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे । मग वास पाहिजे तेथ प्रगटे । महानिधी ॥२३॥ का चिंतामणि आलिया हातीं । सदा विजयवृत्ति मनोरथीं । तैसा मी पूर्णकाम श्रीनिवृत्ति । ज्ञानदेवो ह्मणे ॥२४॥ ह्मणोनि जाणतेन गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होईजे । जैसें मूळसिंचनें सहजे । शाखापल्लव संतोषती ॥२५॥ कां

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय पहिला.

हे निर्गुणब्रह्मा आत्मरूपा, तूं सर्वांचा आदि असून तुझें वेदांनीं वर्णन केलेलें आहे व तुझ्या स्वरूपास जाणणारा तूं (स्वयंप्रकाश) स्वतःच आहेस. तुला माझा नमस्कार असो; आणि तुझा जयजयकार होवो. १ श्रीनिवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतातः—देवा, सकल जगाच्या बुद्धीला ज्ञानाचा प्रकाश देणारा जो गणपति, तो तूंच आहेस; कसा म्हणाल तर, ऐका महाराजः–२ स्वर व व्यंजनें हीं ज्या रूपाची सुंदर कांति आहे, ते शब्दमात्र म्हणजे संपूर्ण वेद हींच तुझी उत्तम गणेशमूर्ति होय: ३ असें पहा कीं, मन्वादिकांच्या स्मृति हेंच त्या शरिराचे अवयव असून त्याची अंगलोट अवर्णनीय आहे: व त्यांतील अर्थ ही सौंदर्याची खाण आहे; ४ अठरा पुराणें हींच रत्नखचित भूषणें होत: व त्यांतील पदयोजना हा त्यांचा घाट असून त्यांतील गर्भित अर्थ हींच कोंदणें होत; ५ उत्तम पदरचना हेंच रंगविलेलें वस्त्र होय; व त्या पदांतील अलंकार हेच लकलकीत लांबरुंद बाण होत; ६ काव्यें आणि नाटकें पहा! त्यांची कौतुकानें योजना करूं म्हटलें, तर करगोट्याच्या घागऱ्यांच्या ठिकाणीं होते, आणि त्यांतील अर्थ हा त्या घागऱ्यांचा मंजुळ ध्वनि होतो; ७ मार्मिक दृष्टीनें पाहिलें म्हणजे, त्यांतील श्लेषांच्या पर्यायांचीं उत्तम स्थलें हींच कोणी ह्या घागऱ्यांमधील रत्नें शोभतात; ८ व्यासादिकांची बुद्धि हीच त्यांवरील मेखलेच्या (कमरेच्या शेल्याच्या) ठिकाणीं शोभते; व त्या बुद्धीचा सरळपणा मेखलेच्या पदराच्या शेंड्याप्रमाणें झळकतो; ९ असें पहा कीं, सहा शास्त्रें हेच गणपतीचे सहा हात होत; आणि म्हणूनच त्यांतील भिन्नभिन्न अभिप्राय हीं त्या त्या हातांतील निरनिराळीं शस्त्रें होत; १० तरी त्यांतील तर्कशास्त्र हा फरशु, न्यायशास्त्र हा अंकुश, आणि वेदांतशास्त्र हें गोड व रसाळ मोदकाच्या ठिकाणीं शोभतें; ११ वार्तिककारांच्या व्याख्यानानें स्वभावतःच खंडित झालेलें बौद्धमत हें, एका हातांत असणाऱ्या मोडक्या दांताच्या ठिकाणीं शोभतें; १२ मग, कल्याणकारक व वरदायक असा जो हस्त, तो, सत्कारवाद म्हणजे ब्रह्मविषयकवाद होय; धर्माची स्थापना करणारा तो स्वभावसिद्ध अभयहस्त होय; १३ ज्या ठिकाणीं महासुखाचा परमानंद आहे, तो अति निर्मळ विचार हाच सरळ सोंडेचा सोट होय; १४ तसाच उत्तम संवाद हा सरळ व शुभ्र दांताचे ठिकाणीं असून, ज्ञानदृष्टि म्हणजे त्या विघ्नराजाचे सूक्ष्म नेत्र होत; १५ पूर्व व उत्तर ह्या मीमांसा मला कानांच्या ठिकाणीं भासल्या; बोधामृत हा गंडस्थलांतून निघणारा मद, व त्याचें सेवन करणारे मुनि हेच भ्रमर होत; १६ त्यांतील प्रमेयें (सिद्धांत) हींच गंडस्थलावरील सतेज पोंवळ्यांच्या ठिकाणीं असून, द्वैत व अद्वैत सिद्धांत हे गंडस्थलांच्या ठिकाणीं सारख्या प्रमाणानें शोभतात; १७ त्या गंडस्थलाच्या मुकुटावरील शोभणारीं सुगंधि फुलें म्हणजे ज्ञानमकरंदानें परिपूर्ण असलेलीं दशोपनिषदें होत; १८ ॐकारांतील अकार हा दोन्ही चरणांचे ठिकाणीं, उकार हा विशाल उदराचे ठिकाणीं, व मकार हा सर्व अवयवांत श्रेष्ठ अशा मस्तकाचे ठिकाणीं आहे; १९ अकार, उकार व मकार हे ज्या वेळेस एकत्र झाले, त्या वेळेस त्यांत शब्दब्रह्माचा समावेश होऊन ॐकार हें रूप बनलें. त्या आदि-बीजाला मी श्रीगुरु निवृत्तिनाथांच्या कृपेनें नमस्कार करितों. २० आतां, अपूर्व अशा वाणीचे ठिकाणीं विलास करणारी, चातुर्य, अर्थ व कला यांची स्वामिणी, आणि विश्वाला मोहित करणारी अशी जी श्रीसरस्वती, तिला मी नमस्कार करितों. २१ माझ्या हृदयांत वास करणारे जे सद्गुरु, त्यांच्या कृपेनें संसारमहापुरांतून मी पार पडलों; म्हणून विचारावर माझी विशेष प्रीति जडली. २२ ज्याप्रमाणें (पायाळूच्या) डोळ्यांत अंजन घातलें म्हणजे त्याच्या दृष्टीस विशेष सामर्थ्य येऊन तो जिकडे पाहील तिकडे त्यास भूमिगत द्रव्याचा ठेवा दिसूं लागतो, २३ किंवा चिंतामणि हातीं आल्यावर ज्याप्रमाणें मनांतील हेतु सर्वकाळ पूर्ण होतात, त्याप्रमाणें, ज्ञानदेव म्हणतात कीं, श्रीगुरु निवृत्तींच्या कृपेनें माझे सर्व हेतु तडीस जातात. २४ म्हणून, जे सुज्ञ आहेत त्यांनीं श्रीगुरूची सेवा करून कृतकृत्य व्हावें.—कसें म्हणाल तर—ज्याप्रमाणें झाडाच्या मुळाशीं पाणी घातलें म्हणजे फांद्या व पानें आपोआप टवटवीत होतात, २५ किंवा त्रिभुवनांत जितकीं

तीर्थें जिये त्रिभुवनीं । तियें घडती समुद्रावगाहनीं । ना तरी अमृतरसास्वादनीं । रस सकळ ॥२६॥ तैसा पुढतपुढती तोचि । मियां अभिवंदिला श्रीगुरुचि । जो अभिलषित मनोरुचि । पुरविता तो ॥२७॥ आतां अवधारा कथा गहन । जे सकळा कौतुकां जन्मस्थान । कीं अभिनव उद्यान । विवेकतरूचें ॥२८॥ ना तरी सर्व सुखाचि आदि । जे प्रमेयमहानिधी । नाना नवरससुधाब्धि । परिपूर्ण हे ॥२९॥ कीं परमधाम प्रकट । सर्व विद्यांचें मूळपीठ । शास्त्रजातां विशिष्ट । अशेषांचें ॥३०॥ ना तरी सकळ धर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार । लावण्यरत्नभांडार । शारदेचें ॥३१॥ नाना कथारूपें भारतीं । प्रकटली असे त्रिजगतीं । आविष्करोनि महामती । व्यासाचि ये ॥३२॥ म्हणोनि हा काव्यां रावो । ग्रंथ गुरुवतीचा ठावो । एथूनि रसां झाला आवो । रसाळपणाचा ॥३३॥ तेवींचि आइका आणीक एक । एथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक । आणि महाबोधीं कोंवळीक । दुणावली ॥३४॥ एथ चातुर्य शाहणे झालें । प्रमेय रुचीस आलें । आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें एथ ॥३५॥ माधुर्यीं मधुरतां । शृंगारीं सुरेखतां । रूढपण उचितां । दिसलें भलें ॥३६॥ एथ कळाविदपण कळा । पुण्यासि प्रतापु आगळा । म्हणऊनि जनमेजयाचे अवलीळा । दोष हरले ॥३७॥ आणि पाहतां नावेक । रंगीं सुरंगतेची आगळिक । गुणां सुगुणपणाचें बिक । बहुवस एथ ॥३८॥ भानुचेनि तेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळिलें । तैसें व्यासमति कवळिलें । मिरवे विश्व ॥३९॥ का सुक्षेत्रीं बीज घातलें । तें आपुलियापरी विस्तारलें । तैसें भारतीं सुरवाडलें । अर्थजात ॥४०॥ ना तरी नगरांतरीं वसिजे । तरी नागराचि होइजे । तैसें व्यासोक्ति तेजें । धवळत सकळ ॥४१॥ कीं प्रथम वयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी । प्रकटे जैसी आगळी । अंगनाअंगीं ॥४२॥ नातरी उद्यानीं माधवी घडे । तेथ वनशोभेची खाणी उघडे । आदिलापासोनि अपाडे । जियापरी ॥४३॥ नाना घनीभूत सुवर्ण । जैसें न्याहाळितां साधारण । मग अळंकारीं बरवेपण । निवाडु दावी ॥४४॥ तैसें व्यासोक्ति अळंकारिलें । आवडेतें बरवेंपण पातलें । तें जाणोनि काय आश्रयिलें । इतिहासीं ॥४५॥ नाना पुरतियें प्रतिष्ठेलागीं । सानीव धरूनि आंगीं । पुराणें आख्यानरूपें जगीं । भारता आलीं ॥४६॥ म्हणउनि महाभारतीं नाहीं । तें नोहेचि लोकीं तिहीं । येणें कारणें म्हणिपे पाहीं । व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥४७॥ ऐसी जगीं सुरस कथा । जे जन्मभूमि परमार्था । मुनि सांगे नृपनाथा । जनमेजया ॥४८॥ जें अद्वितीय उत्तम । पवित्रैक निरुपम । परम मंगलधाम । अवधारिजो ॥४९॥ आतां भारतकमळपरागु । गीताख्यु प्रसंगु । जो संवादला श्रीरंगु । अर्जुनेसी ॥५०॥ ना तरी शब्दब्रह्माब्धि । मथिलया व्यास बुद्धी । निवाडिलें निरवधि । नवनीत हें ॥५१॥ मग ज्ञानाग्निसंपर्कें । कडसिलेंनि विवेकें । पद आलें परिपाकें । आमोदासी ॥५२॥ जें अपेक्षिजे विरक्तीं । सदा अनुभविजे संतीं । सोहंभावें पारंगतीं । रमिजे जेथ ॥५३॥ जे आकर्णिजे भक्तीं । जें आदिवंद्य त्रिजगतीं । जें भीष्मपर्व संगती । म्हणितली कथा ॥५४॥ जें भगवद्गीता म्हणिजे । जें ब्रह्मेशांनीं प्रशंसिजे । जें सनकादिकीं सेविजे । आदरेसीं ॥५५॥ जैसें शारदीयेचे चंद्रकळे । माजीं अमृतकण कोंवळे । ते वेंचिती मनें मवाळे । चकोरतलगें ॥५६॥ तियांपरी श्रोता

तीर्थें आहेत तितक्या सर्वांचें श्रेय एका समुद्रांत स्नान के-ल्यानें येतें, अथवा अमृतरसाचें सेवन केलें असतां सर्व रस सेवन केल्याप्रमाणें होतें; २६ त्याचप्रमाणें, इच्छित कामना पूर्ण करणारे जे श्रीगुरु त्यांसच मी पुनः पुनः नमस्कार करितों. २७ आतां, यापुढें, सर्व कौतुक उत्पन्न करणारी, अथवा विचाररूप वृक्षांची अपूर्व वागच अशी गहन कथा ऐका. २८ किंवा जी सर्व सुखाचें कारण व सर्व सिद्धांताचें आगर अथवा नवरसांनीं पूर्ण भरलेला असा अमृतसिंधुच आहे; २९ किंवा मोक्षाचें उघड स्थान, अथवा सर्व वि-द्यांचें आदिस्थान, किंबहुना ती ( कथा ) सर्व शास्त्रांना आश्रय आहे. ३० ही सर्व धर्मांचें माहेर, किंवा सज्जनांचें हृदय, अथवा सरस्वतीच्या लावण्यरूपी रत्नांचा ठेवाच आहे. ३१ किंवा ही श्रीव्यासांच्या महामतींत प्रवेश करून भारतांत कथाभिषानें या त्रिजगांत प्रकट झाली आहे. ३२ म्हणून, ही कथा सर्व काव्यांचा राजा असून, सर्व ग्रंथांच्या थो-रपणाचें ठिकाण आहे; व येथून शृंगारादिक नवरसांना र-साळपणाचा विशेष डौल आला. ३३ तसेंच, आणखी एक गोष्ट ध्यानांत ठेवा कीं, या कथेपासूनच शब्दरूपी लक्ष्मीस सच्छास्त्रीयपणा येऊन, आत्मबोधाला विशेष शोभा आली; ३४ या कथेपासूनच चातुर्य शहाणें झालें; तत्वा-र्थाला ज्यास्त गोडी आली; आणि या कथेपासूनच सुखाच्या सौभाग्याची वृद्धि झाली. ३५ माधुर्याला मधुरपणा, शृंगा-राला सुरेखपणा व योग्य वस्तूस श्रेष्ठपणा येऊन त्या सर्व उत्तम रीतीनें शोभूं लागल्या. ३६ या कथेपासूनच कलांना कौशल्य प्राप्त झालें, व पुण्याचा प्रताप फार वाढला; म्ह-णूनच, [ अठरा दिवसांत भारताचीं अठरा पर्वें ऐकल्या-मुळें ] जनमेजयाचे ब्रह्महत्त्येचे दोष सहज नाहींसे झाले. ३७ आणि क्षणभर पाहूं लागलें असतां शृंगारादिक रसांस विशेष सुरेखपणा आला, व गुणाला चांगुलपणाचें भरतें या कथेनें आलें. ३८ ज्याप्रमाणें सूर्योदय झाल्यावर त्रैलो-क्यावर उजेड पडतो, त्याप्रमाणें व्यासांच्या बुद्धींतून ही कथा निघाल्यामुळें सर्व जगावर उजेड पडून तें शोभलें. ३९ किंवा चांगल्या शेतांत बीं पेरलें असतां त्याचा जसा सहज विस्तार होतो, तसे ह्या भारतांत सर्व विषय शो-भिवंत झाले आहेत. ४० अथवा, नगरांत राहिल्यावर ज्याप्रमाणें मनुष्य शहाणा होतो, त्याप्रमाणें व्यासांच्या वाणीच्या तेजामुळें सर्व जग स्वच्छ ( ज्ञानमय ) झालें. ४१ तसेंच, तारुण्यदशेंत सौंदर्याची शोभा स्त्रियांच्या अंगीं जशी विशेष दृष्टीस पडते, ४२ ज्याप्रमाणें वसंत ऋतु प्राप्त झाला असतां लहानापासून थोरापर्यंत सर्व वृक्षांस वनश्री-ची विशेष शोभा येते, ४३ अथवा सोन्याच्या लगडी पा-हिल्या असतां दिसण्यांत साधारण दिसतात, पण त्यांचेच दागिने बनविले म्हणजे त्यांची शोभा कांहीं निराळीच दि-सते. ४४ व्यासांनीं अलंकृत केलेल्या वाटेल त्या कथेला पवित्रपणा आला, तें जाणूनच कीं काय इतिहासांनीं आ-पण होऊनच त्या कथेचा आश्रय केला. ४५ किंवा जगांत पूर्ण प्रतिष्ठा प्राप्त होईल म्हणून, अंगीं नम्रता धरून सर्व पुराणें आख्यानरूपानें भारतांत आलीं. ४६ म्हणून, भार-तांत जी कथा नाहीं ती त्रैलोक्यांतही नाहीं. यावरून, सर्व जगांत ज्या कथा आहेत त्या व्यासांच्या उष्ट्या आ-हेत असें म्हणतात. ४७ सर्व जगांत गोड व परमार्थाच्या उत्पत्तीचें स्थानच अशी कथा वैशंपायन हे जनमेजय रा-जास सांगतात. ४८ जी कथा अद्वितीय, उत्तम, पावन करणारी, उपमारहित आणि मोक्षाचें माहेरघरच अशी आहे; ती ऐका. ४९ आतां, भारत हेंच कोणी कमल, व भगवं-तांनीं स्वतः अर्जुनास सांगितलेला गीताविषय हाच त्यां-तील पुष्परेणु होय. ५० अथवा, व्यासांनीं वेदरूप समुद्र बुद्धिरूप रवीनें घुसळून त्यांतून शेवटीं हें गीतारूप अनुप-मेय नवनीत काढिलें; ५१ त्यास ज्ञानरूपी अग्नीची आंच देऊन विचाररूप कढ आल्यावर गीता हे पद्यरूपीं सुवा-सिक तूप झालें. ५२ ज्याची वैराग्यवान इच्छा करितात, संत नेहमीं अनुभव घेतात व ब्रह्मात्मैक्यभावानें निष्णात झालेले ब्रह्मनिष्ठ ज्या ठिकाणीं रममाण होतात. ५३ जें भक्तांनीं ऐकण्याला योग्य व त्रैलोक्यांत परमपूज्य आहे, तें भी-ष्मपर्वामध्यें सांगितलें आहे. ५४ जिला ' भगवद्गीता ' असें म्हणतात; ब्रह्मा व शंकर हे जिची स्तुति करितात; व सनकादिक अति आदरानें जिचें सेवन करितात. ५५ ज्याप्रमाणें शरदृतूंतील पौर्णिमेच्या चांदण्याचे अति सूक्ष्म अमृत-कण चकोर पक्ष्यांचीं पिलें हळुवार मनानें (कुशलतेनें) प्राशन करितात, ५६ त्यांचप्रमाणें श्रोत्यांनीं निष्काम व कुशाग्रबुद्धीनें या भगवद्गीतेचा अनुभव घ्यावा, [--असें कां, तर, ज्या गीतेंतील परमतत्व शब्दातीत असल्यामुळें सम-

अनुभवावी हे कथा । अति हळुवारपण चित्ता । आणुनियां ॥५७॥ हें शब्देंवीण संवादिजे । इंद्रियां नेणतां भोगिजे । बोलाआदि झोंबिजे । प्रमेयासी ॥५८॥ जैसे भ्रमर परागु नेती । परी कमळदळें नेणती । तैसी परी आहे सेवितीं । ग्रंथीं इये ॥५९॥ का आपुला ठावो न सांडिता ।आलिंगिजे चंद्रु प्रकटतां। हा अनुरागु भोगितां । कुमुदिनी जाणे ॥६०॥ ऐसेनि गंभीरपणें । स्थिरावलेनि अंतःकरणें । आथिला तोचि जाणें । मानूं इये ॥ ६१ ॥ अहो अर्जुनाचिये पांती । जे परिसणया योग्य होतीं । तिहीं कृपा करूनि संतीं । अवधान द्यावें ॥६२॥ हें सलगी म्यां म्हणितलें । चरणां लागोनि विनविलें । प्रभू सखोल हृदय आपुलें।म्हणौनियां ॥६३॥ जैसा स्वभावो मायबापांचा । अपत्य बोले जरी बोबडी वाचा । तरी अधिकचि तयाचा । संतोष आथी ॥६४॥ तैसा तुम्हीं मी अंगिकारिला । सज्जनीं आपुला म्हणितला । तरी उणें सहजें उपसाहला । प्रार्थूं काई ॥६५॥ परी अपराधु तो आणीक आहे । जे मी गीतार्थु कवळूं पाहें । ते अवधारा विनवूं लाहें । म्हणौनियां ॥६६॥ हें अनावर न विचारितां । वायांचि धिंवसा उपनला चित्ता । येऱ्हवीं काय भानुतेजीं खद्योता । शोभा आथी ॥६७॥ कीं टिटिभू चांचूवरी । माप सुये सागरीं । मी नेणतु त्यापरी । प्रवर्ते येथ ॥६८॥ आयका आकाश गिंवसावें । तरी आणीक त्याहुनि थोर होआवें । म्हणऊनि अपाडु हें आघवें । निर्धारितां ॥६९॥ तया गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी । जेथ भवानी प्रश्नु करी । चमत्कारोनी॥७०॥ तेथ हरु म्हणे नेणिजे । देवी जैसें का स्वरूप तुझें । तैसें हें नित्य नूतन देखिजे । गीतातत्त्व ॥७१॥ हा वेदार्थ सागरु । जया निद्रिताचा घोरु । तो स्वयें सर्वेश्वरु । प्रत्यक्ष अनुवादला ॥७२॥ ऐसें जें अगाध । जेथ वेडावती वेद । तेथ अल्प मी मतिमंद । काय होय ॥७३॥ हें अपार कैसेनि कवळावें । महातेज कवणें धवळावें । गगन मुठीं सुवावें । मशकें केवीं ॥७४॥ परी एथ असे एकु आधारु । तेणेंचि बोलें मी सधरु । जैं सानुकूळ श्रीगुरु । ज्ञानदेवो म्हणे ॥७५॥ येऱ्हवीं तरी मी मूर्खु । जरी जाहला अविवेकु । तरी संतकृपादीपकु । सोज्वळु असे ॥७६॥ लोहाचें कनक होये । हें सामर्थ्य परिसींच आहे । कीं मृतही जीवित लाहे । अमृतसिद्धि ॥७७॥ जरी प्रकटे सिद्धसरस्वती । तरी मुकया आथी भारती । एथ वस्तुसामर्थ्यशक्ती । नवल कायी ॥७८॥ जयातें कामधेनु माय । तयासी अप्राप्य कांहीं आहे। म्हणऊनि मी प्रवर्तों लाहें। ग्रंथीं इये ॥७९॥ तरी न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें । करूनि घेयावें हें तुमतें । विनवितु असें ॥ ८० ॥ आतां देइजो अवधान । तुम्हीं बोलविल्या मी बोलेन । जैसें चेष्टे सूत्राधीन । दारुयंत्र ॥ ८१ ॥ तैसा मी अनुग्रहीतु । साधूंचा निरूपितु । ते आपुलिया परि अलंकरितु । भलतयापरि ॥८२॥ तंव श्रीगुरु म्हणती राही । हें तुज बोलावें नलगे कांहीं । आतां ग्रंथा चित्त देई । झडकरी वेगा ॥८३॥या बोला निवृत्तिदासु । पावूनि परम उल्हासु। म्हणे परियेसा मना अवकाशु । देऊनियां ॥८४॥

जण्यास कठीण आहे म्हणून-]. ५७ या गीतेंतील कथेचा बोलल्याशिवाय विचार करावा, इंद्रियांना न कळत अनुभव घ्यावा, आणि ती ऐकण्याचे पूर्वी तिच्यांतील रहस्य जाणून घ्यावें. ५८ ज्याप्रमाणें भ्रमर कमलदलाला न समजूं देतां त्यांतील पुष्परेणु सेवन करतात, त्याप्रमाणें हा ग्रंथ समजून घेण्याची पद्धत आहे. ५९ किंवा चंद्रप्रकाश होण्याबरोबर चंद्रविकासिनी कमल उमलून आपली जागा न सोडतां ज्याप्रमाणें चंद्राला प्रीतीनें आलिंगन देण्याचें सौख्य जाणतें, ६० त्याप्रमाणें, शमदमांनीं ज्याचें अंतःकरण स्थिर झालें आहे, तोच या कथेचें रहस्य जाणील; असें आम्ही समजतों. ६१ [-त्याप्रमाणें अर्जुन अधिकारी होता, म्हणून महाराज संतांची प्रार्थना करितात.-] अहो, अर्जुनाच्या योग्यतेचे जे श्रवण करणारे असतील, त्या संतांनीं कृपा करून इकडे लक्ष द्यावें. [-हें बोलणें जरा अधिक झालें म्हणून परिहार देतात.-] ६२ प्रभो, आपलें हृदय फार गंभीर आहे, म्हणून माझी आपल्या चरणांपाशीं ही लडिवाळपणाची विनंती आहे. ६३ ज्याप्रमाणें आपलें मूल बोबडें बोललें तरी आईबापांना त्याचा स्वभावतःच अधिक संतोष वाटतो, ६४ त्याप्रमाणें माझा तुम्हीं सज्जनांनीं अंगीकार केला असून, ज्या अर्थी मला आपला म्हटलें आहे, त्या अर्थी माझें जें कांहीं उणें असेल तें तुम्हीं सहज सहन कराल! त्याबद्दल म्हणजे मला आपली प्रार्थना केली पाहिजे असें नाहीं! ६५ परंतु जो अपराध म्हणून माझ्या हातून घडत आहे, तो निराळाच आहे; तो हा कीं, गीतेचा अर्थ मी स्पष्ट करूं पहात आहें, आणि इकडे लक्ष द्या अशी, आपल्यासारख्यांना विनंती करीत आहें. ६६ हें गीतार्थाचें काम फार कठीण आहे, याचा विचार मनांत न करतां, तो स्पष्ट करण्याविषयीं माझ्या चित्तांत व्यर्थ धैर्य उत्पन्न झालें आहे; बाकी सूर्याच्या तेजापुढें काजव्याचें तेज काय पडणार? ६७ किंवा आपलीं पिलें समुद्रानें वाहून नेलीं म्हणून त्याचा सूड उगवेण्याकरितां ] ज्याप्रमाणें समुद्र कोरडा करण्यासाठीं टिटवीनें आपल्या चोंचीनें पाणी उपसण्याचा प्रयत्न केला, याप्रमाणें माझा अधिकार नसतां मी गीतेसारख्या ग्रंथाचा अर्थ करण्याकरितां प्रवृत्त झालों आहें. ६८ असें हा, आकाशाचें आकलन करावयाचें म्हटलें म्हणजे ज्याप्रमाणें त्याहून मोठें झालें पाहिजे, त्याप्रमाणें वास्तविक पहतां, गीतेचें व्याख्यान करण्यास माझ्यापेक्षां अधिक योग्य पुरुष पाहिजे होता; कारण, हें कृत्य माझ्या शक्तीच्या बाहेर आहे. ६९ कारण, या गीतार्थाची थोरवी एवढी आहे कीं; स्वतः शंकर त्याची चर्चा करीत असतां भवानीला चमत्कार वाटून तिनें शंकराला प्रश्न केला ७० असतां शंकर म्हणाले, हे पार्वती, तुझें स्वरूप नित्य नूतन असल्यामुळें जसा त्याचा पार लागत नाहीं, त्याप्रमाणें गीतातत्व नित्य नूतन आहे म्हणून तेंही जाणलें जात नाहीं. ७१ कारण, ज्या सर्वेश्वराच्या घोरण्यापासून सहज वेद उत्पन्न झाले, त्या जगदीश्वरानें प्रत्यक्ष स्वमुखानें हें गीताशास्त्र अर्जुनाला सांगितलें. ७२ असें हें गीताशास्त्र गहन असून याच्या ठिकाणीं वेदांची देखील मति गुंग होऊन गेली. तेव्हां अशा ठिकाणीं अल्प व मतिमंद असा जो मी, त्या माझी काय कथा! ७३ हें अपार गीतातत्व कोणत्या उपायानें समजून घ्यावें! सूर्याच्या तेजाला कोणी उजळा द्यावा! व चिलटानें आपल्या मुठींत आकाश कसें धरावें! ७४ परंतु, ज्ञानदेव म्हणतात, ज्या अर्थी श्रीगुरु मला अनुकूल आहेत, त्या अर्थी एवढें महत्कृत्य करण्याला त्यांचाच एक आधार आहे, व याचमुळें मला धीर आला आहे. ७५ एरवीं जरी मी अज्ञानी व अविवेकी असलों तरी संतांच्या कृपारूपी दीपानें सोज्वळ ( योग्य ) झालों आहें. ७६ परिसाच्या सामर्थ्यानें लोखंडाचें सोनें होतें; किंवा मेलेल्या मनुष्यास अमृत पाजिलें असतां तो जिवंत होतो; ७७ अथवा सरस्वतीच प्रसन्न झाली तर मुक्याला देखील वाचा फुटते; तेव्हां यांत नवल नसून हें केवळ वस्तुमाहात्म्य आहे. ७८ कामधेनुच ज्याची आई, त्याला दुर्लभ असें काय आहे? म्हणून मी हा ग्रंथ करण्यास प्रवृत्त झालों; ७९ तरी कमी असेल तें पुरें करून घेऊन अधिक असेल तें सोडून द्या, एवढी माझी आपणांस विनंती आहे. ८० महाराज, आतां आपण इकडे लक्ष द्यावें; कारण, जर आपण मला बोलवाल तर मी बोलेन. ज्याप्रमाणें कळसूत्री लांकडाची बाहुली दोऱ्याचे आधारानें नाचते, ८१ त्याप्रमाणें तुम्ही मजवर अनुग्रह केला आहे, आणि साधूंनीं आज्ञा केली आहे. करितां, आतां आपल्या इच्छेस येईल त्याप्रमाणें मला सुशोभित करा, मजकडून बोलवा. ८२ तेव्हां श्रीगुरु म्हणतात: पुरे! हें तूं आम्हांला सांगावेंस असें नाहीं; आतां गीतार्थ सांगण्याकडे लवकर लक्ष दे. ८३ अशी श्रीगुरूंची आज्ञा झालेली पाहून निवृत्तिदास ज्ञानदेव मनांत अतिसंतुष्ट होऊन म्हणतात कीं, मी बोलतों तें स्वस्थ मनानें ऐका. ८४

धृतराष्ट्र उवाचः—

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।**
**मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥१॥**

**अन्वय**–संजय, धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे युयुत्सवः समवेताः मामकाः पांडवाः च एव किम् अकुर्वत. ॥ १ ॥

तरी पुत्रस्नेहें मोहितु । धृतराष्ट्र असे पुसतु । म्हणे संजया सांगे मातु । कुरुक्षेत्रींची ॥८५॥ जें धर्मालय म्हणिजे । तेथ पांडव आणि माझे । गेले असती व्याजें । जुंझाचेनि ॥८६॥ तरी तेंचि येतुला अवसरीं । काय किजत असे येरयेरीं । तें झडकरी कथन करी । मजप्रती ॥८७॥

संजय उवाचः—

**दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।**
**आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥२॥**

तदा व्यूढं पांडवानीकं दृष्ट्वा तु राजा दुर्योधनः आचार्यं उपसंगम्य वचनं अब्रवीत्. ॥ २ ॥

राजोवाचः—

**पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।**
**व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥३॥**

आचार्य, तव धीमता शिष्येण द्रुपदपुत्रेण व्यूढां एतां पांडुपुत्राणां महतीं चमूं पश्य. ॥ ३ ॥

तिये वेळीं तो संजय बोले । म्हणे पांडवसैन्य उचललें । जैसें महाप्रळयीं पसरलें । कृतांतमुख ॥८८॥ तैसें तें घनदाट । उठावलें एक वाट । जैसें उसळलें कालकूट । धरी कवण ॥८९॥ नातरी वडवानलु सादुकला । प्रलयवातें पोखला । सागरु शोषूनि उधवला । अंबरासी ॥९०॥ तैसें दळ दुर्धर । नानाव्यूहीं परिकर । अवगमलें भयासुर । तिये काळीं ॥९१॥ तें देखोनियां दुर्योधनें । अव्हेरिलें कवणें मानें । जैसें न गणिजे पंचाननें । गजघटातें ॥९२॥ मग द्रोणापासीं आला । तयातें म्हणे हा देखिला । कैसा दळभारु उचलला । पांडवांचा ॥९३॥ गिरिदुर्ग जैसे चालते । तैसे विविध व्यूह सभंवते । रचिले आथी बुद्धिमंतें । द्रुपदकुमरें ॥९४॥ जो का तुम्हीं शिक्षापिला । विद्या देऊनि कुरुठा केला । तेणें हा सैन्यसिंधु पाखरिला । देखदेख ॥९५॥

**अत्र शूरा महेश्वासा भीमार्जुनसमा युधि ।**
**युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥४॥**

अत्र शूराः महेष्वासाः युधि भीमार्जुनसमाः युयुधानः विराटः महारथः द्रुपदः च. ॥४॥

आणीकही असाधारण । जे शस्त्रास्त्रीं प्रवीण । क्षात्रधर्मीं निपुण । वीर आहाती ॥९६॥ जे बळें प्रौढी पौरुषें । भीमार्जुनांसारिखे । ते सांगेन कौतुकें । प्रसंगेंची ॥९७॥ एथ युयुधानु सुभट्टु । आला असे विराट्टु । महारथीश्रेष्ठु । द्रुपद्रु वीरु ९८

**धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।**
**पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥५॥**
**युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् ।**
**सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥६॥**

धृष्टकेतुः चेकितानः वीर्यवान् काशिराजः च पुरुजित् कुंतिभोजः च नरपुंगवः शैब्यः च विक्रांतः युधामन्युः च वीर्यवान् उत्तमौजाः च सौभद्रः द्रौपदेयाः च सर्वे एव महारथाः ६

चेकितानु धृष्टकेतु । काशिराज वीर विक्रांतु । उत्तमौजा नृपनाथु । शैब्य देख ॥९९॥ हा कुंतिभोज पाहे । एथ युधामन्यु आला आहे । आणि पुरुजितादि राय हे । सकळ देखें ॥१००॥ हा सुभद्राहृदयनंदनु । जो अपरुनवार्जुनु । तो अभिमन्यु म्हणे दुर्योधनु । देखे द्रोणा ॥१॥ आणीकही द्रौपदीकुमर । हे सकळही महारथी वीर । मिती नेणिजे परी अपार । मीनले असती ॥२॥

**अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।**
**नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥७॥**
**भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।**
**अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥८॥**

द्विजोत्तम, अस्माकं तु ये विशिष्टाः मम सैन्यस्य नायकाः तान् निबोध, संज्ञार्थं तान् ते ब्रवीमि ॥७॥ भवान् भीष्मः च कर्णः च समितिंजयः कृपः च अश्वत्थामा विकर्णः तथैव च सौमदत्तिः ॥८॥

आतां आमुच्या दळीं नायक । जे रूढवीर सैनिक । ते प्रसंगें आइक । सांगिजती ॥३॥ उद्देशें

धृतराष्ट्र म्हणाला:—संजया, धर्माचें ठिकाण जें कुरुक्षेत्र, तेथें युद्धाच्या इच्छेनें एके ठिकाणीं जमलेल्या माझ्या व पंडूच्या मुलांनीं काय केलें ? १

पुत्राच्या प्रेमानें मोहित झालेला धृतराष्ट्र राजा संजयास म्हणाला, "संजया, कुरुक्षेत्राची काय हकीकत आहे ती मला सांग. ८५ ज्या कुरुक्षेत्राला धर्माचें ठिकाण असें म्हणतात, तेथें माझे व पंडूचे पुत्र युद्ध करण्याच्या निमित्तानें गेले आहेत, ८६ तर ते परस्परांत एवढा वेळपर्यंत काय करीत आहेत तें मला लवकर सांग. ८७,,

संजय म्हणाला:—पांडवसैन्याची व्यूहरचना पाहून दुर्योधन राजा अंतर्यामीं भ्याला व द्रोणाचार्यांजवळ जाऊन त्यांस म्हणाला, ॥२॥ अहो गुरु महाराज, आपला बुद्धिमान् शिष्य जो द्रुपदाचा मुलगा धृष्टद्युम्न, त्यानें पांडवांच्या प्रचंड सेनेची ही व्यूहरचना केलेली पहा. ॥३॥

तेव्हां संजय म्हणाला:–ज्याप्रमाणें महाप्रलयाचे वेळीं काळाचें तोंड पसरलेलें असतें, त्याप्रमाणें पांडवांचें सैन्य खवळलें. ८८ सर्व पांडवसैन्य एकत्र जमून एका रोखानें सज्ज झालें, तेव्हां त्याला कोण आवरणार ? ज्याप्रमाणें कालकूट विष उसळलें असतां त्याचें शमन कोणाच्यानें करवत नाहीं, ८९ किंवा वडवानल पेटून तो प्रलयवातानें भडकल्यावर ज्याप्रमाणें समुद्रांतील पाण्याचें शोषण करून आकाशापर्यंत प्रदीप्त होतो, ९० त्याप्रमाणें पांडवांचें भयंकर सैन्य नानाप्रकारच्या व्यूहरचनेनें तयार केलेलें असल्यामुळें त्या वेळेस अति भेसूर असें दिसलें. ९१ परंतु ज्याप्रमाणें हत्तींचे कळप पाहून सिंह त्यांना कःपदार्थ मानतो, त्याप्रमाणें दुर्योधनानें पांडवांचें तें सैन्य पाहून त्यास यःकश्चित् मानलें. ९२ मग द्रोणाचार्यांजवळ त्यांचें मन कलुषित करण्याकरितां येऊन त्यांस म्हणाला, पांडवांचें हें सैन्य कसें उसळलें आहे पाहिलेंना ? ९३ बुद्धिमान असा जो द्रुपदपुत्र धृष्टद्युम्न, त्यानें या सैन्याची अशी चमत्कारिक रचना केली आहे कीं, तें चालत्या डोंगरीकिल्ल्यांप्रमाणेंच दिसत आहे. ९४ ज्या धृष्टद्युम्नाला तुम्हीं पढवून विद्येचें आगर केलें, त्यानें हा सेनासमुद्र चहूंकडे पसरविला आहे तो पहा. ९५

या ठिकाणीं शूर, मोठीं धनुष्यें धारण करणारे, आणि युद्धामध्यें भीमार्जुनांसारखे पराक्रमी असे युयुधान, विराट, आणि महारथी द्रुपद हे आहेत. ॥४॥

याशिवाय आणखी शस्त्रास्त्रांत प्रवीण व क्षत्रधर्मांत निपुण असे महान् महान् योद्धे आहेत. ९६ जे बलानें, योग्यतेनें व पुरुषार्थानें भीमार्जुनांसारखे आहेत; यांचें सहज प्रसंगानुसार वर्णन करितों. ९७ या ठिकाणीं महायोद्धा युयुधान राजा, विराट राजा आणि श्रेष्ठ महारथी द्रुपद राजा हे आले आहेत. ९८

धृष्टकेतु, चेकितान, पराक्रमी काशिराजा, पुरुजित्, कुंतिभोज व नरश्रेष्ठ शैब्य ॥ ५ ॥ शूर युधामन्यु, पराक्रमी उत्तमौजा, सुभद्रेचा मुलगा अभिमन्यु व द्रौपदीचे मुलगे हे सर्व महारथी आहेत. ॥६॥

"चेकितान, धृष्टकेतु, पराक्रमी असा काशिराजा, नृपश्रेष्ठ उत्तमौजा व शैब्य राजा यांजकडे पहा. ९९ हा कुंतिभोज पहा; तसाच येथें हा युधामन्यु आलेला आहे, आणि पुरुजित् आदिकरून सर्व राजे आले आहेत ते पहा" १०० दुर्योधन म्हणतो:–अहो द्रोणाचार्य, हा पहा सुभद्रेच्या अंतःकरणाला आल्हाद देणारा तिचा मुलगा प्रतिअर्जुन असा अभिमन्यु १ तसेच आणखी हे द्रौपदीचे मुलगे व सर्व महारथी ज्यांची गणती करितां येत नाहीं असे अपरिमित वीर या ठिकाणीं जमले आहेत. २

अहो द्विजश्रेष्ठ, आतां, आमच्या पक्षांतील जे मुख्य मुख्य वीर माझ्या सैन्याचे अधिपति आहेत, त्यांचीं नांवें ऐक. माझ्या सैन्याचें सामर्थ्य आपल्या लक्षांत यावें, म्हणून तीं मी आपल्याला सांगतों. आपण स्वतः, भीष्म, कर्ण, समितिंजय, कृपाचार्य, अश्वत्थामा, विकर्ण व त्याचप्रमाणें सौमदत्ति ( भूरिश्रवा ) ॥८॥

आतां, आमच्या सैन्यांत प्रमुख असे महावीर कोणकोण आहेत ते प्रसंगानुरोधानें सांगतों ऐका. ३ आपण

एक दोनी । जायिजती बोलोनी । तुम्ही आदिकरूनी । मुख्य जे जे ॥४॥ हा भीष्म गंगानंदनु । जो प्रतापतेजस्वी भानु । रिपुगज-पंचाननु । कर्ण वीरु ॥५॥ या एकेकाचेनि मनोव्यापारें । हें विश्व होय संहरे । हा कृपाचार्यु न पुरे । एकलाचि ॥६॥ एथ विकर्ण वीरु आहे । हा अश्वत्थामा पैल पाहे । यांचा आडदरु सदा वाहे । कृतांतु मनीं ॥७॥ समितिंजयो सौमदत्ति ।

**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।**
**नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥९॥**

अन्ये च बहवः शूराः मदर्थे त्यक्तजीविताः ( सन्ति ) सर्वे नानाशस्त्रप्रहरणाः युद्धविशारदाः (सन्ति ) ॥९॥

ऐसे आणीकही बहुत आहाती । जयांचिया बळा मिती । धाताही नेणें ॥८॥ जे शस्त्रविद्यापारंगत । मंत्रावतार मूर्त । हो का जें अस्त्रजात । एथूनि रूढ ॥९॥ हे अप्रतिमल्ल जगीं । पुरता प्रतापु अंगीं । परी सर्व प्राणें मजचिलागीं । आराइले असती ॥११०॥ पतिव्रतेचें हृदय जैसें । पतीवांचूनि न स्पर्शे । मी सर्वस्व यां तैसें । सुभटांसी ॥११॥ आमुचिया काजाचेनि पाडें । देखती आपुलें जीवित थोकडें । ऐसे निरवधि चोखडे । स्वामिभक्ती ॥१२॥ झुंजतीं कुळकणी जाणती । कळें कीर्तीसी जिती । हें बहु असो क्षात्रनीती । एथोनियां ॥१३॥ ऐसे सर्वांपरि पुरते । वीर दळीं आमुतें । आतां काय गणूं यांतें । अपार हे ॥१४॥

**अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।**
**पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥१०॥**

तत् अस्माकं भीष्माभिरक्षितं बलं अपर्याप्तं (अस्ति) एतेषां तु भीमाभिरक्षितं इदं बलं पर्याप्तं (अस्ति) ॥१०॥

वरी क्षत्रियांमाजी श्रेष्ठु । जो जगजेठी जगीं सुभटु । तया दळवैपणाचा पाटु । भीष्मासि पैं ॥१५॥ आतां यांचेनि बळें गवसलें । हें दुर्ग जैसें पन्नासिलें । येणें पाडें थेंकुलें । लोकत्रय ॥१६॥ आधींच समुद्र पाही । तेथ दुवाडपण कवणा नाहीं । मग वडवानळु तैसेयाही । विरजा जैसा ॥१७॥ ना तरी प्रलयवन्हि महावातु । या दोघां जैसा सांघातु । तैसा हा गंगासुतु । सेनापति ॥१८॥ आतां येणेंसीं कवण भिडे । हें पांडव सैन्य कीर थोकडें । परि वरचिलेंनि पाडें । दिसत असे ॥१९॥ वरी भीमसेनु बेथु । तो जाहला असे सेनानाथु । ऐसें बोलोनियां मातु । सांडिली तेणें ॥१२०॥

**अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।**
**भीष्ममेवाभिरक्षंतु भवंतः सर्व एव हि ॥११॥**

सर्वेषु च अयनेषु यथाभागं अवस्थिताः भवन्तः सर्वे एवहि भीष्मं एव अभिरक्षन्तु ॥११॥

मग पुनरपि काय बोले । सकळ सैनिकांतें म्हणितलें । आतां दळभार आपुलाले । सरसे करा ॥२१॥ जया जिया अक्षौहिणी । तेणें तिया आणी । वरगण कवणकवणी । महारथीया ॥२२॥ तेणें तिया आवरिजे । भीष्मातळीं राहिजे । द्रोणातें म्हणे पाहिजे । तुम्हीं सकळ ॥२३॥ हाचि एकु रक्षावा । मी तैसा हा देखावा । येणें दळभारु आघवा । साचु आमुचा ॥२४॥

संजय उवाचः—

**तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः ।**
**सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥१२॥**

तस्य हर्षं संजनयन् प्रतापवान् कुरुवृद्धः पितामहः उच्चैः सिंहनादं विनद्य शंखं दध्मौ ॥१२॥

या राजयाचिया बोला । सेनापति संतोषला । मग तेणें केला । सिंहनादु ॥२५॥ तो गाजत असे अद्भुतु । दोन्ही सैन्यांआंतु । प्रतिध्वनि न समातु । उपजत असे ॥२६॥ तयाचि तुलगासवें । वीरवृत्तिचेनि थावें । दिव्य शंख भीष्मदेवें । आस्फुरिला ॥२७॥ ते दोन्ही नाद मीनले । तेथ त्रैलोक्य

व इतर वीर जे आहेत, त्यांपैकीं दिग्दर्शनाकरितां कांहीं मुख्यमुख्यांचीं नांवें सांगतों, ऐका. ४ शौर्यानें व बलानें केवळ प्रतिसूर्यच असे हे गंगानंदन भीष्माचार्य,शत्रुरूपी हत्तीला केवळ सिंहासारखा भासणारा असा हा पराक्रमी कर्ण; ५ या एकेकाच्या नुसतें मनांत आलें तर ह्या विश्वाचा संहार होईल. फार कशाला, हे एकटे कृपाचार्य देखील या कृत्याला पुरे नाहींत का ? ६ हा या ठिकाणीं विकर्ण वीर आहे, तसाच तो पलीकडे अश्वत्थामा पहा; प्रत्यक्ष काळाला देखील त्याची भीति वाटते ! ७ युद्धामध्यें सदैव विजयी असणारा हा सौमदत्ति (भूरिश्रवा);

**आणखीही पुष्कळ शूर वीर माझ्याकरितां जिवावर उदार झालेले आहेत. ते सर्व नानाप्रकारचीं शस्त्रास्त्रें धारण करणारे व युद्धविद्येंत कुशल असे आहेत. ॥९॥**

त्याचप्रमाणें, ज्यांच्या शौर्याचा अंत प्रत्यक्ष ब्रह्मदेवालाही लागत नाहीं असे आणखी किती तरी वीर आहेत, ८ कीं जे शस्त्रविद्येंत निपुण असून, अस्त्रविद्येचे तर साक्षात् अवतार आहेत. फार कशाला, यांच्यापासून अस्त्रविद्या जगांत इतकी प्रसिद्धीस आली ! ९ हे जरी अति बलवान् आहेत, व जगांत जरी यांच्या तोडीचे दुसरे योद्धे नाहींत, तरी ते जिवाभावानें मलाच अनुसरले आहेत. ११० ज्याप्रमाणें पतिव्रतेचें मन सुद्धां पतीवांचून दुसरे ठिकाणीं जात नाहीं; केवळ पतीच्याच ठिकाणीं असतें, त्याप्रमाणें या वीरांना मी जीव कीं प्राण आहें.११हे स्वामिभक्तीविषयीं इतके निस्सीम आहेत कीं, आमच्या कामापुढें ते आपले प्राणही कमी योग्यतेचे समजतात. १२ हे युद्धकलेमध्यें निष्णात असून सर्व कला व कीर्ति यांचें जीवन आहेत. फार काय सांगावें, क्षत्रियांचा धर्म यांच्यापासूनच प्रसिद्धीस आला ! १३ याप्रमाणें आमच्या सैन्यांत सर्वतोपरी पराक्रमी असे अपार वीर आहेत; त्यांची किती म्हणून गणती करावी. १४

**भीष्मानें रक्षण केलेलें तें आमचें सैन्य अपरिमित आहे, आणि भीमानें रक्षण केलेलें पांडवांचें हें सैन्य परिमित आहे. ॥१०॥**

तशांत, सर्व क्षत्रियांमध्यें श्रेष्ठ आणि जगांतील सर्व योद्ध्यांमध्यें प्रतापी असे जे भीष्माचार्य, त्यांच्याकडे या सर्व सैन्याचें आधिपत्य दिलेलें आहे. १५ त्यांनीं हें सर्व सैन्य आवरून अशा बेतानें रचिलें आहे कीं, जणूं काय हे किल्लेच बांधले आहेत; त्यांच्या शौर्यापुढें त्रिभुवन देखील तुच्छ आहे. १६ विचार केला असतां ज्याप्रमाणें सर्व प्रकारें समुद्र दुस्तर असून आणखी त्यास वडवानलानें साह्य व्हावें, १७ किंवा प्रलयकालच्या अग्नीला महावाताचें साहाय्य मिळून त्या उभयतांचा जसा संयोग व्हावा, तसें आमच्या या अफाट सैन्यास भीष्म हे सेनापति मिळाले आहेत. १८ तेव्हां या आमच्या सैन्याबरोबर कोण युद्ध करील ? पांडवांचें सैन्य खरोखर अगदीं थोडें आहे; परंतु त्याची रचना मात्र मोठी दिसते.१९ व त्याचें सेनापत्य दांडग्या भीमसेनानें स्वीकारलें आहे. इतकें सांगूनही द्रोणाचार्यांचे मनावर कांहीं परिणाम होत नाहीं असें पाहून तो स्तब्ध राहिला. १२०.

**सैनिकहो, व्यूहांत प्रवेश करण्याच्या मार्गीं तुम्हीं सर्वांनीं आपआपल्या स्थानीं उभें राहून भीष्मांचेंच सर्व प्रकारें रक्षण करावें. ॥ ११ ॥**

मग फिरून सर्व सेनापतींस म्हणालाः—अहो आतां आपआपलें सैन्य सज्ज करा. २१ ज्यांच्या ताब्यांत सैन्याच्या ज्या अक्षौहिणी आहेत, त्यांतील श्रेष्ठ महारथ्यांनीं आपआपल्या अक्षौहिणीपुढें जाऊन उभें रहावें. २२ आणि त्यांनीं त्या त्या अक्षौहिणी संभाळून भीष्मांच्या आज्ञेंत वागावें. नंतर तो द्रोणाचार्यांस म्हणाला, "तुम्हीं सर्व सैन्यावर देखरेख ठेवावी, २३ आणि भीष्मांस मज प्रमाणेंच, समजून त्यांचें रक्षण करावें; कारण, आमच्या सर्व सैन्याची भिस्त त्यांच्यावरच आहे." २४

**संजय म्हणालाः—मग दुर्योधनाच्या मनास हर्ष उत्पन्न करण्याकरितां महाप्रतापी व कुरुकुलांत वृद्ध असे पितामह भीष्म यांनीं मोठ्यानें सिंहगर्जन करून शंख वाजविला ॥१२॥**

राजा दुर्योधनाचें हें भाषण ऐकून भीष्मांस फार संतोष झाला, आणि त्यांनीं सिंहनाद केला. २५ तो नाद दोन्ही सैन्यांत दुमदुमून गेला; इतका कीं, त्याचा प्रतिध्वनि आकाशांत देखील मावेना. २६ तो प्रतिध्वनि होत आहे तोंच वीरवृत्तीच्या बळानें भीष्मांनीं आपला दिव्य शंख वाजविला. २७ ते दोन्ही नाद एकत्र झाले तेव्हां आकाश

**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।**
**नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥१९॥**

परमेष्वासः काश्यः महारथः शिखंडी च धृष्टद्युम्नः विराटः च अपराजितः सात्यकिः च ॥ १७ ॥ द्रुपदः द्रौपदेयाः च महाबाहुः सौभद्रः (च) सर्वशः पृथिवीपते पृथक् पृथक् शंखान् दध्मुः ॥१८॥ सः तुमुलः घोषः नभः च पृथिवीं च एव व्यनुनादयन् धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ॥१९॥

तेथ भूपती होते अनेक । द्रुपद द्रौपदेयादिक । हा काशीपती देख । महाबाहू ॥५१॥ तेथ अर्जुनाचा सुतु । सात्यकि अपराजितु । धृष्टद्युम्नु नृपनाथु । शिखंडी हन ॥५२॥ विराटादि नृपवर । जे सैनिक मुख्य वीर । तिहीं नानाशंख निरंतर । आस्फुरिले ॥ ५३ ॥ तेणें महाघोषनिर्घातें । शेष कूर्म अवचितें । गजबजोनि भूभारातें । सांडूं पाहती ॥५४॥ तेथ तिन्ही लोक डळमळित । मेरु मांदार आंदोळित । समुद्रजळ उसळत । कैलासवेरी ॥५५॥ पृथ्वीतळ उलथों पहात । आकाश असे आरुडत । तेथ सडा होत । नक्षत्रांचा ॥५६॥ सृष्टि गेली रे गेली । देवां मोकळवादी जाहली । ऐशी एक टाळी पिटिली । सत्यलोकीं ॥५७॥ दिहाचि दिन थोकला । जैसा प्रळयकाळ मांडला । तैसा हाहाकारु जाहला । तिहीं लोकीं ॥५८॥ तें देखोनि आदिपुरुष विस्मितु । म्हणे झणें होय पां अंतु । मग लोपिला अद्भुतु । संभ्रमु तो ॥५९॥ म्हणोनि विश्व संवरलें । एऱ्हवीं युगान्त होतें वोडवलें । जैं महाशंख आस्फुरिले । कृष्णादिकीं १६० तो घोष तरी उपसंहरला । परी पडिसाद होता राहिला । तेणें दळभार विध्वंसिला । कौरवांचा ॥६१॥ जैसा गजघटाआंतु । सिंह लीला विदारितु । तैसा हृदयातें भेदितु । कौरवांचिया ॥६२॥ तो गाजत जंव आइकती । तंव उभेचि हियें घालिती । एकमेकांतें म्हणती । सावधरे सावध ॥६३॥

**अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ।**
**प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥२०॥**

अथ कपिध्वजः पांडवः धार्तराष्ट्रान् व्यवस्थितान् दृष्ट्वा शस्त्रसंपाते प्रवृत्ते (सति) धनुः उद्यम्य ॥२०॥

तेथ बळें प्रौढीपुरते । महारथी वीर होते । तिहीं पुनरपि दळातें । आवरिलें ॥६४॥ मग सरिसेपणें उठावले । दुणवटोनि उचलले । तया दंडीं क्षोभलें । लोकत्रय ॥६५॥ तेथ बाणवरी धनुर्धर । वर्षताति निरंतर । जैसे प्रळयांत जलधर । अनिवार का ॥६६॥ ते देखलिया अर्जुनें । संतोष घेउनि मनें । मग संभ्रमें दिठी सेने । घालितसे ॥६७॥ तंव संग्रामीं सज्ज जाहले । सकळ कौरव देखिले । तंव लीला धनुष्य उचलिलें । पंडुकुमरें ६८

**हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।**

तदा महीपते, हृषीकेशं इदं वाक्यं आह.

अर्जुन उवाचः—

**सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥२१॥**
**यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।**
**कैर्मया सह योद्धव्यमस्मिन् रणसमुद्यमे ॥२२॥**
**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।**
**धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥२३॥**

अच्युत, अहं यावत् एतान् योद्धुकामान् अवस्थितान् निरीक्षे तावत् उभयोः सेनयोः मध्ये मे रथं स्थापय. अस्मिन् रणसमुद्यमे मया कैः सह योद्धव्यं (तत् अहं अवेक्षे) दुर्बुद्धेः धार्तराष्ट्रस्य युद्धे प्रियचिकीर्षवः ये एते अत्र समागताः तान् योत्स्यमानान् अहं अवेक्षे ॥२१।२२।२३॥

ते वेळीं अर्जुन म्हणतसे देवा । आतां झडकरी रथु पेलावा । नेऊनि मध्यें घालावा । दोहीं दळां ॥६९॥ जंव मी नावेक । हे सकळ वीर सैनिक । न्याहाळीन अशेख । झुंजते जे ॥१७०॥ एथ आले असती आघवे । परी कवणेंसीं म्यां झुंझावें । हें रणीं लागे पहावें । म्हणऊनियां ॥७१॥ बहुतकरूनि कौरव । हे आतुर दुःस्वभाव । वांटिवेवीण हांव । बांधिती झुंजीं ॥७२॥ झुंजाची आवडी धरिती । परी संग्रामीं धीर नव्हती । हें सांगोनि राया-प्रती । काय बोले ॥७३॥

संजय उवाचः—

**एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।**
**सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् २४**
**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।**
**उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥२५॥**

दुमून गेला व त्यानें दुर्योधनादिकांचें हृदय विदारिलें ! ॥१९॥

द्रुपद राजा, महावीर काशिराजा, द्रौपदीचे पुत्र इत्यादि अनेक राजे व वीर, त्या ठिकाणीं जमले होते; ५१ त्याचप्रमाणें अर्जुनाचा मुलगा अभिमन्यु, अजिंक्य असा सात्यकि, नृपश्रेष्ठ धृष्टद्युम्न, शिखंडी, ५२ त्याचप्रमाणें विराट व इतर जे जे सेनानायक होते,तेही आपापले निरनिराळ्या तऱ्हेचे शंख एकसारखे वाजवूं लागले. ५३ त्या शंखांच्या महाध्वनीच्या आघातानें शेष व कूर्म हे एंकदम दचकले, आणि पृथ्वीचा भार टाकून देण्यास प्रवृत्त झाले. ५४ त्या योगानें त्रैलोक्य डळमळूं लागलें, मेरु व मांदार हे हालूं लागले, समुद्राचें पाणी कैलासापर्यंत उसळलें, ५५ पृथ्वी पालथी होते कीं काय व आकाश कोसळून पडतें कीं काय असें वाटूं लागलें, आणि नक्षत्रांचा सडा होऊं लागला ! ५६ सत्यलोकीं, ‘ सृष्टि बुडालीरे बुडाली, आतां देव निराधार झाले ’ अशी एकच हाकाटी झाली; ५७ सूर्य दिवसाच थांबला; आणि प्रळयकालचे वेळेप्रमाणें तिन्ही लोकांत हाहाकार उडून गेला. ५८ तें पाहून भगवान श्रीकृष्ण फार विस्मित झाले, आणि कदाचित् सृष्टीचा अंत होईल असें जाणून, त्यांनीं तो अद्भुत शंखनाद बंद केला, ५९ म्हणूनच हें जग वांचलें; नाहींतर कृष्णादिकांनीं जेव्हां शंख वाजविले, तेव्हांच त्याचा अंत होण्याची वेळ आली होती.१६० तो शंखनाद बंद झाला, तथापि त्याचा जो प्रतिध्वनि घुमत होता, त्या योगानें कौरवसैन्याची दाणादाण झाली. ६१ सिंहाच्या सहज लीलेनें जसें हत्तींच्या समुदायाचें विदारण होतें, तसें त्या शंखनादानें कौरवांचें हृदय फाटून गेलें. ६२ तो ध्वनि ऐकून उभ्याउभ्याच सर्वांचें धैर्य सुटलें आणि एकमेकांस सावध रे सावध असें म्हणूं लागले. ६३

नंतर ज्याच्या ध्वजस्तंभावर मारुति होता, अशा अर्जुनानें दुर्योधनादिक कौरव वीर युद्धाकरितां व्यवस्थित रीतीनें उभे राहिले आहेत असें पाहून, आतां शस्त्रांचे प्रहार सुरू होणार तों, धनुष्य उचलिलें, ॥२०॥

त्या ठिकाणीं, बलानें व पुरुषार्थानें युक्त असे जे महारथी होते, त्यांनीं सैन्याला पुनः धीर देऊन सावरिलें.६४ मग ते मोठ्या तयारीनें पुढें सरसावले, व त्यांनीं दुप्पट आवेशानें चाल केली. तेव्हां त्या आवेशयुक्त सैन्याच्या योगानें त्रिभुवन अगदीं त्रस्त होऊन गेलें. ६५ त्या धनुर्धारी वीरांनीं बाणांची एकसारखी इतकी वृष्टि केली कीं, जणूं काय प्रलयकालची भयंकर पर्जन्यवृष्टिच होत आहे ! ६६ तें पाहून अर्जुनाच्या मनाला फार संतोष झाला, व त्यानें, मोठ्या गंभीरतेनें सैन्यावर नजर टाकली.६७तेव्हां सर्व कौरव युद्धास सिद्ध झालेले पाहून पंडुपुत्रानें सहज लीलेनें धनुष्य उचललें. ६८

आणि, त्या वेळेस, हे धृतराष्ट्र राजा, अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला कीं, “ हे कृष्णा, माझा रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं युद्धाच्या इच्छेनें उभ्या असलेल्या वीरांना मी न्याहाळून पाहींपर्यंत उभा कर. ह्या रणामध्यें मला कोणाबरोबर युद्ध करावयाचें आहे, हें मी पाहतों व अधर्मनिष्ठ दुर्योधनाला यश मिळावें या हेतूनें जे हे योद्धे येथें आले आहेत, त्यांस मी अवलोकन करितों ! ” ॥२१–२२–२३॥

मग अर्जुन म्हणाला, “ देवा, आतां आपला रथ लौकर नेऊन दोन्ही सैन्यांचे मध्यें उभा करा. ६९ म्हणजे येथें युद्ध करण्याकरितां आलेल्या सर्व वीरांस मी क्षणभर न्याहाळून पाहीन. १७०कारण, येथें जरी सर्व वीर जमले आहेत, तरी समरांगणीं मला कोणकोणाशीं युद्ध करावयाचें आहे तें पाहिलें पाहिजे. ७१ हे उतावळे व दुष्टबुद्धि कौरव बहुतकरून अंगांत पराक्रम नसतां युद्धाविषयीं डौल मारीत असतात. ७२ यांना युद्धाची हौस आहे खरी; परंतु यांच्याच्यानें रणभूमीवर टिकाव धरवत नाहीं.” इतकें राजाप्रत सांगून संजय पुढें म्हणालाः—७३

संजय म्हणालाः—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें अर्जुन श्रीकृष्णास बोलल्यावर श्रीकृष्णांनीं दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं भीष्म, द्रोण व सर्व राजे यांच्या समोर तो दिव्य रथ नेऊन उभा केला, आणि अर्जुनास म्हटलें, “ येथें आलेल्या सर्व

**तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान्। आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि। तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् २७॥ कृपया परयाऽऽविष्टो विषीदन्निदमब्रवीत्।**

भारत, एवं गुडाकेशेन उक्तः हृषीकेशः उभयोः सेनयोः मध्ये भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षितां(प्रमुखतः) रथोत्तमं स्थापयित्वा पार्थ एतान् समवेतान् कुरून् पश्य इति उवाच. तत्र पार्थः पितॄन् अथ पितामहान् आचार्यान् मातुलान् भ्रातॄन् पुत्रान् पौत्रान् तथा सखीन् श्वशुरान् सुहृदः च एव उभयोः अपि अपश्यत्. सः कौन्तेयः तान् सर्वान् बंधून् अवस्थितान् समीक्ष्य परया कृपया आविष्टः विषीदन् इदम् अब्रवीत् ॥२४। २५।२६।२७॥

आइका अर्जुन इतकें बोलिला। तंव श्रीकृष्णें रथु पेलिला। दोहीं सैन्यांमाजीं केला। उभा तेणें ॥७४॥ जेथ भीष्मद्रोणादिक। जवळिकेची सन्मुख। पृथिवीपति आणिक। बहुत आहाती ॥७५॥ तेथ स्थिर करूनियां रथु। अर्जुन असे पाहातु। तो दळभार समस्तु। संभ्रमेंसीं ॥७६॥ मग देवा म्हणे देख देख। हे गोत्रगुरु अशेख। तंव कृष्णमनीं नावेक। विस्मो जाहला ॥७७॥ तो आपणयां आपण म्हणे। एथ कायी कवण जाणे। हें मनीं धरिलें येणें। परि कांहीं आश्चर्य असे ॥७८॥ ऐसी पुढील से घेतु। तो सहजें जाणे हृदयस्थु। परि उगा असे निवांतु। तिये वेळीं ॥७९॥ तंव तेथ पार्थ सकळ। पितृ पितामह केवळ। गुरु बंधु मातुळ। देखता जाहला ॥१८०॥ इष्ट मित्र आपुले। कुमरजन देखिले। हे सकळ असती आले। तयांमाजीं ॥८१॥ सुहृज्जन सासरे। आणीकही सखे सोइरे। कुमर पौत्र धनुर्धरें। देखिले तेथ ॥८२॥ जयां उपकार होते केले। कीं आपदीं जे रक्षिले। हे असो वडिल धाकुले। आदिकरुनी ॥८३॥ ऐसें गोत्रचि दोहीं दळीं। उदित जालें असे कळीं। हें अर्जुनें तिये वेळीं। अवलोकिलें ॥८४॥

तेथ मनीं गजबज जाहाली। आणि आपैसीं कृपा आली। तेणें अपमानें निघाली। वीरवृत्ति ॥८५॥ जिया उत्तम कुळींचिया होती। आणि गुणलावण्य आथी। तिया आणिकीतें न साहती। सुतेजपणें ॥८६॥ नविये आवडीचेनि भरें। कामुक निज वनिता विसरे। मग पाडेंवीण अनुसरे। भ्रमला जैसा ॥८७॥ कीं तपोबळें ऋद्धी। पातलिया भ्रंशे बुद्धी। मग तया विरक्तता सिद्धि। आठवेना ॥८८॥ तैसें अर्जुना तेथ जाहलें। असतें पुरुषत्व गेलें। जे अंतःकरण दिधलें। कारुण्यासी ॥८९॥ देखा मंत्रज्ञ बरळु जाय। मग तेथ का जैसा संचारु होय। तैसा तो धनुर्धर महामोहें। आकळिला ॥१९०॥ म्हणऊनि असतां धीरु गेला। हृदया द्रावो आला। जैसा चंद्रकळीं शिवतला। सोमकांतु ॥९१॥ तयापरी पार्थु। अतिस्नेहें मोहितु। मग सखेद असे बोलतु। श्रीअच्युतेसीं ॥९२॥

अर्जुन उवाचः--

**दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥२८॥ सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति। वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥२९॥ गांडीवं स्रंसते हस्तात् त्वक्चैव परिदह्यते। न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः॥३०॥**

कृष्ण, इमं स्वजनं युयुत्सुं समुपस्थितं दृष्ट्वा मम गात्राणि सीदन्ति मुखं च परिशुष्यति शरीरे वेपथुः च रोमहर्षः च जायते हस्तात् गांडीवं स्रंसते त्वक् च एव परिदह्यते अवस्थातुं न च शक्नोमि मे मनः च भ्रमति इव ॥३०॥

तो म्हणे अवधारी देवा। म्यां पाहिला हा मेळावा। तंव गोत्रवर्गु आघवा। देखिला एथ ॥९३॥ हे संग्रामीं उदित। जहाले असती कीर समस्त। पण आपणपेयां उचित। केवीं होय ९४ येणें नावेंचि नेणों कायी। मज आपणपें सर्वथा नाहीं। मन बुद्धी ठायीं। स्थिर नोहे ॥९५॥ देखे देह कांपत। तोंड असे कोरडें होत। विकळता उपजत। गात्रांसीही ॥९६॥ सर्वांगा कांटाळा आला। अति संतापु उपनला। तेथें बेंबळ हातु गेला। गांडिवाचा ॥९७॥ तें न धरतचि निष्टलें। पारि नेणेंचि हातोनि पडिलें। ऐसें हृदय असे व्यापिलें। मोहें येणें ॥९८॥ जें वज्रापासोनि कठिण। दुर्धर अतिदारुण। तयाहून असाधारण। हें

कौरव मंडळीस अवलोकन कर " तेव्हां अर्जुनानें वडील, आजे, गुरु, मामे, भाऊ, मुलगे, नातू, मित्र, सासरे, व आपले हितकर्ते दोन्ही सैन्यांत उभे आहेत असें पाहिलें. त्या आप्तसुहृदांना पाहून तो करुणेनें युक्त झाला व खिन्न होत्साता बोलला. ॥२४–२५–२६–२७॥

राजा, ऐक, अर्जुनाचें हें भाषण श्रवण करतांच श्रीकृष्णांनीं रथ नेऊन दोन्ही सैन्यांच्यामध्यें उभा केला. ७४ ज्या ठिकाणीं भीष्मद्रोणादिक आप्तसंबंधी व अनेक राजे समोर उभे आहेत, ७५ त्या ठिकाणीं रथ उभा केला असतां अर्जुन त्या सेनेकडे गंभीरतेनें न्याहाळून पाहूं लागला. ७६ मग म्हणाला, " देवा, पहा पहा, हे तर सर्व आमचे आप्तवर्ग व गुरु आहेत ! " हें ऐकून श्रीकृष्णांस क्षणभर आश्चर्य वाटलें. ७७ ते आपल्या मनांत म्हणतात, अर्जुनानें हें मनांत काय आणलें कोण जाणे; परंतु ज्या अर्थी तो असें म्हणत आहे त्या अर्थी कांहीं तरी चमत्कारिक प्रकार आहे. ७८ दुसऱ्याचें मनोगत सहज जाणणारे असल्यामुळें त्यांनीं पुढील भविष्य जाणलें; परंतु त्या वेळेस कांहीं एक न बोलतां ते स्तब्ध राहिले. ७९ तेव्हां अर्जुनानें आपले सर्व वडील, आजे, गुरु, बंधु व मामा असे पाहिले. १८० आपले इष्टमित्र व मुलगे हे सर्व त्या ठिकाणीं आलेले पाहिले. ८१ तसेच अर्जुनानें आपले जिवलग मित्र, सासरे, आप्तवर्ग व नातू हेहीं त्या ठिकाणीं आलेले पाहिले. ८२ ज्यांच्यावर त्यानें उपकार केले होते, व ज्यांचें संकटसमयीं रक्षण केलें होतें, फार काय, परंतु एकंदर वडील व धाकटे यांसुद्धां ८३ आपले सर्व गोत्रज दोन्ही सैन्यांत युद्धाकरितां तयार झालेले अर्जुनानें त्या वेळेस पाहिले. ८४

त्या वेळीं त्याचें मन बावरून जाऊन त्यास आपोआप करुणा उत्पन्न झाली, व त्या अपमानामुळें वीरवृत्ति अर्जुनास सोडून निघाली. ८५ ज्या स्त्रिया उत्तम कुळांतल्या असून गुणी व लावण्यवती असतात, त्यांना आपल्या सतेजपणामुळें दुसऱ्या स्त्रियांचें वर्चस्व सहन होत नाहीं. ८६ ज्याप्रमाणें नवीन स्त्रीच्या आवडीचे भरांत विषयी पुरुष आपल्या स्त्रीस विसरून जसे झालेल्या मनुष्याप्रमाणें सौम्य-तेवाचून तिच्या नादीं लागतो. ८७ किंवा तपश्चर्येच्या योगानें ऋद्धिसिद्धि प्रसन्न झाल्या असतां वैराग्यशील पुरुषांचे बुद्धीस भ्रम पडून त्याला ज्याप्रमाणें वैराग्याची आठवण राहात नाहीं, ८८ त्याप्रमाणें, अर्जुनानें आपल्या अंतःकरणांत करुणेस थारा दिल्यामुळें त्याचें पौरुषत्व गेलें. ८९ असें पहा कीं, मांत्रिक मंत्रोच्चार करण्यांत चुकूं लागला म्हणजे त्यालाच बाधा होते, त्याप्रमाणें अर्जुन महामोहानें व्याकुळ झाला, १९० व त्याचे ठिकाणीं स्वभावतः असलेला धीर खचून जाऊन त्याच्या हृदयांत दयेचा पाझर फुटला ! ज्याप्रमाणें चंद्रकिरणांचा स्पर्श होण्याबरोबर चंद्रकांत मण्यास पाझर फुटतो, ९१ त्याप्रमाणें तो स्नेहानें अतिमोहित झाला, व मग खेदयुक्त अंतःकरणानें श्रीकृष्णांशीं बोलूं लागला. ९२

अर्जुन म्हणाला:—कृष्णा, हे आप्तजन युद्धासाठीं तयार झालेले पाहून ॥२८॥ माझीं गात्रें शिथिल झालीं, तोंडचें पाणी पळालें, शरीरास कंप सुटला, रोमांच उभे राहिले, ॥२९॥ गांडीव धनुष्य हातांतून गळून पडलें, सर्वांगाचा दाह होऊं लागला व आतां मला येथें उभें राहवत नाहीं ! माझें मन फार भ्रमण पावत आहे. ॥३०॥

अर्जुन म्हणाला, " देवा, असें पहा–मीं हा सर्व सैन्यसमुदाय पाहिला, तों येथें सर्व माझे गोत्रजच माझ्या दृष्टीस पडले. ९३ हे सर्व युद्ध करण्याकरितां तयार झाले आहेत खरे; परंतु यांच्या बरोबर युद्ध करणें आपल्यास कसें उचित होईल, ९४ यांच्याशीं युद्ध करण्याची गोष्ट काढतांच माझें भान नाहींसें झालें आणि मन व बुद्धि हींही स्वस्थ नाहींत. ९५ हें पहा, माझ्या सर्व अंगास कंप सुटला असून तोंडास कोरड पडली आहे, व गात्रें शिथिल झालीं आहेत. ९६ सर्वांगावर कांटा उभा राहून अति त्रास झाल्यामुळें गांडीव धनुष्य धरण्याचा हात ढिला पडला; ९७ व त्यामुळें तें माझ्या हातून केव्हां गळून पडलें हें देखील मला समजलें नाहीं, इतकें माझें अंतःकरण आप्तवर्गाच्या मोहानें व्याप्त झालें आहे ! ९८ व त्यामुळें तें बरोबर धरलें गेलें नाहीं, म्हणून माझें अंतःकरण वज्रापेक्षांही कठीण असून दुसऱ्यास दाद न देणारें असें

स्नेह नवल ॥१९९॥ जेणें संग्रामीं हरु जिंतिला । निवातकवचांचा ठावो फेडिला । तो अर्जुन मोहें कवळिला । क्षणामाजीं ॥२००॥ जैसा भ्रमर भेदी कोडें । भलतैसें काष्ठ कोरडें । पारि कळिकेमाजीं सांपडे । कोंवळिये ॥१॥ तेथ उत्तीर्ण होईल प्राणें । पारि तें कमळदळ चिरूं नेणे । तैसें कठिण कोवळेपणें । स्नेह देखा ॥२॥ हे आदिपुरुषाची माया । ब्रह्मेयाही नयेचि आया । म्हणवूनि भुलविला ऐके राया । संजयो म्हणे ॥३॥ अवधारी मग तो अर्जुनु । देखोनि सकळ स्वजनु । विसरला अभिमानु । संग्रामींचा ॥४॥ कैसी नेणो सदयता । उपनली तेथें चित्ता । मग म्हणे कृष्णा आतां । नसिजे एथ ॥५॥ माझें अतिशयें मन व्याकुळ । होतसे वाचा बरळ । जे वधावे हे सकळ । येणें नांवें ॥६॥

**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।**
**न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥३१॥**

केशव, विपरीतानि च निमित्तानि पश्यामि आहवे च स्वजनं हत्वा श्रेयः न अनुपश्यामि ॥३१॥

या कौरवां जरी वधावें । तरी युधिष्ठिरादिकां कां न वधावें । हे येरयेर आघवे । गोत्रज आमुचे ॥७॥ म्हणोनि जळो हें झुंज । प्रत्यया नये मज । एणें काय काज । महापापें ॥८॥ देवा बहुतीपरी पाहतां । एथ वोखटें होईल झुंजतां । वर कांहीं चुकवितां । लाभु आथी ॥९॥

**न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।**
**किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ३२**
**येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानिच ।**
**तइमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च३३**
**आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।**
**मातुलाः श्वशुराःपौत्राःश्यालाःसंबंधिनस्तथा ३४**

कृष्ण, विजयं न कांक्षे न च राज्यं सुखानि च, गोविंद, नः राज्येन किम् भोगैः जीवितेन वा किम् ॥३२॥ येषां अर्थे नः राज्यं कांक्षितं भोगाः सुखानि च ते इमे आचार्याः पितरः पुत्राः तथा एव च पितामहाः मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः तथा संबंधिनः प्राणान् धनानि च त्यक्त्वा युद्धे अवस्थिताः ॥३३।३४॥

तया विजयवृत्ती कांहीं । मज सर्वथा काज नाहीं । एथ राज्य तरी कायी । हे पाहुनियां ॥२१०॥ या सकळांतें वधावें । मग जे भोग भोगावे । ते जळोत आघवे । पार्थु म्हणे ॥११॥ तेणें सुखेंविण होईल । तें भलतैसें साहिजेल । वरी जीवितही वेंचिजेल । याचिलागीं ॥१२॥ परी यांसी घातु कीजे । मग आपण राज्यसुख भोगिजे । हें स्वप्नींही मन माझें । करूं न शके ॥१३॥ तरी आम्हीं कां जन्मावें । कवणालागीं जियावें । जरी वडिलां यां चिंतावें । विरुद्ध मनें ॥१४॥ पुत्रातें इच्छी कुळ । तयाचें कायि हेंचि फळ । जे निर्दळिजे केवळ । गोत्र आपुलें ॥१५॥ हें मनींचि केविं धरिजे । आपण वज्राचेया होईजे । वरी घडे तरी कीजे । भलें इयां ॥१६॥ आम्हीं जें जें जोडावें । तें समस्तीं इहीं भोगावें । हें जीवितही उपकारावें । काजीं यांच्या ॥१७॥ आम्ही दिगंतीचे भूपाळ । विभांडुनि सकळ । मग संतोषविजे कुळ । आपुलें जें ॥१८॥ तेचि हे समस्त । परी कैसें कर्म विपरीत । जे जहाले असती उद्यत । झुंजावया ॥१९॥ अंतोरिया कुमरें । सांडोनियां भांडारें । शस्त्राग्रीं जिव्हारें । आरोपुनी ॥२२०॥ ऐसियांतें कैसेनि मारूं । कवणावरी शस्त्र धरूं । निज हृदया करूं । घातु केवीं ॥२१॥ हे नेणसी तूं कवण । परी पैल भीष्म द्रोण । जयांचे उपकार असाधारण । आम्हां बहुत ॥२२॥ एथ शालक सासरे मातुळ । आणि बंधु कीं हे सकळ । पुत्र नातू केवळ । इष्टही असती ॥२३॥ अवधारी अति जवळिकेचे । हे सकळही सोयरे आमुचे । म्हणोनि दोष आथी वाचे । बोलतांचि ॥२४॥

अतिभयंकर आहे, परंतु यापेक्षांही हा मोह विशेष कठीण आहे, हें मोठें आश्चर्य आहे! "१९ ज्यानें युद्धांत शंकरासही जिंकिलें, व निवातकवच राक्षसांचा मागमूस नाहींसा केला, तो अर्जुन मोहानें एका क्षणांत व्याप्त झाला! २०० भुंगा हा पाहिजे त्या वाळलेल्या लाकडास सहज भोंक पाडतो, परंतु कोंवळ्या कमळाच्या कळीमध्यें ती मिटल्यावर अडकला जातो; १ तो त्या ठिकाणीं प्राणासही मुकेल, परंतु तें कमलदल फाडून बाहेर निघण्याचें त्याच्या मनांत सुद्धां येत नाहीं; त्याप्रमाणेंच आप्तवर्गाची मोहममता तोडण्यास सोपी असून कठीण झाली आहे. २ संजय म्हणतोः—राजा धृतराष्ट्रा, हा मोह म्हणजे परमेश्वराची माया आहे. ही ब्रह्मदेवालाही आवरत नाहीं. म्हणून अर्जुनास तिनें व्याकुळ केलें. ३ राजा, ऐक; मग आपले सर्व आप्तवर्ग पाहून अर्जुनाच्या हृदयांतील युद्धाविषयींचा अभिमान मावळून गेला. ४ त्याठिकाणीं त्याचे मनांत करुणा कशी उद्भवली हें कळत नाहीं. मग तो श्रीकृष्णास म्हणाला, देवा, मला वाटतें, आतां येथें राहूं नये. ५ या सर्वांस मारावयाचें ही गोष्ट मनांत आल्यावरोबर माझें मन अति व्याकुळ होऊन बोबडी वळली आहे. ६

**आणि, हे केशवा, येथें कांहीं विपरीत होईल अशीं चिन्हें दिसतात, व युद्धामध्यें स्वजनांचा घात केला असतां पुरुषार्थ होईल असें मला वाटत नाहीं. ॥३१॥**

या कौरवांना जर मारावयाचें, तर मग धर्मराजादिकांना कां मारूं नये? कारण, हे सर्व परस्पर आमचे गोत्रजच आहेत ७ म्हणून, देवा, आग लागो या युद्धाला; मला कांहीं तें पसंत पडत नाहीं. असलें महापातक करून आम्हांला काय करायाचें आहे? ८ देवा, अनेक प्रकारें विचार करून पाहतां युद्ध केल्यास त्याचा परिणाम वाईटच होईल असें वाटतें; पण जर तें टाळलें, तर मात्र कांहीं तरी कल्याण होईल. ९

**कृष्णा, मला जय, राज्य व सुख यांची अपेक्षा नाहीं. गोविंदा, आम्हांस राज्य व भोग भोगून किंवा जगून तरी काय करावयाचें आहे? ॥३२॥ कारण, ज्यांच्याकरितां आम्हीं राज्य, भोग व सुखें यांची इच्छा करावयाची, ते हे गुरु, वडील, पुत्र, आजोबा, मामा, सासरे, नातू, मेहुणे व तसेच इतर आप्तवर्ग या ठिकाणीं आपल्या प्राणांवर व धनावर उदार होऊन युद्धाकरितां उभे आहेत! ॥३३।३४॥**

अशा रीतीनें जय मिळविण्याची मला मुळींच गरज नाहीं, व असलें राज्य मिळवून तरी काय करावयाचें आहे? २१० अर्जुन म्हणाला, या सर्वांचा वध करून जे भोग भोगावयाचे, त्या सर्वांस आग लागो! ११ या असल्या सुखाशिवाय वाटतील तीं दुःखें आम्ही सोसूं, व यांच्याकरितां आम्हीं आपले प्राण देखील खर्ची घालूं; १२ परंतु यांचा घात करून आपण राज्यसुख भोगावें ही गोष्ट माझ्या स्वप्नांतही येणार नाहीं. १३ जर आमच्या वडील मंडळींचें आम्हीं अहित चिंतलें, तर मग आम्हीं जन्मास तरी यावयाचें कशाकरितां व जगावयाचें तरी कोणासाठीं? १४ कुळांत पुत्रप्राप्तीची इच्छा करितात, त्याचें हेंच का फळ! कीं त्या पुत्रानें आपल्या गोत्रजांचा संहार करावा! १५ आपलें मन त्याजविषयीं वज्राप्रमाणें कठोर करण्याचें मनांत तरी कसें आणावें? त्याचें आपल्या हातून जेवढें बरें होईल तेवढें करावें. १६ आम्हीं जें जें मिळवावें, त्या सर्वांचा त्यांनीं उपभोग घ्यावा, इतकेंच नव्हे, तर त्यांच्या कामाकरितां आम्हीं आपलें जीवितही खर्च करावें. १७ आम्हीं देशोदेशींचे राजे जिंकावे, व त्यायोगें आपल्या कुळास संतोषित करावें. १८ पण कर्माची किती विपरीत गति आहे, कीं तेच हे आमचे सर्व गोत्रज आम्हांबरोबर युद्ध करण्यास उद्युक्त झाले आहेत! १९ बायका, मुलें व धन ह्या सर्वांस सोडून तरवारीच्या धारेवर ज्यांनीं आपले जीव ठेविले आहेत, २२० अशांना मी कसें मारूं, कोणावर शस्त्र धरूं; आणि मी आपल्याच जिवलगांचा कसा घात करूं? २१ हे कोण आहेत हें तुला माहीत नाहीं काय? ते पहा पलीकडे भीष्म व द्रोण आहेत. त्यांचे आमच्यावर महत् उपकार आहेत. २२ या ठिकाणीं मेहुणे, सासरे, मामा आणि बंधु, तसेच हे सर्व पुत्र, नातू व आप्तही आहेत. २३ हे पहा—हे सर्व आमचे फार जवळचे नातेवाईक आहेत. तेव्हां यांना मारण्याची गोष्ट नुसती तोंडावाटे काढली तरी देखील दोष घडतील. २४

हे मधुसूदना, जरी ह्यांनीं माझा वध केला, तरी मी ह्यांना मारण्याची इच्छा करणार नाहीं. त्रैलोक्याच्या राज्याकरितां देखील मी ह्यांना वधणार नाहीं; मग पृथ्वीच्या राज्याकरितां मी ह्यांना कसा मारीन ? ॥३५॥

उलटपक्षीं ह्यांनीं वाटेल तें जरी केलें, किंवा आम्हांला येथेंच जरी मारिलें, तथापि आपण त्यांचा घात करण्याचें मनांत आणूं नये. २५ निष्कंटक असें त्रिभुवनाचें राज्य जरी प्राप्त झालें, तरी सुद्धां हें अनुचित कर्म मी करणार नाहीं. २६ कृष्णा, जर आज या ठिकाणीं आम्हीं यांचा वध केला, तर कोणाच्या मनांत आमच्याविषयीं आदर राहील ? आणि तूंच सांग कीं, मग तुझें मुख तरी आमच्या कसें दृष्टीस पडेल? २७

हे जनार्दना, कौरवांना मारून आह्मांला काय सुख होणार ? ह्या आततायांच्या वधानें आम्हांस पापच लागेल ! ॥३६॥

कारण, जर मी गोत्रजांचा वध करीन, तर मी दोषांचें घर होईन; व असें झाल्यानें, ज्या तुझी मला प्राप्ति झाली आहे तो तूंहि हातचा जाशील. २८ कुलक्षय केला असतां अनेक पातकें लागतात; अशा प्रसंगीं तुम्हांला कोणीं आणि कोठें शोधावें? २९ ज्याप्रमाणें बागेंत अग्नीचा मोठा भडका झाला असतां कोकिळ पक्षी एक क्षणभरही रहात नाहींत; २३० किंवा तलावांत चिखल झालेला पाहून चकोर पक्षी त्याचें सेवन न करितां तो सोडून चालते होतात, ३१ त्याप्रमाणें, देवा, जर माझी पुण्याई कमी होईल, तर आपण आपल्या मायेनें मला फसवून हातावर तुरी देऊन जाल ! ३२

म्हणून, आपल्या बांधवांस—या कौरवांस—मारणें हें आम्हांस योग्य नाहीं. कारण, माधवा, आपल्या आप्तांना मारून आम्ही सुखी कसे होऊं ? ॥३७॥

म्हणून ही गोष्ट मी कधीं करणार नाहीं, व या समरंगणांत हातांत शस्त्रहि धरणार नाहीं; कारण, हें कृत्य बहुत प्रकारानें निंद्य आहे असें मला वाटतें. ३३ कृष्णा, आपण आम्हांला अंतरलां म्हणजे मग आमची काय गति होईल ? त्या दुःखानें आमचें हृदय कीं हो फाटून जाईल ! ३४ अर्जुन पुढें म्हणतो, म्हणून, देवा, ह्या कौरवांचा वध करून मग आम्हीं राज्याचा उपभोग घ्यावा ही गोष्ट कधींही घडणार नाहीं. ३५

लोभानें चित्त भ्रष्ट झाल्यामुळें, कुलक्षय केल्यापासून लागणारा दोष व मित्राशीं वैर केल्यानें लागणारें पातक हीं जरी हे कौरव पहात नाहींत, ॥३८॥ तरी, हे जनार्दना, कुलक्षय केल्यापासून लागणारें पाप आह्मांस ढळढळीत दिसत असतांहि, या पापापासून निवृत्त होण्याविषयीं आम्हीं कसें जाणूं नये ? ॥३९॥

हे कौरव अभिमानानें उन्मत्त होऊन जरी युद्ध करण्यास आले आहेत, तरी आम्हीं आपलें हित कशांत आहे हें पाहिलें पाहिजे. ३६ आपले आप्त आपणच मारावे अशी गोष्ट कशी करावी ? असें पहा कीं, समजून उमजून कालकूट विष कसें प्यावें ? ३७ अहो, वाट चालत असतांना जर अकस्मात् आपल्या समोर सिंह आला, तर त्याला चुकवून जाणें हेंच श्रेयस्कर आहे. ३८ आपण आयते उजेडांत बसलों असून तेथून उठून जर अंधाऱ्या विहिरींत जाऊन बसलों, तर, देवा, त्यापासून काय लाभ होईल हें तुम्हीच सांगा बरें ! ३९ किंवा समोर अग्नि आहे असें पाहून जर तो आपण बाजूस टाकून गेलों नाहीं, तर एका क्षणांत तो आपल्यास व्यापून जाळून टाकील. २४० त्याप्रमाणें, हे मूर्तिमंत दोष आम्हांला लागतील असें कळल्यावरहि आम्हीं हें काम करण्यास कसें प्रवृत्त व्हावें ? ४१ त्या वेळीं इतकें बोलून अर्जुन श्रीकृष्णांस म्हणाला, देवा, या पातकाची काय थोरवी आहे पहा. ४२

कुलक्षयानें सनातन ( वंशपरंपरा चालत आलेले ) कुलाचार नाहींतसे होतात; आणि कुलाचार नाहींतसे झाले म्हणजे अधर्मानें सर्व कुल व्यापून जातें. ॥४०॥

ज्याप्रमाणें लाकडावर लाकूड घांसलें असतां त्यापासून अग्नि उत्पन्न होतो, आणि त्याचा भडका झाला म्हणजे सर्व लाकडें जळून जातात, ४३ त्याप्रमाणें, आपल्या गोत्रांतच जर मत्सरानें एकमेकांनीं एकमेकांचा वध केला, तर त्या महाघोर दोषांच्या योगानें सर्व कुलाचा क्षय होतो. ४४

म्हणवूनि एणें पापें । वंशजधर्मु लोपे । मग अध-
र्मुचि आरोपे । कुळामाजी ॥४५॥

**अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः ।**
**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥४१॥**

कृष्ण, अधर्माभिभवात् कुलस्त्रियः प्रदुष्यान्ति वार्ष्णेय, स्त्रीषु दुष्टासु वर्णसंकरः जायते ॥४१॥

एथ सारासार विचारावें । कवणें काय आच-
रावें । आणि विधिनिषेध आघवे । पारुषती ॥४६
असता दीपु दवडिजे । मग अंधकारीं राहाटिजे ।
तरी उजूचि का आडळिजे । जयापरी ॥४७॥
तैसा कुळीं कुळक्षयो होय । तये वेळीं तो आद्य-
धर्मु जाय । मग आन कांहीं आहे । पापावांचुनी
॥ ४८॥ जैं यमनियम ठाकती । तेथ इंद्रियें सैरा
राहाटती । ह्मणऊनि व्यभिचार घडती । कुळ-
स्त्रियांसी ॥ ४९॥ उत्तम अधर्मीं संचरती । ऐसे
वर्णावर्ण मिसळती । तेथ समूळ उपडती । जाति-
धर्म ॥२५० ॥ जैसी चोहटाचिये बळी । पाविजे
सैरा काउळीं । तैसीं महापापें कुळीं । संचरती ५१

**संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।**
**पतंति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥४२॥**

संकरः कुलघ्नानां कुलस्य च नरकाय एव. एषांहि पितरः लुप्तपिंडोदकक्रियाः ( सन्तः ) पतन्ति ॥ ४२ ॥

मग कुळा तया अशेखा । आणि कुळघातकां ।
येरयेरां नरका । जाणें आथी ॥५२॥ देखे वंश-
वृद्धि समस्त । यापरी होय पतित । मग वोवां-
डिती स्वर्गस्थ । पूर्वपुरुष ॥५३॥ जेथ नित्यादि
क्रिया ठाके । आणि नैमित्तिक क्रिया पारुखे ।
तेथ कवणा तिळोदकें । कवण अर्पी ॥५४॥ तरी
पितर काय करिती । कैसेनि स्वर्गीं वसती । ह्म-
णोनि तेही येती । कुळापासीं ॥५५॥ जैसा नखाग्रीं
व्याळु लागे । तो शिखांत व्यापी वेगें । तेवीं
आब्रह्म कुळ अवघें । आप्लविजे ॥५६॥

**दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।**
**उत्साद्यंते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥**
**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।**
**नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥४४॥**
**अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।**
**यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः ॥४५॥**

कुलघ्नानां एतैः वर्णसंकरकारकैः दोषैः शाश्वताः जाति-धर्माः कुलधर्माःच उत्साद्यंते ॥४३॥ जनार्दन, उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां नरके नियतं वासः भवति इति अनुशुश्रुम ॥४४॥ बत अहो महत् पापं कर्तुं वयं व्यवसिताः यत् राज्यसुखलोभेन स्वजनं हन्तुं वयं उद्यताः ॥४५॥

देवा अवधारी आणीक एक । एथ घडे महा-
पातक । जे संगदोषें हा लौकिक । भ्रंशु पावे ५७
जैसा घरीं आपुला । वानिवसें अग्नि लागला । तो
आणिकांही प्रज्वळिला । जाळूनि घाली ॥५८॥
तैसिया तया कुळसंगती । जे जे लोक वर्तती ।
तेही बाधा पावती । निमित्तें येणें ५९ तैसें नानां
दोषें सकळ । अर्जुन म्हणे तें कुळ । मग महा-
घोर केवळ । निरय भोगी ॥२६०॥ पडिलिया
तिये ठायीं । मग कल्पांतींही उकलु नाहीं । येसणें
पतन कुळक्षयीं । अर्जुन म्हणे ॥६१॥ देवा हें
विविध कानीं ऐकिजे । परी अझुनिवरी त्रासु नुप-
जे । हृदय वज्राचें हें काय कीजे । अवधारी पां
॥६२॥ अपेक्षिजे राज्यसुख । जयालागीं तें तंव
क्षणिक । ऐसें जाणतांही दोख । अव्हेरू नां
॥६३॥ जे हे वडिल सकळ आपुले । वधावया
दिठी सूदले । सांग पां काय थेकुलें । घडलें
आम्हां ॥६४॥

**यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।**
**धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥**

यदि शस्त्रपाणयः धार्तराष्ट्राः अशस्त्रं अप्रतीकारं मां रणे हन्युः तत् मे क्षेमतरं भवेत् ॥४६॥

आतां यावरी जें जियावें । तयांपासूनि हें
बरवें । जे शस्त्र सांडूनि साहावें । बाण यांचे ६५

म्हणून या कुलक्षयाच्या पापापासून कुलधर्माचा लोप होतो, आणि मग त्या कुलांत अधर्माचा प्रवेश होतो. ४५

**कृष्णा, अधर्मानें कुल व्यापलें असतां, कुलस्त्रिया दुराचरणाविषयीं प्रवृत्त होतात; आणि, हे वार्ष्णेया, त्यांच्या दुष्ट आचरणापासून वर्णसंकर होतो. ॥४१॥**

असें झाल्यावर मग सारासार विचार, योग्यायोग्य आचरण, कर्तव्याकर्तव्य वगैरे गोष्टी दूर राहतात. ४६ असलेला दिवा मालवून अंधारांत फिरूं लागलें म्हणजे ज्याप्रमाणें सहजच मनुष्य सरळ वाटेंतहि ठेंचाळतो, ४७ त्याप्रमाणें, कुलक्षयामुळें कुलधर्म नष्ट झाल्यावर मग त्या कुळांत पापावांचून दुसरी कशाची प्राप्ति होणार ? ४८ मन व इंद्रियें यांचा निग्रह होईनासा झाला म्हणजे इंद्रियें स्वैर वर्तन करूं लागतात, व म्हणून कुलस्त्रियांच्या हातून पापाचरण घडतें, ४९ आणि उत्तम व अधम यांचा समागम होऊन ब्राह्मण शूद्रादि परस्पर वर्ण ह्यांची भेसळ होते, व त्या योगानें सर्व ज्ञातिधर्म समूळ नाहींतसे होतात. २५० कावळे जसे चव्हाट्यावर ठेवलेल्या बळीवर चोहोंकडून झडप घालतात, त्याप्रमाणें, अशा कुलामध्यें चोहों बाजूंनीं महापातकांचा प्रवेश होतो. ५१

**वर्णसंकर झाला म्हणजे कुलाचा घात करणारे पुरुष व तें कुल यांना नरकप्राप्ति होते, आणि पिंडदान व तर्पणादि क्रिया बंद होऊन दोघांचे पितर निश्चयानें नरकांत पतन पावतात ! ॥४२॥**

मग त्या कुळास आणि कुळांचा नाश करणारास अशा दोघांसही नरकप्राप्ति होते. ५२ [ मग ] हें पहा-याप्रमाणें सर्व वंशाची वृद्धि दूषित होऊन त्यांतील स्वर्गस्थ पूर्वज आपोआप पतन पावतात. ज्या कुलांत नित्य व नैमित्तिक कर्मे घडत नाहींत, त्या ठिकाणीं पितरांना तिलोदक कोण अर्पण करणार ? ५५ अशी स्थिति झाल्यावर त्या पितरांनीं काय करावें व स्वर्गांत कसें रहावें ? म्हणून तेहि आपल्या कुलापाशीं येतात. ५५ ज्याप्रमाणें नखास चावलेल्या सापाची वेदना शेंडीपर्यंत सर्वांग व्यापून टाकते, त्याप्रमाणें आप्तवर्गाचा वध करण्यापासून उत्पन्न होणारे हे दोष ह्लीं जिवंत असलेल्या कुलापासून मूळ पुरुषापर्यंत सर्वांस बुडवितात ! ५६

**वर्णसंकर उत्पन्न करणाऱ्या ह्या कुलघातक पुरुषांच्या दोषांमुळें, पुरातन जातिधर्म व कुलधर्म नाहींतसे होतात. ॥४३॥ जनार्दना, ज्यांचे कुलधर्म नष्ट झाले आहेत, त्या मनुष्यांस निश्चयेंकरून नरकप्राप्ति होते असें आम्ही ऐकतों. ॥४४॥ अरेरे ! राज्यसुखाच्या लोभानें आपल्या बांधवांस मारण्यास उद्युक्त झालों, हें केवढें मोठें पाप करण्यास आम्ही तयार झालों आहों ! ४५**

कृष्णा, या ठिकाणीं आणखी एक महापातक घडतें, तें कोणतें म्हणाल तर, या दोषापासून लोकाचार नाहींतसे होतात. ५७ ज्याप्रमाणें घराला एकाएकीं आग लागून तो अग्नि पेटल्यावर घराचे शेजारचीं दुसरींहि घरें जाळून टाकतो, ५८ त्याप्रमाणें, अशा कुलांचा ज्या लोकांस सहवास घडतो, त्यांनाहि त्यांच्या संगतीच्या योगानें पातक लागतें. ५९ अर्जुन म्हणतोः-देवा, त्याप्रमाणेंच, त्या कुलांत नाना प्रकारचे दोष घडून आले म्हणजे मग त्याला भयंकर नरकवास भोगावा लागतो. २६० अर्जुन आणखी म्हणतो, त्या नरकांत पडल्यावर मग कल्पांतींहि तेथून त्याची सुटका होत नाहीं, इतकें या कुलक्षयापासून पतन होतें. ६१ देवा, एवढा वेळपर्यंत चाललेली माझी ही कटकट ऐकूनहि तिजपासून अजून आपल्या मनास त्रास होत नाहीं, तर आपण आपलें मन एवढें कठोर कां केलें ? ६२ असें पहा कीं, कुलक्षय करून ज्याच्याकरितां राज्यसुखाची इच्छा करावयाची, तें शरीर तर क्षणिक आहे असें जाणूनहि आम्हीं कुलक्षयाचे दोष करण्याचें सोडूं नये काय ? ६३ आमचे जे हे सर्व वडील जमले आहेत, त्यांचा वध करावा या हेतूनें मीं त्यांच्याकडे दृष्टि फेंकली हें आमच्या हातून काय लहान पातक घडलें आहे सांगा बरें ? ६४

**म्हणून, मी निःशस्त्र होऊन प्राणसंरक्षणार्थ कांहीं प्रयत्न करीत नसतांना, जरी ह्या शस्त्रधारी कौरवांनीं माझा वध केला, तरी त्यापासून देखील माझें अधिकच कल्याण होईल ! ॥४६॥**

तर असें करून जें वांचावें, त्यापेक्षां आपले हातांतील शस्त्र टाकून कौरवांचे बाण सहन करावे हें बरें. ६५

तयावरी होय जितुकें। तें मरणही वरी निकें। परी येणें कल्मषें। चाड नाहीं ॥६६॥ ऐसें देखून सकळ। अर्जुनें आपुलें कुळ। मग म्हणे राज्य तें केवळ। निरयभोगु ॥६७॥

**एवमुक्त्वाऽर्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत्।**
**विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः॥४७॥**

एवं उक्त्वा शोकसंविग्नमानसः अर्जुनः सशरं चापं विसृज्य संख्ये रथोपस्थे उपाविशत् ॥४७॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादेऽर्जुन विषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः

ऐसें तिये अवसरीं। अर्जुन बोलिला समरीं। संजयो म्हणे अवधारीं। धृतराष्ट्रातें ॥६८॥ मग अत्यंत उद्वेगला। न धरत गहिंवरु आला। तेथ उडी घातली खालां। रथौनियां ॥६९॥ जैसा राजकुमरु पदच्युतु। सर्वथा होय उपहतु। कां रवि राहुग्रस्तु। प्रभाहीनु ॥२७०॥ नातरी महासिद्धिसंभ्रमें। जिंतला तापसु भ्रमें। मग आकळूनि कामें। दीनु कीजे ॥७१॥ तैसा तो धनुर्धरु। अत्यंत दुःखें जर्जरु। दिसे जेथ रहंवरु। त्यजिला तेणें ॥७२॥ मग धनुष्य बाण सांडिले। न धरत अश्रुपात आले। ऐसें ऐक राया वर्तलें। संजयो म्हणे ॥७३॥ आतां यावरी तो वैकुंठनाथु। देखोनि सखेद पार्थु। कवणेपरी परमार्थु। निरूपील ॥७४॥ ते सविस्तर पुढारी कथा। अति सकौतुक ऐकतां। ज्ञानदेवो म्हणे आतां। निवृत्तिदासु ॥२७५॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां प्रथमोऽध्यायः ॥१॥ श्लोक ४७, ओंव्या २७५.



# ज्ञानेश्वरी.

## अध्याय दुसरा.

संजय उवाच—

**तं तथा कृपयाऽऽविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।**
**विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥**

तथा कृपया आविष्टम् अश्रुपूर्णाकुलेक्षणं विषीदन्तं तं(अर्जुनं) मधुसूदनः इदं वाक्यं उवाच ॥१॥

मग संजयो म्हणे रायातें । आइकें तो पार्थु तेथें । शोकाकुल रुदनातें । करीतु असे ॥१॥ तें कुळ देखोनि समस्त । स्नेह उपनलें अद्भुत । तेणें द्रवलें असे चित्त । कवणेपरी ॥२॥ जैसें लवण जळें झळंबलें । ना तरी अभ्र वातें हालें । तैसें सधीर परी विरमलें । हृदय तयाचें ॥३॥ ह्मणोनी कृपा आकळिला । दिसतसे अति कोमाइला । जैसा कर्दमीं रुपला । राजहंसु ॥४॥ तयापरी तो पांडुकुमरु । महामोहें अति जर्जरु । देखोनी श्रीशार्ङ्गधरु । काय बोले ॥५॥

श्रीभगवानुवाच—

**कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।**
**अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥**

अर्जुन, अनार्यजुष्टं अस्वर्ग्यं अकीर्तिकरं (च) इदं कश्मलं त्वा विषमे कुतः समुपस्थितम् ? ॥२॥

म्हणे अर्जुना आदि पाहीं । हें उचित काय इये ठायीं । तूं कवण हें कायी । करीत आहासी ॥६॥ तुज सांगे काय झालें । कवण उणें आलें । करितां काय ठेलें । खेदु कायिसा ॥७॥ तूं अनुचिता चित्त नेदिसी । धीरु कंहीं न संडिसी । तुझेनि नामें अपयशीं । दिशा लंघिजे ॥८॥ तूं शूरवृत्तीचा ठावो । क्षत्रियांमाजीं रावो । तुझिया लाठेपणाचा आवो । तिहीं लोकीं ॥९॥ तुवां संग्रामीं हरु जिंकिला । निवातकवचांचा ठावो फेडिला । पवाडा तुवां केला । गंधर्वांसी ॥१०॥ पाहतां तुझेनि पाडें । दिसे त्रैलोक्यही थोकडें । ऐसें पुरुषत्व चोखडें । पार्था तुझें ॥११॥ तो तूं कीं आजि एथें । सांडूनियां वीरवृत्तीतें । अधोमुख रुदनातें । करीतु आहासी ॥१२॥ विचारीं तूं अर्जुनु । कीं कारुण्यें किजसी दीनु । सांग पां अंधकारें भानु । ग्रासिला आथी ॥१३॥ ना तरी पवनु मेघासि बिहे । कीं अमृतासि मरण आहे । पाहे पां इंधनचि गिळोनि जाये । पावकातें ॥१४॥ कीं लवणेंचि जळ विरे । संसर्गें काळकूट मरे । सांग पां महाफणी दर्दुरें । गिळिजे कायी ॥१५॥ सिंहासि झोंबे कोल्हा । ऐसा अपाडु आथि कें जाहला । परी तो त्वां साच केला । आजि एथ ॥१६॥ ह्मणोनि अझुनी अर्जुना । झणें चित्त देसी या हीना । वेगीं धीर करूनियां मना । सावधु होईं ॥१७॥ सांडी हें मूर्खपण । उठी घे धनुष्यबाण । संग्रामीं हें कवण । कारुण्य तुझें ॥१८॥ हां गा तूं जाणता । तरी न विचारिसी कां आतां । सांगें झुंझावेळे सदयता । उचित कायी ॥१९॥ हे असतिये कीर्तीसी नाशु । आणि पारत्रिकासि अपभ्रंशु । ह्मणे जगन्निवासु । अर्जुनातें ॥२०॥

**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।**
**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥३॥**

पार्थ, क्लैब्यं मा गमः स्म. एतत् त्वयि न उपपद्यते. परंतप, इदं क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वा उत्तिष्ठ. ॥३॥

म्हणोनि शोकु न करीं । तूं पुरता धीरु धरीं । हे शोच्यता अव्हेरीं । पंडुकुमरा ॥२१॥

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय दुसरा.

**संजय म्हणालाः—याप्रमाणें करुणेनें व्याप्त झालेल्या, डोळे पाण्यानें भरून आलेल्या, व खिन्न झालेल्या अर्जुनाला मधुसूदन असें बोलते झाले. ॥१॥**

मग संजय धृतराष्ट्र राजास म्हणालाः—महाराज, ऐका. अर्जुन त्या ठिकाणीं शोकानें व्याकुळ होऊन रुदन करूं लागला. १ तें आपलें सर्व कुळ पाहून त्याच्या मनांत विलक्षण मोह उत्पन्न झाला, आणि त्या योगानें त्याचें चित्त द्रवलें; कसें म्हणाल तर, २ पाण्यानें ज्याप्रमाणें मीठ विरघळतें, अथवा वाऱ्यानें ज्याप्रमाणें ढग नाहींतसे होतात, त्याप्रमाणें, तो मोठा धैर्यवान होता तरी त्याच्या हृदयास द्रव आला! ३ जसा राजहंस पक्षी चिखलांत रुतल्यावर म्लान दिसतो, तसा तो ममतेनें व्याकूळ होऊन अगदीं म्लान दिसूं लागला. ४ त्याप्रमाणें तो अर्जुन महामोहानें ग्रस्त झालेला पाहून भगवान श्रीकृष्ण म्हणालेः—५

**श्रीभगवान् म्हणालेः—अर्जुना, थोर लोकांना मान्य न होणारा, स्वर्गप्राप्तीचे आड येणारा, व कीर्तीचा नाश करणारा असा हा मोह तुला ह्या युद्धप्रसंगीं कोठून उत्पन्न झाला? ॥२॥**

अर्जुना, अरें असें पहा, या ठिकाणीं तुला हें शोभतें काय? तूं कोण आहेस व हें काय करीत आहेस याचा अगोदर विचार कर. ६ तुला काय झालें? सांग बरें कोणतें कमी पडलें? काय करण्याचें राहिलें? आणि दुःख कशाकरितां झालें? ७ तूं अनुचित गोष्टींकडे कधीं लक्ष देत नाहींस, व कधींही धीर सोडीत नाहींस. तुझ्या केवळ नामस्मरणानें अपयश दिगंतीं पळून जातें. ८ तूं शौर्याचें केवळ आगर व क्षत्रियांचा मुकुटमणि आहेस, व तुझ्या शौर्याचा डंका त्रैलोक्यांत गाजत आहे. ९ तूं युद्धांत शंकरास जिंकिलेंस; निवातकवचांचा समूळ उच्छेद केलास; आणि आपलें यश गंधर्वांस गाण्यास विषय करून ठेविलेंस. १० अर्जुना, ज्या तुझा पराक्रम एवढा मोठा आहे कीं, त्याच्या तुलनेला हें त्रिभुवन देखील कमी आहे, ११ तोच तूं आज वीरवृत्ति सोडून खालीं तोंड घालून रडत बसला आहेस! १२ अर्जुना, विचार कर! तुला कारुण्यानें इतकें दीन करून टाकावें काय? अरे, अंधकारानें सूर्याला कधीं गिळून टाकलें आहे का सांग बरें? १३ किंवा वाऱ्यास मेघाचें भय कधीं वाटलें आहे? अथवा अमृतास कधीं मरण आहे? किंवा लाकडानें कधीं अग्नि गिळला आहे? १४ अथवा मिठानें पाणी कधीं विरलें आहे? किंवा कालकूट विष हें दुसऱ्याच्या संसर्गानें मेलें आहे? अथवा मोठ्या भुजंगाला कधीं बेडकानें गिळलें आहे? १५ बरें, कधीं कोल्ह्यानें सिंहाबरोबर झोंबी केली आहे? अशा विलक्षण गोष्टी कधीं तरी घडल्या आहेत का? पण त्या तूं एथें आज खऱ्या करून दाखविल्यास! १६ अर्जुना, कदाचित् या वाईट गोष्टींकडे लक्ष देशील हो! म्हणून मनास लवकर धीर देऊन सावध हो. १७ हा वेडेपणा टाकून दे, ऊठ, व धनुष्यबाण हातीं घे. कारण, या रणभूमीवर तुझ्या या करुणेचा काय उपयोग? १८ अर्जुना, अरे तूं ज्ञाता ना? या वेळीं विचार कसा करीत नाहींस? अरे, युद्धाचे प्रसंगीं दया असणें योग्य आहे का सांग बरें? १९ श्रीकृष्ण म्हणतातः—अर्जुना, हें तुझें वर्तन आजपर्यंत संपादन केलेल्या कीर्तीचा नाश करणारें व परलोकप्राप्तीस अडथळा आणणारें आहे! २०

**पार्था, नामर्दपणा धरूं नको. हा तुला शोभत नाहीं. शत्रूंस ताप देणाऱ्या अर्जुना, क्षुद्र असें हें मनाचें दुबळेपण टाकून युद्धाकरितां ऊठ. ३**

म्हणून, अर्जुना, तूं शोक करूं नको, पूर्ण धीर धरं आणि तूं ज्याकरितां शोक करितोस ती गोष्ट सोडून दे. २१

तुज नव्हे हें उचित । येणें नासेल जोडलें बहुत । तूं अझुनि वरी हित । विचारीं पां ॥२२॥ येणें संग्रामाचेनि अवसरें । एथ कृपाळूपण नुपकरे । हे आतांचि काय सोयरे । जाहले तुज ॥२३॥ तूं आधींचि काय नेणसी । कीं हे गोत्रज नोळखसी । वायांचि काय करिसी । अतिशो आतां ॥२४॥ आजिचें हें झुंज । काय जन्मा नवल तुज । हें परस्परें तुम्हां व्याज । सदांचि आथी ॥२५॥ तरी आतां काय जाहलें । कायि स्नेह उपनलें । हें नेणिजे परी कुडें केलें । अर्जुना तुवां ॥२६॥ मोह धरिलिया ऐसें होईल । जे असती प्रतिष्ठा जाईल । आणि परलोकही अंतरेल । ऐहिकेंसीं ॥२७॥ हृदयाचें ढिलेपण । एथ निकयासि नव्हे कारण । हें संग्रामीं पतन जाण । क्षत्रियासी २८ ऐसेनि तो कृपावंतु । नानापरी असे शिकवितु । हें ऐकोनि पंडुसुतु । काय बोले ॥२९॥

अर्जुन उवाच—

**कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन।**
**इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥**

मधुसूदन, अहं भीष्मं द्रोणं च संख्ये इषुभिः कथं प्रतियोत्स्यामि ? अरिसूदन ! ( एतौ ) पूजार्हौ (स्तः)॥४॥

देवा हें येतुलेवरी । बोलावें नलगे अवधारीं । आधीं तूंचि विचारी । संग्रामु हा ॥ ३० ॥ हें झुंज नव्हे प्रमादु । एथ प्रवर्तलिया दिसतसे बाधु । हा उघड लिंगभेदु । वोढवला आम्हां ॥३१॥ देखे मातापितरें अर्चिजती । सर्वस्वें तोष पावविजती । तियें पाठीं केविं वधिजती । आपुलिया हातीं ॥३२॥ देवा संतवृंद नमस्कारिजे । कां घडे तरी पूजिजे । हें वांचूनि केवीं निंदिजे । स्वयें वाचा ॥३३॥ तैसे गोत्रगुरु आमुचे । हे पूजनीय आम्हां नियमाचे । मज बहुत भीष्मद्रोणांचें । वर्ततसे ॥३४॥ जयांलागीं मनें विरूं । आम्ही स्वप्नींही न शकों धरूं । तयां प्रत्यक्ष केवीं करूं । घातु देवा ॥३५॥ वरी जळो हें जियालें । एथ आघवेयांसि हेंचि काय जाहलें । जे यांच्या वधीं अभ्यासिले । मिरविजे आम्हीं ॥३६॥ मी पार्थु द्रोणाचा केला । येणें धनुर्वेदु मज दिधला । तेणें उपकारें काय आभारैला । वधीं तयातें ॥३७॥ जेथींचिया कृपा लाहिजे वरु । तेथेंचि मनें व्यभिचारु । तरी काय मी भस्मासुरु । अर्जुनु म्हणे ३८

**गुरूनहत्वा हि महानुभावा-**
**ञ्छ्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ॥**
**हत्वाऽर्थकामांस्तु गुरूनिहैव ।**
**भुञ्जीय भोगान्रुधिरप्रदिग्धान् ॥ ५ ॥**

महानुभावान् गुरून् हि अहत्वा, इहलोके भैक्ष्यं भोक्तुम् अपि श्रेयः ( अस्ति ); गुरून् हत्वा तु इह एव रुधिरप्रदिग्धान् अर्थकामान् भोगान् भुञ्जीय. ॥५॥

देवा समुद्र गंभीर आइकिजे । वरि तोहि आहाच देखिजे । परी क्षोभ मनीं नेणिजे । द्रोणाचिये ३९॥ हें अपार जें गगन । वरी तयाही होईल मान । परी अगाध भलें गहन । हृदय याचें ॥४०॥ वरी अमृतही विटे । कीं काळवशें वज्रही फुटे । परी मनोधर्मु न लोटे । विकरविलाही ॥४१॥ स्नेहालागीं माये । म्हणिपे ते कीरु होये । परी कृपा ते मूर्त आहे । द्रोणीं इये ॥४२॥ हा कारुण्याची आदि । सकल गुणांचा निधि । विद्यासिंधु निरवधि । अर्जुन म्हणे ॥४३॥ हा येणें मानें महंतु । वरी आम्हांलागीं कृपावंतु । आतां सांग पां येथ घातु । चिंतूं येईल ॥४४॥ ऐसे हे रणीं वधावे । मग आपण राज्यसुख भोगावें । तें मना नये आघवें । जीवितेसीं ॥४५॥ हें येणें मानें दुर्धर । जे यांहीहूनी भोग सधर । ते असतु येथवर । भिक्षा मागतां भली ॥४६॥ ना तरी देशत्यागें जाइजे । का गिरिकंदर सेविजे । परी शस्त्र आतां न धरिजे । इयांवरी ॥ ४७॥ देवा नवनिशतीं शरीं । वावरोनी यांच्या जिव्हारीं । भोग गिंवसावे रुधिरीं । बुडाले जे ॥४८॥ ते काढूनि काय किजती । लिप्त केवीं

तुला हें करणें चांगलें नाहीं. तूं आजपर्यंत जें कांहीं संपादन केलें आहेस, त्याचा या योगानें नाश होईल; म्हणून तूं अझून तरी हित कशांत आहे पहा. २२ असल्या संग्रामाचे वेळीं कृपाळूपणा उपयोगीं नाहीं. हे कौरव काय आतांच तुझे नातलग झाले आहेत ? २३ अरे, ही गोष्ट तुला पूर्वी माहीत नव्हती का ? किंवा हे नातेवाईक आहेत हें तूं ओळखीत नव्हतास काय ? मग आतांच हा व्यर्थ पाल्हाळ कां लावला आहेस ? २४ काय सांगावें, आजचा हा युद्धप्रसंग तुझ्या सगळ्या जन्मांत अपूर्व आहे ! नाहींतर तुम्हां परस्परांमध्यें कलहाचीं कारणें नेहमीं आहेतच; २५ मग आतांच काय झालें ? हा मोह तुला कसा उत्पन्न झाला कोण जाणे ! पण, अर्जुना, तूं हें फार वाईट केलेंस. २६ जर तूं हा मोह धारण केलास, तर आजपर्यंत मिळविलेला लौकिक जाऊन इहपरलोकांसही अंतरशील. २७ तुझ्या अंतःकरणांतील नेभळेपणा तुझ्या कल्याणाला कारण होणार नाहीं. तो युद्धामध्यें क्षत्रियाला दुर्गतीला कारण होईल. २८ याप्रमाणें त्या दयाळू भगवंतांनीं पुष्कळ प्रकारें केलेला बोध ऐकून अर्जुन बोललाः—२९

**अर्जुन म्हणालाः—हे मधुसूदना ! मी युद्धांत भीष्म व द्रोणाचार्य यांच्यावर बाण कसे सोडूं ? शत्रुदमना, हे पूजा करण्यास योग्य आहेत. ॥४॥**

देवा ! ऐका. इतकें बोलायाचें कांहीं कारण नाहीं. ह्या युद्धाविषयीं आधीं आपणच विचार करा. ३० हें युद्ध नसून आमचे हातून मोठी अमर्यादा होत आहे; हें करण्याला आम्ही प्रवृत्त झालों, तर हा दोष आहे; इतकेंच नव्हे, तर आम्हीं आराध्यदेवतांचा उघड उघड उच्छेद करीत आहों ३१ असें पहा कीं, मातापितरांची सेवा करून त्यांना सर्व प्रकारें संतुष्ट ठेवावें; आणि मागून त्यांचाच आपण आपल्याच हातानें वध कसा करावा ? ३२ देवा, साधुसंतांना नमस्कार करावा, घडेल तर त्यांची पूजा करावी, पण हें सोडून आपण आपल्याच मुखानें त्यांची निंदा कशी करावी ? ३३ त्याचप्रमाणें, हे तर आमचे कुलगुरु असून आम्हांला सर्वदा पूज्य आहेत. त्यांतून भीष्म व द्रोण यांचा तर मी फार ऋणी आहें. ३४ देवा, ज्यांच्याविषयीं आम्ही स्वप्नांत देखील वैर धरूं शकत नाहीं, त्यांचा प्रत्यक्ष घात कसा करावा बरें ? ३५ आज या सर्वांच्या बुद्धीला झालें तरी काय ? ज्या शस्त्रविद्येचा अभ्यास आम्हीं यांच्यापाशीं केला, तिचा उपयोग यांना मारण्याकडे करून त्याविषयीं प्रतिष्ठा मिरवावयाची असें जर होईल, तर जळो हें जिणें ! ३६ मी—अर्जुन—द्रोणाचार्यांचा शिष्य; त्यांनीच मला धनुर्विद्या शिकविली; तर आतां त्यांना मारून त्यांच्या त्या उपकारांची फेड करूं होय ? ३७ अर्जुन म्हणतोः—ज्यांच्या कृपेनें आम्हीं वरप्राप्ति करून घ्यावी, त्यांच्याशींच कृतघ्नपणा करायाला मी का भस्मासुर आहें ? ३८

**अत्यंत उदार अंतःकरणाच्या भीष्मद्रोणादि गुरुजनांस न मारितां ह्या लोकीं भिक्षा मागूनही निर्वाह करणें मला कल्याणकारक वाटतें. कारण, गुरुजनांना मारून त्यांच्या रक्तानें भरलेले व अर्थ व काम ह्यांनीं युक्त असे भोग इहलोकींच आम्हांला भोगावे लागतील ! ॥५॥**

देवा, समुद्र गंभीर आहे असें ऐकतों, तथापि तें वरकरणींच; परंतु द्रोणाचार्यांविषयीं म्हटलें तर त्यांना राग म्हणजे काय हें माहीत सुद्धां नाहीं. ३९ आकाशाचा अंत नाहीं, पण त्याचेंही माप करतां येईल, परंतु द्रोणाचार्यांचें अंतःकरण इतकें खोल आहे कीं, त्याचें माप करतां येणार नाहीं. ४० कदाचित् अमृतही अंबेल, किंवा वज्रही फुटेल, पण द्रोणाचार्यांस प्रयत्नांतींही राग यावयाचा नाहीं. ४१ आईशिवाय इतरांची माया व्यर्थ होय अशी जी म्हण आहे, ती खरी आहे; परंतु द्रोणाचार्यांचे ठिकाणीं माया मूर्तिमंत वास करिते. ४२अर्जुन म्हणतोः—हे आचार्य म्हणजे दयेचा उगम, सर्व गुणांची खाण, व विद्येचे केवळ महानिधि आहेत; ४३ अशा प्रकारें हे सर्वश्रेष्ठ असून आम्हांविषयीं तर पूर्ण कृपावंत आहेत, तेव्हां यांचा घात करण्याचें मनांत येईल तरी का ? ४४ अशांना रणांत मारून मग आपण राज्यसुख भोगावें ही गोष्ट माझ्या मनांत जीव गेला तरी येणार नाहीं; ४५ इतकें हें कृत्य कठीण आहे. यांच्यापेक्षां राज्योपभोग श्रेष्ठ असतील, तर असोत बिचारे ! पण त्यांपेक्षां भिक्षा मागणेंच बरें ! ४६ नाहींपेक्षां देशत्याग करावा, अथवा गिरिकंदरांत जाऊन रहावें, परंतु याजवर आतां शस्त्र म्हणून धरूं नये. ४७ देवा, नवीन पाजळलेल्या बाणांनीं यांच्या मर्मस्थानीं प्रहार करून त्यांच्या रक्तपातानंतर मिळणारे रक्तांत बुडालेले भोग शोधीत बसूं काय ? ४८ ते प्राप्त करून घेऊन

सेविजती । मज नये हे उपपत्ति । याचिलागीं ४९ ऐसें अर्जुन तिये अवसरीं । म्हणे श्रीकृष्णा अवधारीं । परि तें मना नयेचि मुरारी । आइकोनियां ५० हें जाणोनि पार्थ विहाला । मग पुनरपि बोलों लागला । म्हणे देवो कां चित्त या बोला । देतीचि ना ॥५१॥

**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो ।**
**यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।**
**यानेव हत्वा न जिजीविषाम-**
**स्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥६॥**

नः कतरत् गरीयः, यद्वा ( वयं तान् ) जयेम यदि वा (ते) नः जयेयुः, एतत् अपि नच विद्मः. यान् हत्वा न जिजीविषामः ते धार्तराष्ट्राः प्रमुखे अवस्थिताः एव. ॥६॥

येन्हवीं माझ्या चित्तीं जें होतें । तें मी विचारूनि बोलिलों एथें । परी निकें काय यापरौतें । तें तुम्ही जाणा ॥५२॥ पैं विरु जयांसीं ऐकिजे । आणि या बोलींचि प्राणु सांडिजे । ते एथ संग्रामव्याजें । उभे आहाती ॥५३॥ आतां ऐसेयांतें वधावें । कीं अव्हेरूनियां निघावें । या दोहींमाजीं बरवें । तें नेणों आम्ही ॥५४॥

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः ।**
**पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ॥**
**यच्छ्रेयःस्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे ।**
**शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ ७ ॥**

कार्पण्यदोषोपहतस्वभावः धर्मसंमूढचेताः ( अहं ) त्वां पृच्छामि. यत् निश्चितं श्रेयः स्यात् तन्मे ब्रूहि; अहं ते शिष्यः ( अस्मि ). त्वां प्रपन्नं मां शाधि. ॥७॥

आम्हां काय उचित । तें पाहतां न स्मरे एथ । जे मोहें येणें चित्त । व्याकुळ माझें ॥५५॥ तिमिरावरुद्ध जैसें । दृष्टीचें तेज अंशे । मग पासींच असतां न दिसे । वस्तुजात ॥५६॥ देवा तैसें मज जाहलें । जें मन हें भ्रांती ग्रासिलें । आतां काय हित आपुलें । तेंही नेणें ॥५७॥ तरी श्रीकृष्णा तुवां जाणावें । निकें तें आम्हां सांगावें । जे सखा सर्वस्व आघवें । आम्हांसि तूं ॥५८॥ तूं गुरु बंधु पिता । तूं आमुची इष्ट देवता । तूंचि सदा रक्षिता । आपदीं आमुतें ॥५९॥ जैसा शिष्यातें गुरू । सर्वथा नेणें अव्हेरूं । कीं सरितांतें सागरू । त्यजी केवीं ॥६०॥ नातरी अपत्यातें माये । सांडूनि जरी जाये । तरी तें कैसेनि जिये । ऐके कृष्णा ॥६१॥ तैसा सर्वांपरी आम्हांसी । देवा तूंचि एक आहासी । आणि बोलिलें जरी न मनिसी । मागील माझें ॥६२॥ तरी उचित काय आम्हां । जें व्यभिचरेना धर्मा । तें झडकरी पुरुषोत्तमा । सांगे आतां ६३

**न हि प्रपश्यामि ममापनुद्या-**
**द्यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणां ।**
**अवाप्य भूमावसपत्नमृद्धं**
**राज्यं सुराणामपि चाऽऽधिपत्यम् ॥ ८**

भूमौ असपत्नं ऋद्धं राज्यं सुराणां आधिपत्यं चापि वाप्य हि, यत् मम इंद्रियाणां उच्छोषणं शोकं अपनुद्यात् तत् न प्रपश्यामि. ॥८॥

हें सकळ कुळ देखोनी । जो शोकु उपनलासे मनीं । तो तुझिया वाक्यावांचुनी । न जाय आणिकें ॥६४॥ एथ पृथ्वीतळ आपु होईल । हें महेंद्रपदही पाविजेल । परि मोह हा न फिटेल । मानसींचा ॥६५॥ जैसीं सर्वथा बीजें आहाळलीं । तीं सुक्षेत्रीं जऱ्ही पेरिलीं । तरी न विरूढती सिंचलीं । आवडे तैसीं ॥६६॥ ना तरी आयुष्य पुरलें आहे । तरी औषधें कांहीं नोहे । एथ एकचि उपेगा जाये । परमामृत ॥६७॥ तैसें राज्यभोगसमृद्धि । उज्जीवन नोहे इये बुद्धि । एथ जिव्हाळा कृपानिधि । कारुण्य तुझें ॥६८॥ ऐसें अर्जुन तेथ बोलिला । जंव क्षणएक भ्रांती सांडिला । मग पुनरपि व्यापिला । उर्मी तेणें ॥६९॥ कीं मज पाहतां उर्मी नोहे । हें अनारिसें गमत आहे । तो ग्रसिला महामोहें । काळसर्पें ॥७०॥ सवर्म हृदयकल्हारीं । तेथ कारुण्यवेळेच्या भरीं । लागला म्हणोनि लहरी । भांजेचि ना ॥७१॥ हें जाणोनि ऐसी प्रौढी । जो दृष्टिसवेंचि विष फेडी । तो धांवया श्रीहरी गारुडी । पातला कीं ॥७२॥ तैसिया पंडुकुमरा व्याकुळा । मिरवतसे श्रीकृष्णा जवळा । तो कृपावशें अवलीळा । रक्षील आतां ॥७३॥ म्हणोनि तो पार्थु । मोहफणिग्रस्तु । म्यां

करावयाचें काय ? आणि रक्तानें भरलेले ते भोग कसे उपभोगावयाचे ? म्हणून हें करणें माझ्या मनास येत नाहीं. ४९ अशा प्रकारें बोलून त्या वेळेस अर्जुन श्रीकृष्णास म्हणालाः—" देवा ऐकलें का ? " परंतु तें बोलणें कृष्णांस पसंत पडलें नाहीं, ५० असें पाहून अर्जुन आपल्या मनांत भिऊन पुनः म्हणालाः—देवा, माझ्या बोलण्याकडे आपण लक्ष कां देत नाहीं ? ५१

**[ युद्ध किंवा भिक्षाटन यांपैकीं ] कोणतें आम्हांस अधिक श्रेयस्कर आहे, व यांना आम्ही जिंकूं किंवा हे आम्हांला जिंकतील, हें मला कळत नाहीं. ज्या कौरवांना मारून आम्ही जगण्याची इच्छा करीत नाहीं, ते तर माझ्यासमोर युद्धास तयार होऊन उभे राहिले आहेतच ! ॥६॥**

बाकी माझ्या मनांत जें होतें, तें मी एथें विचार करून बोललों; परंतु यापेक्षां चांगलें कोणतें तें तुम्हांसच माहीत; ५२ हें पहा—ज्यांच्याशीं आमचें वैर आहे हीं अक्षरें ऐकल्याबरोबर आम्हीं प्राण सोडावे, तेच रणभूमीवर संग्राम करण्याकरितां उभे आहेत, ५३ तर यांना मारावें किंवा सोडून निघून जावें, या दोहोंमध्यें चांगली गोष्ट कोणती हें आम्हांला समजत नाहीं. ५४

**अज्ञाननिमित्तक दोषामुळें माझें अंतःकरण दूषित झालें आहे, व माझें कर्तव्य काय आहे हें मला समजत नाहीं, म्हणून तुम्हांला मी विचारतों; तर यांत निश्चय करून कल्याणकारक जें असेल तें मला सांगा. मी तुमचा शिष्य आहें व तुम्हांला शरण आलों आहें, यास्तव मला उपदेश करा. ॥७॥**

आम्हांस कोणती गोष्ट करणें योग्य आहे हें विचार करूनही सुचत नाहीं; कारण, या मोहानें माझें चित्त व्याकुळ झालें आहे. ५५ ज्याप्रमाणें अंधारामुळें डोळ्यानें दिसेनासें झालें म्हणजे जवळ असलेलाही पदार्थ दिसत नाहीं, ५६ त्याप्रमाणें, देवा, माझी स्थिति झाली आहे;—माझें मन भ्रांतीनें ग्रासून गेलें असून, आपलें हित कशांत आहे तेंही मला समजत नाहीं; ५७ तर, श्रीकृष्णा, आपण विचार करून खरें असेल तें आम्हांला सांगा; कारण, आमचे इष्टमित्र वगैरे सर्वस्व आपण आहां. ५८ आमचे गुरु, बंधु, बाप, कुलदैवत आणि नेहमीं संकटसमयीं रक्षण करणारे आपणच आहां. ५९ ज्याप्रमाणें गुरु शिष्याचा अव्हेर करीत नाहीं, किंवा समुद्र नद्यांचा अव्हेर कसा करील ? ६० अथवा, देवा, आपणच विचार करा, कीं आई मुलास सोडून गेली तर तें कसें वांचेल ? ६१ त्याचप्रमाणें, सर्वतोपरी आम्हांस आपणच आहां, व इतका वेळपर्यंत जें मी आपल्याला बोललों तें जर तुम्हांस पटत नसेल, ६२ तर, पुरुषोत्तमा, जी गोष्ट आम्हांस उचित असून धर्मविरुद्ध नसेल, ती लवकर सांगा. ६३

**इहलोकीं पृथ्वीचें निष्कंटक व संपन्न राज्य आणि स्वर्गीं देवांचें आधिपत्य म्हणजे इंद्रपद मिळालें, तरीही, माझ्या इंद्रियांना शोषून टाकणारा हा शोक कोणत्या उपायांनीं दूर होईल हें मला कळत नाहीं ! ॥८॥**

हे सर्व गोत्रज पाहून माझ्या मनांत जो शोक उत्पन्न झाला आहे, तो आपल्या उपदेशावांचून दुसऱ्या कोणत्याही उपायानें नाहींसा होणार नाहीं. ६४ या ठिकाणीं पृथ्वीचें राज्य मिळालें किंवा इंद्रपद प्राप्त झालें, तरी देखील माझ्या अंतःकरणांत उत्पन्न झालेला हा मोह दूर होणार नाहीं. ६५ ज्याप्रमाणें भाजलेलें बीं कितीही उत्तम जमिनींत पेरलें व त्यास मनमुराद पाणी घातलें तरी उगवत नाहीं, ६६ किंवा जेथें आयुष्य संपलें आहे तेथें एका परमामृताशिवाय इतर औषधांचा कांहीं उपयोग होत नाहीं, ६७ त्याप्रमाणें मला सर्व राज्यभोग व संपत्ति प्राप्त झाली तरी या मोहांतून पार पडण्यास त्यांचा बिलकुल उपयोग होणार नाहीं; तर, हे कृपानिधे, तुझ्या कृपेचा जिव्हाळाच उपयोगी पडेल. ६८ याप्रमाणें, क्षणभर भ्रांति दूर झाल्यामुळें अर्जुन त्या ठिकाणीं बोलला. परंतु त्याला पुनः मोहानें झपाटलें. ६९—ह्या अर्जुनाच्या स्थितीवर महाराज असें रूपक करितात कीं,—ह्याला मोहाची लहर नसून हा कांहीं निराळाच प्रकार असावासें मला वाटतें; तो कोणता म्हणाल तर, महामोहरूपी काळसर्पानें अर्जुनास ग्रासलें; ७० आणि हृदयकमलांत कारुण्याची उसळी आली आहे अशी संधि साधून मर्मस्थानीं दंश केला असतां त्यास लहरींवर लहरी येऊन झेंडू फुटणार नाहीं काय ? ७१ असा प्रसंग पाहून, ज्याच्या कृपादृष्टीनें विष नाहींसें होतें असें ज्याचें ऐश्वर्य तो श्रीकृष्णरूपी गारुडी त्याचें रक्षण करण्याकरितां धांवून आला. ७२ तेव्हां अर्जुन श्रीकृष्णांजवळ मोहानें व्याप्त झालेल्या स्थितींत शोभूं लागला. त्याचें तो श्रीकृष्ण आपल्या कृपेनें आतां सहज रक्षण करील. ७३ म्हणून, मोह हाच कोणी सर्प व त्यानें पार्थाला ग्रासलें आहे हा हेतु मनांत धरून मीं एथें

ह्मणितला हा हेतु । जाणोनियां ॥७४ मग देखा तेथ फाल्गुनु। घेतला असे भ्रांती कवळूनु । जैसा घनपडळीं भानु । आच्छादिजे ॥७५॥ तयापरी तो धनुर्धरु । जाहलासे दुःखें जर्जरु । जैसा ग्रीष्मकाळीं गिरिवरु । वणवला कां ॥७६॥ ह्मणोनि सहजें सुनीळु । कृपामृतें सजळु । तो बोळला श्रीगोपाळु । महामेघु ॥७७॥ तेथ सुदर्शनांची द्युति । तेचि विद्युल्लता झळकती । गंभीर वाचा ते आयती । गर्जनेची ॥७८॥ आतां तो उदार कैसा वर्षेल । तेणें अर्जुनाचळु निवेल । मग नवी विरूढी फुटेल । उन्मेषाची ॥ ७९ ॥ ते कथा आइका । मनाचिया आराणुका । ज्ञानदेवो ह्मणे देखा । निवृत्तिदासु ॥८०॥

संजय उवाच—

**एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतपः ।**
**न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ९**

परंतपः गुडाकेशः हृषीकेशं एवम् उक्त्वा ' न योत्स्ये' इति गोविंद उक्त्वा तूष्णीं बभूव ह. ॥९॥

ऐसें संजयो असे सांगतु । ह्मणे राया तो पार्थु । पुनरपि शोकाकुळितु । काय बोले ॥८१॥ आइकें सखेदु बोले श्रीकृष्णातें । आतां नाळवावें तुम्हीं मातें । मीं सर्वथा न झुंजें एथें । भरंवसेनी ॥८२॥ ऐसें येकि हेळां बोलिला । मग मौन धरूनि ठेला । तेथ श्रीकृष्णा विस्मो पातला । देखोनि तयातें ॥८३॥

**तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।**
**सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥१०॥**

भारत, उभयोः सेनयोः मध्ये विषीदन्तं ( अर्जुनं ) हृषीकेशः प्रहसन्निव इदं वचः उवाच. ॥१०॥

मग आपुलां चित्तीं ह्मणे । एथ हें कायी आदरिलें येणें । अर्जुन सर्वथा कांहीं नेणे । काय कीजे ॥८४॥ हा उमजे आतां कवणेपरी । कैसेनि धीरू स्वीकारी । जैसा ग्रहातें पंचाक्षरी । अनुमानी कां ॥८५॥ ना तरी असाध्य देखोनि व्याधि । अमृतासम दिव्य ओषधि । वैद्य सूचि निरवधि । निदानींची ॥८६॥ तैसें विवरीतु असे श्रीअनंतु । तया दोहीं सैन्यांआंतु । जयापरी पार्थु । भ्रांति सांडी ॥८७॥ तें कारण मनीं धरिलें । मग सरोष बोलों आदरिलें । जैसें मातेच्या कोपीं थोकुलें । स्नेह आथी ॥८८॥ कीं औषधाचिया कडुवटपणीं । जैसी अमृताची पुरवणी । ते आहाच न दिसे परी गुणीं । प्रकट होय ॥८९॥ तैसीं वरिवरी पाहतां उदासें । आंत तरी अतिसुरसें । तियें वाक्यें हृषीकेशें । बोलों आदरिलीं ॥९०॥

श्रीभगवानुवाच—

**अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।**
**गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः ॥११॥**

त्वं अशोच्यान् अन्वशोचः, प्रज्ञावादान् च भाषसे; पंडिताः गतासून् अगतासून् च न अनुशोचन्ति. ॥ ११ ॥

मग अर्जुनातें म्हणितलें । आम्हीं आजि हें नवल देखिलें । जें तुवां एथ आदरिलें । माझारींचि ॥९१॥ तूं जाणता तरी म्हणविसी । परी नेणिवेतें न संडिसी । आणि शिकवूं म्हणों तरी बोलसी । बहुसाल नीति ॥९२॥ जात्यंधा लागे पिसें । मग तें सैरा धांवे जैसें । तुझें शाहाणपण तैसें । दिसतसे ॥९३॥ तूं आपणपें तरी नेणसी । परी या कौरवांतें शोचूं पहासी । हा बहु विस्मय आम्हांसी । पुढतपुढती ॥९४॥ तरी सांग पां अर्जुना । तुजपासूनि स्थिति या त्रिभुवना । हे अनादि विश्वरचना । तें लटकें कायी ॥९५॥ एथ समर्थु एक आथी । तयापासूनि भूतें होतीं । तरी हें वायांचि काय बोलती । जगामाजीं ॥९६॥ हो कां सांप्रत ऐसें जाहलें । जे हें जन्ममृत्यु तुवां सृजिले । आणि नाशु पावे नाशिलें । तुझेनि कायी ॥९७॥ तूं भ्रमलेपणें अहंकृति । यांसि घातु न धरिसी चित्तीं । तरी सांगें कायि हे होती । चिरंतन ॥९८॥ कीं तूं एक वधिता । आणि सकळ लोकु हा मरता । ऐसी भ्रांति झणें चित्ता । येवों देसी ॥९९॥ अनादिसिद्ध हें आघवें । होत जात

हें रूपक केलें. ७४ ज्याप्रमाणें ढगांनीं सूर्य आच्छादित होतो, त्याप्रमाणें अर्जुन ह्या वेळीं भ्रांतीनें आच्छादित झाला. ७५ जसा उन्हाळ्यांत डोंगराला वणवा लागतो, तसा तो अर्जुन दुःखानें अगदीं जर्जर होऊन गेला. ७६ म्हणून, वणवा लागलेल्या डोंगरावर जसे निळ्या रंगाच्या पाण्यानें भरलेले ढग कोसळून तो शांत करितात, तसा आधींच नीलवर्ण व कृपामृतरूप जलानें भरलेला तो महामेघरूप गोपाळ वळला. ७७ त्या श्रीकृष्णरूप मेघाचे ठिकाणीं दांतांची प्रभा हीच कोणी वीज चमकत होती, व गंभीर भाषण हीच कोणीएक गर्जना होती. ७८ असा तो श्रीभगवानरूप उदार मेघ आतां कशी वृष्टि करील, व त्या वृष्टीनें अर्जुनरूप पर्वत कसा शांत होईल, आणि त्याला ज्ञानाचा कसा नवा अंकुर फुटेल, ७९ ती कथा सावधान चित्तानें ऐका, असें निवृत्तिदास ज्ञानेश्वर महाराज म्हणाले. ८०

**संजय म्हणालाः—शत्रूस ताप देणारा अर्जुन ह्याप्रमाणें श्रीकृष्णांस बोलून, 'मी आतां युद्ध करणार नाहीं' असें श्रीगोविंदाला म्हणून स्तब्ध राहिला ! ॥ ९ ॥**

ह्याप्रमाणें धृतराष्ट्रास सांगून संजय आणखी म्हणतोः— राजा, पुनः तो अर्जुन शोकयुक्त अंतःकरणानें काय बोलूं लागला, ८१ अर्जुन; खेदयुक्त अंतःकरणानें म्हणतो, "देवा, ऐका. आपण मला युद्ध करण्याविषयीं कोणत्याही प्रकारें भीड घालूं नका. ह्या ठिकाणीं मी निःसंशय युद्ध करणार नाहीं." ८२ ह्याप्रमाणें एकदम बोलून पुढें कांहीं न बोलतां तो स्तब्ध राहिला. अशा स्थितींत त्याला पाहून भगवंतांस मोठें आश्चर्य वाटलें. ८३

**राजा, दोन्ही सैन्यांमध्यें खेद पावलेल्या अर्जुनास श्रीकृष्ण हंसल्यासारखें करून हें भाषण बोलले:—॥ १० ॥**

भगवान आपल्या मनांत म्हणतातः ह्या प्रसंगीं अर्जुनाच्या मनानें हें काय घेतलें आहे कोण जाणे ! अर्जुनाला कांहीं कळत नाहीं याला काय करावें ! ८४ ह्याची कोणत्या उपायानें समजूत पडेल ? काय केलें असतां ह्याला धैर्य येईल? असा विचार करूं लागले. ज्याप्रमाणें पंचाक्षरी जसा भूतबाधा निवारणाचा विचार करतो, ८५ अथवा रोग असाध्य आहेसें पाहतांच वैद्य जसा निदानींच्या अमृततुल्य दिव्य औषधीची तात्काळ योजना करतो, ८६ त्याप्रमाणें, त्या



दोन्ही सैन्यांमध्यें स्थित असलेले भगवान श्रीकृष्ण विचार करूं लागले कीं, ज्या कारणानें याला शोकमोह उत्पन्न झाले आहेत, ती भ्रांति हा कसा सोडून देईल ? ८७ भ्रांतीचें कारण जें अज्ञान तें मनांत आणून मग त्यांनीं रोषयुक्त भाषण करण्यास आरंभ केला. ज्याप्रमाणें आईच्या रागांत गुप्तरूपानें स्नेह असतो, ८८ किंवा औषधाच्या कडवटपणांतच जसा अमृताचा पुरवठा असतो, तो वरकांती दिसत नाहीं तरी तो गुणामध्यें स्पष्ट होतो. ८९ त्याप्रमाणें, वरकांती क्रोधयुक्त परंतु अंतर्यामीं अतिममत्वानें भरलेला असा अर्जुनास श्रीकृष्णांनीं उपदेश करण्यास आरंभ केला. ९०

**श्रीकृष्ण म्हणालेः—ज्यांचा शोक करणें योग्य नाहीं त्यांचा तूं शोक करतोस, आणि मोठ्या ज्ञानाच्या गोष्टी सांगतोस ! जे ज्ञानी आहेत ते मेलेल्यांबद्दल किंवा जिवंत असलेल्यांबद्दल शोक करीत नाहींत. ॥ ११ ॥**

मग अर्जुनास म्हणतातः—या युद्धसमयीं तूं मध्येंच काय आरंभिलें आहेस, हें आज नवलच दृष्टीस पडलें ! ९१ तूं आपल्याला तर मोठा ज्ञानी म्हणवितोस, पण अज्ञान सोडीत नाहींस; बरें, तुला एकादी गोष्ट शिकवावी म्हटलें, तर तूं आम्हांलाच शहाणपणाच्या गोष्टी सांगतोस. ९२ जन्मांधाला वेड लागल्यावर तो सैरावैरा धावतो, त्यापैकींच तुझें हें शहाणपण दिसतें. ९३ तूं आपल्या स्वस्वरूपास न जाणतां कौरवांकरितां शोक करतोस, ह्याबद्दल आम्हांस वारंवार आश्चर्य वाटतें. ९४ तर; अर्जुना, तूंच सांग बरें, कीं या विश्वाची जी अनादि रचना, ती खोटी असून या त्रैलोक्याचा पालनकर्ता तूंच आहेस कीं काय ? ९५ या जगतामध्यें कोणी एक ईश्वर असून त्याच्यापासून प्राणिमात्राची उत्पत्ति होते असें जे लोक म्हणतात, तें खोटें आहे कीं काय? ९६ तेव्हां मग असें झालें, कीं जन्ममृत्यु तूंच उत्पन्न केलेस ? आणि जर तूंच मनांत आणिलेस तरच ते नाश पावतील ? ९७ जरी भ्रममूलक अहंकारानें ग्रस्त होऊन या कौरवांचा घात करण्याचें तूं मनांत आणलें नाहींस, तरी हे चिरंजीव होतील का सांग बरें ? ९८ किंवा तूंच काय तो एक मारणारा आणि बाकीचे हे सर्व मरणारे अशी भ्रांति चित्तांत कदाचित् येऊं देशील हो ! ९९ अरे, या अनादिसिद्ध गोष्टी आपो-

स्वभावें । तरी तुवां कां शोचावें । सांगें मज १००
परी मूर्खपणें नेणसी । न चिंतावें तें चिंतिसी ।
आणि तूंचि नीति सांगसी । आम्हांप्रति ॥१॥
देखें विवेकी जे होती । ते दोहींतेंही न शोचिती ।
जे होय जाय हे भ्रांती । म्हणऊनियां ॥ २ ॥

**न त्वेवाहं जातुनाऽऽसं न त्वं नेमे जनाधिपाः ।**
**न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥१२॥**

अहं जातु न आसं ( इति ) न, (किं तु आसं एव; त्वं ( नासीः इति ) न, ( किंतु आसीः एव ); इमे जनाधिपाः ( न आसन् इति ) न, ( किंतु आसन् एव; ) अतः परं सर्वे वयं न भविष्यामः इति न, (कि तु भविष्यामः एव.) ॥१२॥

अर्जुना सांगेन आइक । एथ आम्ही तुम्ही
देख । आणि हे भूपति अशेख । आदिकरूनी ॥३॥
नित्यता ऐसेचि असोनी । ना तरी निश्चित क्षया
जाउनी । हे भ्रांति वेगळी करूनी । दोन्ही नाहीं
॥४॥ हें उपजे आणि नाशे । तें मायावशें दिसे ।
येऱ्हवीं तत्त्वता वस्तु जे असे । ते अविनाशचि ५
जैसें पवनें तोय हालविलें । आणि तरंगाकार
जाहलें । तरी कवण कें जन्मलें । म्हणोंये तेथ ६
तेंचि वायूचें स्फुरण ठेलें । आणि उदक सहज स-
पाट जाहलें । तरी आतां काय निमालें । विचारीं पां ७

**देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।**
**तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥**

देहिनः अस्मिन् देहे यथा कौमारं यौवनं जरा तथा देहांतरप्राप्तिः ( अस्ति ); तत्र धीरः न मुह्यति ॥ १३ ॥

आइकें शरीर तरी एक । परी वयसाभेद
अनेक । हें प्रत्यक्षचि देख । प्रमाण तूं ॥८॥ एथ
कौमारत्व दिसे । मग तारुण्यीं तें भ्रंशे । परी
देहचि हा न नाशे । एकेकासवें ॥९॥ तेसीं चै-
तन्याच्या ठायीं । इयें शरीरांतरें होतीं जातीं पाहीं ।
ऐसें जाणे तया नाहीं । व्यामोहदुःख ॥११०॥

**मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः ।**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत १४**

कौंतेय, मात्रास्पर्शाः तु शीतोष्णसुखदुःखदाः आगमापायिनः अनित्याः ( संति ). भारत, तान् तितिक्षस्व. ॥ १४ ॥

एथ नेणावया हेंचि कारण । जे इंद्रियां आधी-
नपण । तिहीं आकळिजे अंतःकरण । म्हणऊनि
भ्रमे ॥११॥ इंद्रियें विषय सेविती । तेथ हर्ष
शोकु उपजती । ते अंतर आप्लविती । संगें येणें १२
जयां विषयांच्या ठायीं । एकनिष्ठता कहीं नाहीं ।
तेथ दुःख आणि कांहीं । सुखही दिसे ॥१३॥
देखें शब्दाची व्याप्ति । निंदा आणि स्तुति । तेथ
द्वेषाद्वेष उपजती । श्रवणद्वारें ॥१४॥ मृदु आणि
कठिण । हे स्पर्शाचे दोनी गुण । जे वपूचेनि संगें
कारण । संतोषखेदां ॥१५॥ भ्यासुर आणि सुरेख ।
हें रूपाचें स्वरूप देख । जें उपजवी सुखदुःख ।
नेत्रद्वारें ॥१६॥ सुगंधु आणि दुर्गंधु । हा परि-
मळाचा भेदु । जो घ्राणसंगें विषादु । तोषु देता
॥१७॥ तैसाचि द्विविध रसु । उपजवी प्रीतित्रासु ।
म्हणूनि हा अपभ्रंशु । विषयसंगु ॥१८॥ देखें
इंद्रिया आधीन होइजे । तैं शितोष्णांतें पाविजे ।
आणि सुखदुःखीं आकळिजे । आपणपें ॥१९॥
या विषयांवांचूनि कांहीं । आणीक सर्वथा रम्य
नाहीं । ऐसा स्वभावोचि पाहीं । इंद्रियांचा ॥१२०॥
हे विषय तरी कैसे । रोहिणीचें जळ जैसें । कां
स्वप्नींचा आभासे । भद्रजाति ॥२१॥ देखें
अनित्य तियापरी । म्हणऊनि तूं अव्हेरीं । हा
सर्वथा संगु न धरीं । धनुर्धरा ॥२२॥

**यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ ।**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥१५॥**

पुरुषर्षभ, यं हि समदुःखसुखं धीरं पुरुषं एते ( मात्रास्पर्शाः ) न व्यथयन्ति, सः अमृतत्वाय कल्पते. ॥ १५ ॥

हे विषय जयातें नाकळिती । तया सुखदुःखें
दोनी न पवती । आणि गर्भवाससंगती । नाहीं

आप घडताहेत; त्यांबद्दल तूं व्यर्थ शोक कां करतोस मला सांग पाहूं ! १०० परंतु मूर्खपणामुळें तुला हें समजत नाहीं; व ज्या गोष्टींचें चिंतन करूं नये त्या गोष्टींचें चिंतन करून उलट आणखी आम्हांलाच शहाणपणाच्या गोष्टी सांगतोस. १ हे पहा, जे विचारवंत आहेत, ते जन्म आणि मृत्यु ही भ्रांति आहे असें म्हणून दोहोंचाही शोक करीत नाहींत. २

**मी पूर्वी कधीं नव्हतों, किंवा तूंही कधीं नव्हतास; किंवा हे राजेही कधीं नव्हते; किंवा आपण सर्व ह्यापुढें ( ह्या देहानंतर ) कधीं असणार नाहीं, असें नाहीं ! ॥ १२ ॥**

अर्जुना, आणखी सांगतों, ऐक. तुम्ही, आम्ही व हे सर्व राजे जे ह्या ठिकाणीं जमले आहेत, ३ ते असेच राहतील किंवा लयाला जातील ही भ्रांति सोडून दिली म्हणजे ह्या दोन्ही गोष्टी खऱ्या नाहींत. ४ कां म्हणशील तर, उत्पत्ति किंवा नाश जे दिसतात, ते मायेच्या योगानें; एरव्हीं खरोखर आत्मा अविनाशीच आहे. ५ ज्याप्रमाणें वाऱ्यानें पाणी हालून तरंग उत्पन्न झाले, तेव्हां त्या ठिकाणीं कोण उत्पन्न झालें म्हणावें ! ६ बरें, वाऱ्याचें वाहणें नाहींसें झाल्यावर पाणी स्थिर झालें असतां, त्या ठिकाणीं कशाचा नाश झाला याचा विचार कर. ७

**देही—आत्मा, ह्याचा जो हा देह, त्याला जशा बाल्य, तारुण्य व वार्धक्य ह्या तीन अवस्था प्राप्त होतात, [ परंतु त्या अवस्थांबरोबर हा देह जात येत नाहीं ], तशीच आत्म्याला दुसऱ्या देहाची प्राप्ति होते, [ परंतु आत्मा नाश पावत नाहीं ]; असें समजून ज्ञानी त्या देहांतरप्राप्तीबद्दल मोहांत पडत नाहींत. ॥ १३ ॥**

आणखी असें पहा कीं, शरीर तर एकच असतें, पण वयपरत्वें त्यांत देखील भेद दृष्टीस पडतात, हें प्रत्यक्षच प्रमाण आहे. ८ त्याच शरिरावर बालपण आपण पाहतों; पुढें तेंच बालपण तारुण्यांत नाहींसें होतें; परंतु त्या प्रत्येकाबरोबर शरीर नाहींसें होत नाहीं. ९ त्याचप्रमाणें, असें पहा कीं, आत्म्याच्या ठिकाणीं अनंत शरीरें होतात जातात असें जाणणारास तुझ्याप्रमाणें मोहापासून दुःख होत नाहीं. ११०

**अर्जुना, मात्रा म्हणजे इंद्रियें, ह्यांचे स्पर्श म्हणजे विषयांशीं संबंध हे शीत व उष्ण, आणि सुख व दुःख देणारे आहेत; ते विषयसंबंध उत्पत्तिनाशरूप आहेत म्हणून अनित्य आहेत; तर, हे भारता, ते मिथ्या समजून सहन कर. ॥ १४ ॥**

इंद्रियांचे आधीन झाल्यामुळें हें मनुष्यास समजत नाहीं. इंद्रियांनीं मनुष्याचें अंतःकरण विषयांकडे ओढलें आहे. म्हणून हा भ्रम होतो. ११ इंद्रियांनीं विषय सेवन केले, म्हणजे सुखदुःखें उत्पन्न होतात; त्यामुळें अंतःकरण सुखदुःखांत गुंतून जातें. १२ ज्या शब्दादिक विषयांच्या ठिकाणीं एक स्थिति कधींच नसते, तेथें वेळेनुसार सुख किंवा दुःख दोन्हीही भासतात. १३ आतां शब्दविषयाची व्याप्ति पहा कीं, जर कानांनीं निंदा ऐकली, तर द्वेष उत्पन्न होतो; आणि स्तुति ऐकली, तर समाधान होतें. १४ आतां मऊपणा व कठीणपणा हे स्पर्श या विषयाचे दोन भेद आहेत; परंतु ते त्वचेच्या ठिकाणीं भासल्यावर सुख व दुःख उत्पन्न होतें. १५ तसेंच, भेसूर आणि सुरेख अशीं दोन लक्षणें रूपविषयाचीं आहेत, पण तीं डोळ्यांनीं पाहिल्यावर दुःख व सुख उत्पन्न होतें. १६ त्याचप्रमाणें, गंधविषयाचे सुगंध व दुर्गंध हे दोन भेद आहेत. हे घ्राणेंद्रियद्वारा संतोष व असंतोष उत्पन्न करतात. १७ तद्वतच रसाच्या दोन स्वरूपांपासून प्रीति आणि त्रास हीं उत्पन्न होतात; म्हणून, विषयसंग हाच मुख्य स्वरूपापासून भ्रष्ट करणारा आहे. १८ असें पहा कीं, जे इंद्रियाधीन होतात, त्यांना शीतोष्णांची बाधा होऊन ते आपोआपच सुखदुःखांचे आधीन होतात १९ इंद्रियांची खोडच अशी आहे कीं, या विषयांशिवाय त्यांना जगतांत रम्य असें दुसरें कांहींच वाटत नाहीं. १२० हे विषय कसे आहेत, याचा विचार केला तर, मृगजळाप्रमाणें किंवा स्वप्नांतील ऐश्वर्याप्रमाणें भासतात. २१ तसे हे विषय अनित्य आहेत, असा निश्चय कर, आणि पार्था, त्यांची यत्किंचितही संगती न धरितां तूं त्यांचा त्याग कर. २२

**हे पुरुषश्रेष्ठा, ज्या, सुखदुःख समान [मिथ्या] मानणाऱ्या विवेकी पुरुषाला हे विषयसंबंध बाधा करूं शकत नाहींत, तो पुरुष मोक्षप्राप्तीस योग्य होतो. ॥ १५ ॥**

जो पुरुष या विषयाच्या स्वाधीन होत नाहीं, त्याला सुख व दुःख हीं दोन्ही प्राप्त होत नाहींत; आणि गर्भवा-

तया ॥२३॥ तो नित्यरूप पार्था । वोळखावा सर्वथा । जो या इंद्रियार्थां । नागवेचि ॥२४॥

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।**
**उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥१६॥**

असतः भावः न विद्यते सतः अभावः न विद्यते, तत्त्वदर्शिभिः तु उभयोः अपि अनयोः अन्तः दृष्टः ॥ १६ ॥

आतां अर्जुना कांहीं एक । सांगेन मी आइक । जें विचारपर लोक । वोळखिती ॥२५॥ या उपाधिमाजीं गुप्त । चैतन्य असे सर्वगत । तें तत्त्वज्ञ संत । स्वीकारिती ॥२६॥ सलिलीं पय जैसें । एक होऊनि मीनलें असे । परी निवडूनि राजहंसें । वेगळें कीजे ॥२७॥ कीं अग्निमुखें किडाळ । तोडोनियां चोखाळ । निवाडिती केवळ । बुद्धिमंत ॥२८॥ ना तरी जाणिवेच्या आयणी । कारितां दधि कडसणी । मग नवनीत निर्वाणीं । दिसे जैसें ॥२९॥ कीं भूस बीज एकवट । उपणितां राहे घनवट । तेथ उडे तें फलकट । जाणों आलें ॥१३०॥ तैसें विचारितां निरसलें । तें प्रपंचु सहजें सांडवलें । मग तत्त्वता तत्त्व उरलें । ज्ञानियांसी ॥३१॥ म्हणोनी अनित्याच्या ठायीं । तयां आस्तिक्यबुद्धि नाहीं । निष्कर्षु दोहींही । देखिला असे ॥३२॥

**अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।**
**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥१७॥**

येन इदं सर्वं ततं तत् तु अविनाशि विद्धि. अस्य अव्ययस्य विनाशं कर्तुं कश्चित् न अर्हति. ॥ १७ ॥

देखें सारासार विचारितां । भ्रांति ते पाहीं असारता । तरी सार तें स्वभावता । नित्य जाणें ॥३३॥ हा लोकत्रयाकारु । तो जयाचा विस्तारु । तेथ नाम वर्ण आकारु । चिन्ह नाहीं ॥३४॥ जो सर्वदा सर्वगतु । जन्मक्षयातीतु । तया केलियाहि घातु । कदा नोहे ॥३५॥

**अंतवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः**
**अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत १८**

अनाशिनः अप्रमेयस्य नित्यस्य शरीरिणः इमे देहाः अन्तवन्तः (विवेकिभिः) उक्ताः, तस्मात्, भारत, युध्यस्व. ॥१८॥

आणि शरीरजात आघवें । हें नाशवंत स्वभावें । म्हणोनी तुवां झुंजावें । पंडुकुमरा ३६

**य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम् ।**
**उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते ॥१९॥**

यः एनं ( देहिनं ) हन्तारं वेत्ति यः च एनं हतं मन्यते, तौ उभौ न विजानीतः, अयं न हन्ति न हन्यते ॥ १९ ॥

तूं धरूनि देहाभिमानातें । दिठी सूनि शरीरातें । मी मारिता हे मरते । म्हणत आहासी ॥३७॥ तरी अर्जुना तूं हें नेणसी । जरी तत्त्वता विचारिसी । तरी वधिता तूं नव्हेसी । हे वध्य नव्हती ॥३८॥

**न जायते म्रियते वा कदाचि-**
**न्नायं भूत्वाऽभविता वा न भूयः ।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो**
**न हन्यते हन्यमाने शरीरे ॥२०॥**
**वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।**
**कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हंति कम् २१**

अयं कदाचित् न जायते न म्रियते वा, ( अयं ) भूत्वा भूयः अभविता न, अयं अजः नित्यः शाश्वतः पुराणः, शरीरे च हन्यमाने ( सति ) न हन्यते. ॥ २० ॥ पार्थ, यः एनं अविनाशिनं नित्यं अजं अव्ययं वेद, सः पुरुषः कथं कं घातयति कं हन्ति ? ( न कंचित्कथंचिदपि घातयति हन्ति वा )२१

जैसें स्वप्नामाजि देखिजे । तें स्वप्नींचि साच आपजे । मग चेऊनियां पाहिजे । तंव कांहीं नाहीं ॥३९॥ तैसी हे जाण माया । तूं भ्रमत आहासी वायां । शस्त्रें हाणितलिया छाया । जैसी आंगीं न रुपे ॥१४०॥ कां पूर्ण कुंभ उलंडला । तेथ बिंबाकारु दिसे भ्रंशला । परी भानु नाहीं नासला । तयासवें ॥४१॥ ना तरी मठीं आकाश जैसें । मठाकृती अवतरलें असे । तो भंगलिया आपैसें । स्वरूपचि ॥४२॥ तैसें शरीराच्या लोपीं । सर्वथा नाशु नाहीं स्वरूपीं । म्हणऊनि तूं हें नारोपीं । भ्रांति बापा ॥४३॥

त्याची संगति घडत नाहीं. ( जन्म प्राप्त होत नाहीं. ) २३ अर्जुना, जो या विषयांच्या पाशांत सांपडत नाहीं. तोच अविनाशी आहे असें समज. २४

**जें असत् म्हणजे मिथ्या, तें खरेपणास कधीं यावयाचें नाहीं; आणि जें खरें आहे, त्याचा नाश कधीं व्हावयाचा नाहीं. परंतु सत् व असत् ह्यांविषयीं हा सिद्धांत तत्त्ववेत्त्यांनीं [ मात्र ] जाणलेला आहे ! ॥ १६ ॥**

आतां, अर्जुना, तुला आणखी एक गोष्ट मी सांगतों; ती विचारवंत लोक ओळखतात. २५ ह्या जगामध्यें सर्वव्यापक असें जें एक गूढ चैतन्य आहे, त्याचा तत्त्वज्ञ लोक सदैव स्वीकार करतात. २६ दूध व पाणी एकत्र मिळविलें असतां ज्याप्रमाणें राजहंस पक्षी तें वेगळें करतात, २७ अथवा चतुर लोक डाकलग सोनें अग्नींत घालून ताव दिल्यावर शुद्ध करतात. २८ किंवा चातुर्यानें दहीं घुसळल्यानंतर शेवटीं जसें लोणी निघालेलें दृष्टीस पडतें, २९ अथवा कोंडा आणि धान्य हीं एकत्र असून वाऱ्यावर धरून उफणल्यावर ज्याप्रमाणें धान्य खालीं राहून फोल उडून जातें, १३० त्याप्रमाणें विचाराअंतीं प्रपंच सहजच नाहींसा होतो, आणि मग ज्ञानी पुरुषांला विचार करण्याला फक्त तत्त्व अर्थात् ब्रह्मच उरतें. ३१ म्हणून, त्यांची असताचे ठिकाणीं आस्तिक्यबुद्धि नसते; कारण सत् आणि असत् या दोहोंचाही परिणाम त्यांस माहीत असतो. ३२

**ज्या चैतन्यानें सर्व जगत् व्यापलें आहे, तें नाश पावणारें नव्हे असें समज. असें नाशरहित जें चैतन्य, त्याचा नाश करण्यास कोणीही समर्थ नाहीं. ॥ १७ ॥**

असें पहा कीं, खऱ्याखोट्यांचा विचार जर केला, तर सहजच, भ्रांति ही निस्सार आहे आणि सार हें स्वभावतःच अविनाशी आहे हें ध्यानांत धर. ३३ ज्यापासून हें त्रैलोक्य झालें आहे, त्यास नांव, रंग, रूप हीं कांहीं चिन्हें नाहींत. ३४ तो सदैव सर्वव्यापक असून जन्ममरणातीत आहे; त्याचा नाश करूं म्हटल्यास तो कधीं सुद्धां होणार नाहीं. ३५

**अविनाशी, ज्याचें मान करतां येत नाहीं, आणि जो नित्य आहे, अशा आत्म्याचे जे हे देह, ते नाशवंत आहेत, असें ज्ञानी म्हणतात; म्हणून हे भारता, तूं युद्ध कर. ॥ १८ ॥**

आणि, अर्जुना, शरीरमात्र स्वभावतःच नाशिवंत आहे, ह्याकरितां तूं युद्ध कर. ३६

**आत्मा मारणारा आहे व आत्मा मरणारा आहे असें जे समजतात, ते दोघेही अज्ञानी आहेत; कारण, आत्मा हा कोणास मारीतही नाहीं व कोणाकडून मारलाही जात नाहीं. ॥ १९ ॥**

तूं देहाचा अभिमान धरून व शरिरावर दृष्टि ठेवून मीं मारणारा आणि हे कौरव मरणारे असें म्हणत आहेस. ३७ पण, अर्जुना, त्यांतील तत्त्वार्थ तुला कळत नाहीं; जर यथार्थ विचार करशील, तर तूं मारणारा नव्हेस, व ते मरणारेही नव्हत. ३८

**हा [ आत्मा ] कधींही उत्पन्न होत नाहीं व कधींही मरत नाहीं; हा मागें जन्म पावला असून पुनः मृत्यु पावणार, असेंही नाहीं. हा जन्मरहित, नित्य, शाश्वत व अनादि आहे; आणि शरीराचा वध झाला तरी ह्याचा वध होत नाहीं. ॥ २० ॥ पार्था, हा अविनाशी, नित्य, जन्मरहित व विकार न पावणारा असा आहे असें जो जाणतो, तो पुरुष दुसऱ्याला कसा व कोणाकडून मारवील आणि मारील ? [ तर तो मारविणारही नाहीं व मारणाराही नाहीं ]. ॥ २१ ॥**

ज्याप्रमाणें स्वप्नांतील विषय स्वप्नांतच खरे भासतात, परंतु जागृत झाल्यावर पहावें तों कांहींएक नसतें, ३९ त्याप्रमाणें हे सर्व मायिक असून तूं भ्रमांत व्यर्थ पडला आहेस. अरे, मनुष्याच्या सांवलीवर शस्त्रप्रहार केला तर तो जसा त्याच्या अंगांत रुपत नाहीं, १४० किंवा पाण्यानें भरलेलें भांडें पालथें केल्यावर त्यांतील सूर्यबिंब नाहींसें झालेलें दिसतें; परंतु त्याच्याबरोबर खरा सूर्य नाश पावत नाहीं, ४१ अथवा आकाश हें बांधलेल्या घरांत त्या घराच्या आकृतीचें दिसतें, पण तें घर मोडल्यावर ज्याप्रमाणें त्याचें मूळ स्वरूपच राहतें, ४२ त्याचप्रमाणें, शरीर नाश पावलें तरी आत्म्याचा कधींही नाश होत नाहीं; म्हणून, बाबारे ! तूं नसतीच भ्रांति घेऊन बसूं नको. ४३

**वासांसि जीर्णानि यथा विहाय ।**
**नवानि गृण्हाति नरोऽपराणि ॥**
**तथा शरीराणि विहाय जीर्णा-**
**न्यन्यानि संयाति नवानि देही ॥२२॥**

यथा नरः जीर्णानि वासांसि विहाय अपराणि नवानि गृण्हाति, तथा देही जीर्णानि शरीराणि विहाय अन्यानि नवानि संयाति. ॥ २२ ॥

जैसें जीर्ण वस्त्र सांडिजे । मग नूतन वेढिजे । तैसें देहांतरातें स्वीकारिजे । चैतन्यनाथें ॥४४॥

**नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।**
**न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥२३॥**
**अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।**
**नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥२४॥**

एनं (प्रकृतं आत्मानं) शस्त्राणि न छिंदंति, एनं पावकः न दहति, एनं आपः न क्लेदयन्ति, एनं च मारुतः न शोषयति. ॥ २३ ॥ अयं अच्छेद्यः, अयं अदाह्यः, अयं अक्लेद्यः (अयं) च अशोष्यः एव (अस्ति.) अयं नित्यः सर्वगतः स्थाणुः अचलः सनातनः (अस्ति. ) ॥ २४ ॥

हा अनादि नित्यसिध्दु । निरुपाधि विशुध्दु । म्हणऊनि शस्त्रादिकीं छेदु । न घडे यया ॥४५॥ हा प्रळयोदकें नाप्लवे । अग्निदाहो न संभवे । एथ महाशोषु न प्रभवे । मारुताचा ॥४६॥ अर्जुना हा नित्यु । अचळु हा शाश्वतु । सर्वत्र सदोदितु । परिपूर्णु हा ॥४७॥

**अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।**
**तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥२५॥**

अयं अव्यक्तः अयं अचिन्त्यः अयं अविकार्यः उच्यते; तस्मात् एनं एवं विदित्वा (त्वं) अनुशोचितुं न अर्हसि ॥२५॥

हा तर्कांचिये दिठी । गोचर नोहे किरीटी । ध्यान याचिये भेटी । उत्कंठा वाहे ॥४८॥ हा सदा दुर्लभु मना । आपु नोहे साधना । निःसीमु हा अर्जुना । पुरुषोत्तमु ॥४९॥ हा गुणत्रया रहितु । अनादि अविकृतु । व्यक्तीसि अतीतु । सर्वरूप ॥१५०॥ अर्जुना ऐसा हा जाणावा । सकळात्मकु देखावा । मग सहजें शोकु आघवा । हरेल तुझा ॥५१॥

**अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।**
**तथाऽपि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि ॥२६॥**

अथ च (यदि) एनं नित्यजातं नित्यं मृतं वा मन्यसे, तथापि, महाबाहो, त्वं एवं शोचितुं न अर्हसि. ॥ २६ ॥

अथवा ऐसा नेणसी । तूं अंतवंताचि मानिसी । तऱ्ही शोचूं न पवसी । पंडुकुमरा ॥५२॥ जो आदि स्थिति अंतु । हा निरंतर असे नित्यु । जैसा प्रवाहो अनुस्यूतु । गंगाजळाचा ॥५३॥ तें आदि नाहीं खंडलें । समुद्रीं तरी असे मिनलें । आणि जातचि मध्यें उरलें । दिसे जैसें ॥५४॥ इयें तीन्ही तयापरी । सरसींच सदा अवधारीं । भूतांसि कवणीं अवसरीं । ठाकती ना ॥५५॥ म्हणोनि हें आघवें । एथ तुज नलगे शोचावें । जे स्थितीचि हे स्वभावें । अनादि ऐसी ॥५६॥ ना तरी हें अर्जुना । नयेचि तुझिया मना । जे देखोनि लोकु अधीना । जन्मक्षया ॥५७॥ तरी येथ कांहीं । तुज शोकासि कारण नाहीं । हे जन्ममृत्यु पाहीं । अपरिहर ॥५८॥

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।**
**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥२७॥**

जातस्य हि मृत्युः ध्रुवः (अस्ति), मृतस्य च जन्म ध्रुवम् अस्ति ;तस्मात् अपरिहार्ये अर्थे त्वं शोचितुं न अर्हसि. २७

उपजे तें नाशे । नाशलें पुनरपि दिसे । हें घटिकायंत्र जैसें । परिभ्रमे गा ॥५९॥ ना तरी उदो अस्तु आपैसे । अखंडित होत जात जैसें । हें जन्ममरण तैसें । अनिवार जगीं ॥१६०॥ महाप्रळयअवसरें । हें त्रैलोक्यही संहरे । म्हणोनि हा न परिहरे । आदि अंतु ॥६१॥ तूं जरी हें ऐसें मानिसी । तरी खेदु कां करिसी । काय जाणतचि नेणसी । धनुर्धरा ॥६२॥ एथ आणिकही एक पार्था । तुज बहुतीं परी पहातां । दुःख करावया सर्वथा । विषो नाहीं ॥६३॥

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।**
**अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥२८॥**

भारत, भूतानि अव्यक्तादीनि व्यक्तमध्यानि अव्यक्तनिधनानि एव ( संति ). तत्र परिदेवना का ? ॥ २८ ॥

जसा पुरुष जुनीं वस्त्रें टाकून दुसरीं नवीं घेतो, तसा आत्मा जुनीं शरीरें टाकून दुसरीं नवीं धारण करितो. ॥ २२ ॥

मनुष्य ज्याप्रमाणें जुनें झालेलें वस्त्र टाकून नवें धारण करितो, त्याप्रमाणें हा चैतन्यनाथ–आत्मा एक देह टाकून दुसऱ्याचा स्वीकार करतो ४४

ह्याला [ आत्म्याला ] शस्त्रें तोडीत नाहींत; ह्याला अग्नि जाळीत नाहीं; ह्याला पाणी भिजवीत नाहीं; व ह्याला वारा सुकवीत नाहीं. ॥२३॥ हा छिन्न होण्याजोगा नाहीं, हा जाळतां येण्यासारखा नाहीं, हा भिजवितां येण्यासारखा नाहीं, व हा सुकवितां येण्याजोगा नाहीं; तर हा नाश न पावणारा, सर्वव्यापी, स्थिर, अचल, आणि त्रिकाल राहणारा असा आहे. ॥२४॥

हा आत्मा जन्ममरणरहित असून नित्य स्वतःसिद्ध आहे; व तो उपाधिरहित असून शुद्ध आहे; म्हणून, ह्याचा शस्त्रादिकांनीं सुद्धां घात होत नाहीं. ४५ हा प्रलयकालच्या पाण्यांत बुडत नाहीं हा अग्नीपासून जळण्याचा संभव नाहीं; तसेंच वायूचीही याला शुष्क करण्याची शक्ति नाहीं. ४६ म्हणून, अर्जुना, हा नित्य, क्रियारहित व शाश्वत असून सर्व ठिकाणीं पूर्ण भरलेला आहे. ४७

ह्याला [आत्म्याला] आकार नाहीं; चित्तानें ह्याचें चिंतन करतां येत नाहीं; व हा विकाररहित आहे; असें म्हणतात. ह्यास्तव आत्मा हा अशा प्रकारचा आहे असें समजल्यावर तुला शोक करणें योग्य नाहीं. ॥२५॥

हा तर्कशास्त्राच्या दृष्टीनें दिसणारा नव्हे; ध्यानाला तर याच्या भेटीची उत्कंठा लागलेली असते; ४८ अर्जुना, हा मनास नेहमीं दुर्लभ, साधनानें प्राप्त न होणारा, अनंत व जीवमात्रांत श्रेष्ठ आहे. ४९ हा गुणत्रयापासून वेगळा, अनादि, विकाररहित, आकाराच्या पलीकडला व वस्तुमात्रांच्या स्वरूपांत व्याप्त आहे. १५० अर्जुना, अशा प्रकारें हा सर्वव्यापी आहे हें तूं जाणलेंस, म्हणजे सहज शोकरहित होशील. ५१

आतां, आत्मा नित्य उत्पन्न होतो व नित्य नाश पावतो, असें जरी तुझें मत असलें; तरी, अर्जुना, तुला त्याच्याबद्दल असा शोक करणें योग्य नाहीं. ॥२६॥

अथवा अर्जुना, असें न जाणतां हा नाशवंतच आहे असें जरी तूं मानलेंस, तरी देखील तुला शोक करण्याचें कारण नाहीं. ५२ कारण, गंगेच्या पाण्याचा ओघ ज्याप्रमाणें अखंड आहे, त्याप्रमाणें उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं सारखीं चाललीं आहेत. ५३ तें गंगेचें पाणी उत्पन्न होत असतें, व मध्यें प्रवाहांत वहात असून शेवटीं समुद्रास मिळतें, ५४ त्या आत्म्याला ह्या तिन्ही अवस्था नेहमीं सारख्याच आहेत. प्राणिमात्रास या तिन्ही अवस्था कोणत्याही वेळीं सोडीत नाहींत असें जाण. ५५ म्हणून तुला या सगळ्यांबद्दल शोक करण्याचें कारण नाहीं. या सर्वांचा स्वभावतःच अनादि सृष्टिक्रम चालत आलेला आहे. ५६ हें तुझ्या मनांत येत नसेल, तर प्राणिमात्र जन्ममरणाच्या आधीन आहे असें जर आहे, ५७ तर हें जन्ममरण न टळणारें आहे असें समजून तुला शोक करण्याचें कारण नाहीं. ५८

कारण, जो उत्पन्न झाला तो निश्चयेंकरून मरण पावतो, व जो मरतो तो निश्चयेंकरून पुनः जन्म पावतो; ह्यास्तव ही गोष्ट टाळतां येण्यासारखी नाहीं, म्हणून हिजबद्दल शोक करणें तुला योग्य नाहीं. ॥२७॥

जन्मास आलें तें नाश पावणार, व नाश पावलेलें पुनः जन्मास येणार हें रहाटगाडगें सारखें चालू आहे. ५९ अथवा सूर्याचे उदयास्त ज्याप्रमाणें आपोआप निरंतर होत असतात, चुकत नाहींत, त्याप्रमाणें या जगांत जन्ममरण अनिवार आहे. १६० महाप्रलयकालीं ह्या त्रैलोक्याचाही संहार होतो, म्हणूनच आदि व अंत हे अपरिहार्य आहेत, ६१ अशी जर तुझी समजूत असेल, तर, अर्जुना, खेद कां करतोस ? आणि समजून उमजून वेडांत कां शिरतोस ? ६२ पार्था, आणखीही एका बाजूनें विचार केला तर ह्या ठिकाणीं तुला दुःख करण्याचें कारण नाहीं. ६३

हे भारता, सर्व भूतें मुळीं अव्यक्त म्हणजे अस्पष्ट स्थितींत असतात; नंतर मध्यें व्यक्तभावाला येतात; व शेवटीं अव्यक्तांतच जातात. तेव्हां त्यांच्याबद्दल शोक कसला करावयाचा ? २८

जियें समस्तें इयें भूतें । जन्माआदि अमूर्तें । मग पातलीं व्यक्तीतें । जन्मलेया ॥६४॥ तियें क्षयासि जेथ जाती । तेथ निभ्रांत आनें नव्हती । देखें पूर्वस्थितीच येती । आपुलिये ॥६५॥ येर मध्यें जें प्रतिभासे । तें निद्रिता स्वप्न जैसें । तैसा आकारु हा मायावशें । सत्स्वरूपीं ॥६६॥ ना तरी पवनें स्पर्शिलें नीर । पढियासे तरंगाकार । का परापेक्षा अळंकार । व्यक्ती कनकीं ॥६७॥ तैसें सकळ हें मूर्त । जाण पां मायाकरित । जैसें आकाशीं बिंबत । अभ्रपटळ ॥६८॥ तैसें आदीचि जें नाहीं । तयालागीं तूं रुदसी कायी । तूं अवीट तें पाहीं । चैतन्य एक ॥६९॥ जयाचि आर्तीचि भोगित । विषयीं त्यजिले संत । जयालागीं विरक्त । वनवासिये ॥१७०॥ दिठी सूनि जयातें । ब्रह्मचर्यादि व्रतें । मुनीश्वर तपातें । आचरताती ॥७१॥

**आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेन- ।**
**माश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ॥**
**आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति ।**
**श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥२९॥**

कश्चित् एनं आश्चर्यवत्पश्यति; तथा एव च अन्यः एनं आश्चर्यवत् वदति; अन्यः च एनं आश्चर्यवत् शृणोति; कश्चित् एनं श्रुत्वा अपि न वेद. ॥ २९ ॥

एक अंतरीं निश्चळ । जें निहाळितां केवळ । विसरले सकळ । संसारजात ॥७२॥ एकां गुणानुवादु करितां । उपरति होऊनि चित्ता । निरवधि तल्लीनता । निरंतर ॥७३॥ एक ऐकतांचि निवाले । ते देहभावीं सांडिले । एक अनुभवें पातले । तद्रूपता ॥७४॥ जैसें सरिताओघ समस्त । समुद्रामाजिं मिळत । परी माघौते न समात । परतलें नाहीं ॥७५॥ तैसिया योगीश्वरांचिया मती । मिळणींसवें एकवटती । परी जे विचारूनि पुनरावृत्ति । भजतीचिना ॥७६॥

**देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।**
**तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ३०**

भारत, सर्वस्य देहे ( वर्तमानः ) अयं देही नित्यं अवध्यः; तस्मात् त्वं सर्वाणि भूतानि शोचितुं न अर्हसि. ॥३०॥

जें सर्वत्र सर्वही देहीं । जया करितांही घातु नाहीं । तें विश्वात्मक तूं पाहीं । चैतन्य एक ७७ जयाचेनि स्वभावें । हें होत जात आघवें । तरी सांग काय शोचावें । एथ तुवां ॥७८॥ एऱ्हवीं तरी पार्था । तुज कां नेणों न मनें चित्ता । परी किडाळ हें शोचितां । बहुतीं परी ॥७९॥

**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि ।**
**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ३१**

स्वधर्मं च अपि अवेक्ष्य विकंपितुं न अर्हसि. क्षत्रियस्य हि धर्म्यात् युद्धात् अन्यत् श्रेयः न विद्यते. ॥ ३१ ॥

तूं अझुनि कां न विचारिसी । काय हें चिंतितु आहासी । स्वधर्मु तो विसरलासी । तरावें जेणें ॥१८०॥ या कौरवां भलतें जाहलें । अथवा तुजाचि कांहीं पातलें । कीं युगचि हें बुडालें । जऱ्ही एथ ॥८१॥ तरी स्वधर्मु एक आहे । तो सर्वथा त्याज्य नोहे । मग तरिजेल काय पाहें । कृपाळूपणें ॥८२॥ अर्जुना तुझें चित्त । जऱ्ही जाहलें द्रवीभूत । तऱ्ही हें अनुचित । संग्रामसमयीं ८३ अगा गोक्षीर जरी जाहलें । तरी पथ्यासि नाहीं म्हणितलें । ऐसेनिहि विष होय सुदलें । नवज्वरीं देतां ॥८४॥ तैसें आनीं आन करितां । नाशु होईल हिता । म्हणऊनि तूं आतां । सावधु होईं ॥८५॥ वायांचि व्याकुळ कायी । आपुला निजधर्मु पाहीं । जो आचरितां बाधु नाहीं । कवणें काळीं ॥८६॥ जैसें मार्गेंचि चालतां । अपावो न पवे सर्वथा । कां दीपाधारें वर्ततां । नाडळिजे ॥८७॥ तयापरी पार्था । स्वधर्मे राहाटतां । स-

हे सर्व प्राणी उत्पत्तीपूर्वी निराकार असून, जन्मधारण केल्यावर आकाराला आले. ६४ ते जेथें लय पावतात, तेथेंही ते निःसंशय दुसऱ्या स्थितीत जात नाहींत, तर आपल्या पूर्वस्थितीला म्हणजे अव्यक्ताला प्राप्त होतात. ६५ निजलेल्या मनुष्याला ज्याप्रमाणें स्वप्न दिसतें, त्याप्रमाणें, जन्म व मृत्यु या दोन अवस्थांमध्यें दिसणारे आकार मायेच्या योगानें ब्रह्मस्वरूपावर भासतात. ६६ किंवा उदकाला वाऱ्यानें स्पर्श केल्यावर त्याच्यावर जशा लाटा दिसतात, किंवा दुसऱ्याच्या इच्छेनें सुवर्णाच्या ठिकाणीं अलंकार होतो, ६७ त्याप्रमाणें, सर्व प्राणी मायेनें उत्पन्न झालेले आहेत असें समज. ज्याप्रमाणें आकाशांत ढग उत्पन्न होतात, त्याप्रमाणें जें मुळांतच नाहीं, त्याजबद्दल तूं कां रडतोस? तर अक्षय्य असें जें ब्रह्म त्याजकडे लक्ष दे. ६८।६९ साधूंना त्या ब्रह्माची आवड उत्पन्न झाल्यावर त्यांना विषय सोडून जातात, आणि त्या ब्रह्माकरितां ते वनवासी किंवा वैराग्यसंपन्न होतात; १७० आणि त्यावर दृष्टि ठेवून मननशील पुरुष ब्रह्मचर्यादि व्रतें व तपें आचरतात. ७१

**कोणी आत्मस्वरूपाला आश्चर्य म्हणून पाहतो, कोणी आश्चर्य म्हणून त्याचें वर्णन करितो, कोणी आश्चर्य म्हणून ऐकतो, आणि कोणी त्याचे गुणानुवाद ऐकूनही त्याला जाणत नाहीं! ॥२९॥**

त्या शुद्ध ब्रह्माकडे एकाग्र अंतःकरणानें पाहतां पाहतां कित्येकजण अंतर्यामीं निश्चल होऊन सर्व संसार विसरतात, ७२ कित्येक त्याचे गुणानुवाद गातांना चित्तास उपरति उत्पन्न होऊन शेवटीं त्याच्या ठिकाणीं सर्वदा निमग्न होतात, ७३ कोणी त्याचें स्वरूप ऐकूनच शांत होऊन देहाभिमानापासून निवृत्त होतात, आणि कोणी अनुभवानें तद्रूप होतात. ७४ ज्याप्रमाणें नद्यांचे सर्व ओघ समुद्रास मिळतात–परंतु समुद्रांत जागा नाहीं म्हणून मागें परतले नाहींत, ७५ त्याप्रमाणें ह्या थोर योग्यांच्या बुद्धि ब्रह्मसाक्षात्काराबरोबर तद्रूप होऊन जातात;–परंतु अशा रीतीनें विचार करून तद्रूप झालेले पुरुष पुन्हां संसाराला येत नाहीत. ७६

**अर्जुना, सर्व देहांत विद्यमान असणारा देही जो हा आत्मा, तो कधींही वध पावत नाहीं; म्हणून सर्व भूतांच्याबद्दल शोक करणें तुला योग्य नाहीं. ॥३०॥**

अर्जुना, सर्वत्र, सर्वांतर्यामीं व्यापलेलें व ज्याचा घात करूं गेलें असतां होत नाहीं असें एक चैतन्यच असून तें जगद्रूप आहे हें लक्षांत ठेव; ७७ ज्या चैतन्याच्या ठिकाणीं सहजरीत्या जर सर्व गोष्टींची घडामोड होते, तर मग तूंच सांग कीं, कशाबद्दल शोक कां करावा? ७८ पार्था, हें साहजिक तुझ्या तरी मनास कां येऊं नये, हें मला समजत नाहीं; परंतु एकंदरींत हा शोक करणें तुला निंद्य आहे. ७९

**आणखी, स्वधर्माच्या दृष्टीनेंही त्वां कंपित होणें योग्य नाहीं; कारण, धर्मयुद्ध प्राप्त झालें असतां त्याहून क्षत्रियांना दुसरें कांहींही कल्याणकारक नाहीं. ॥३१॥**

अरे, अजून तरी तूं कां विचार करीत नाहींस? हें काय तूं घेऊन बसला आहेस? ज्या स्वधर्मानें मनुष्य तरतो, त्याला तर तूं अगदीं विसरलास! १८० असें समज कीं, ह्या ठिकाणीं या कौरवांचें भलतेंच कांहीं झालें, किंवा तुझें कांहीं कमजास्त झालें, अथवा सगळें जग नाहींसें झालें, ८१ तरी स्वधर्म म्हणून जो आहे, तो कदापि त्याज्य नाहीं; त्याचा त्याग केल्यावर, तुझ्या मनांत जी दया उत्पन्न झाली आहे, तिच्यापासून तूं तरला जाशील काय? ८२ अर्जुना, ह्या ठिकाणीं तुझें चित्तांत जरी दया उत्पन्न झाली आहे, तरी ती ह्या युद्धप्रसंगीं अयोग्य आहे. ८३ अरे, असें पहा कीं, गाईचें दूध उत्तम आहे, तरी तें पथ्याला सांगितलें नाहीं, असें असूनही जर तें नवज्वराच्या मनुष्यास दिलें, तर विषवत् होतें; ८४ त्याचप्रमाणें, भलत्यानें भलतेंच म्हणजे ब्राह्मणानें क्षत्रियादिकांच्या कर्माचें किंवा क्षत्रियादिकांनीं ब्राह्मणादिकांच्या कर्माचें आचरण केलें, तर त्याच्या हिताचा नाश होतो; म्हणून तूं आतां सावध हो, ८५ व्यर्थ शोकाकुल होऊं नको; आणि ज्याचें आचरण केलें असतां कोणतेंही काळीं दोष घडत नाहीं, त्या आपल्या क्षत्रियधर्माकडे लक्ष दे. ८६ ज्याप्रमाणें योग्य मार्गानें चाललें म्हणजे कधींही अपाय घडत नाहीं, किंवा दिव्याच्या उजेडानें चाललें असतां ठेंच लागत नाहीं, ८७ त्याप्रमाणें, अर्जुना, जो

कळ कामपूर्णता । सहजें होय ॥८८॥ म्हणोनि यालागीं पाहीं । तुम्हां क्षत्रियां आणीक कांहीं । संग्रामावांचूनि नाहीं । उचित जाणें ॥८९॥ निष्कपटा होआवें । उसिणा घाई झुंझावें । हें असो काय सांगावें । प्रत्यक्षावरी ॥१९०॥

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।**
**सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभंते युद्धमीदृशम् ॥३२॥**

पार्थ, अपावृतं स्वर्गद्वारं ( इव ) यदृच्छया उपपन्नं ईदृशं युद्धं सुखिनः क्षत्रियाः लभंते. ॥ ३२ ॥

अर्जुना झुंज देखे आतांचें । हें हो कां जें दैव तुमचें । कीं निधान सकळ धर्माचें । प्रगटलें असे ॥९१॥ हा संग्रामु काय म्हणिपे । कीं स्वर्गुचि येणें रूपें । मूर्त कां प्रतापें । उदो केला ॥९२॥ ना तरी गुणाचेनि पतिकरें । आर्तीचेनि पडिभरें । हे कीर्तीचि स्वयंवरें । आली तुज ॥९३॥ क्षत्रियें बहुत पुण्य कीजे । तैं झुंज ऐसें लाहिजे । जैसें मार्गें जातां आडळिजे । चिंतामणि ॥९४॥ ना तरी जांभया पसरे मुख । तेथ अवचटें पडे पीयूख । तैसा संग्रामु हा देख । पातला असे ॥९५॥

**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।**
**ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ३३**

अथ त्वं इमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि चेत् ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापं अवाप्स्यसि. ॥ ३३ ॥

आतां हा ऐसा अव्हेरिजे । मग नाथिलें शोचूं बैसिजे । तरी आपण आहाणा होइजे । आपणपेयां ॥९६॥ पूर्वजांचें जोडलें । आपणचि होय धाडिलें । जरी आजि शस्त्र सांडिलें । रणीं इयें ॥९७॥ असती कीर्ति जाईल । जगचि अभिशापु देईल । आणि गिंवसित पावतील । महादोष ॥९८॥ जैसी भ्रतारेंहीन वनिता । उपहती पावे सर्वथा । तैसी दशा जीविता । स्वधर्मेंवीण ॥९९॥ ना तरी रणीं शव सांडिजे । तें चौमेरीं गिधीं विदारिजे । तैसें स्वधर्महीना अभिभविजे । महादोषीं ॥२००॥

**अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यंति तेऽव्ययाम् ।**
**संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥३४॥**

अपि च भूतानि ते अव्ययां अकीर्तिं कथयिष्यंति, संभावितस्य च अकीर्तिः मरणात् अतिरिच्यते. ॥ ३४ ॥

म्हणोनि स्वधर्मु हा सांडसील । तरी पापा वरपडा होसील । आणि अपेश तें न वचेल । कल्पांतवरी ॥१॥ जाणतेनि तंवचि जियावें । जंव अपकीर्ति आंगा न पवे । आणि सांग पां केविं निगावें । एथोनियां ॥२॥ तूं निर्मत्सर सदयता । येथूनि निघसील कीर माघौता । परी ते गती समस्तां । न मनेल ययां ॥३॥ हे चहूंकडूनि वेढितील । बाणवरी घेतील । तेथ पार्था न सुटिजेल । कृपाळूपणें ॥४॥ ऐसेनिहि प्राणसंकटें । जरी विपायें पां निघणें घटे । तरी तें जियालें वोखटें । मरणाहुनी ॥५॥

**भयाद्रणादुपरतं मंस्यंते त्वां महारथाः ।**
**येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥३५॥**

महारथाः त्वां भयात् रणात् उपरतं मंस्यन्ते येषां च त्वं बहुमतः भूत्वा लाघवं यास्यसि. ॥ ३५ ॥

तूं आणिकही एक न विचारिसी । एथ संभ्रमें झुंजों आलासी । आणि सकणवपणें निघालासी । मागुता जरी ॥६॥ तरी तुझें तें अर्जुना । या वैरियां दुर्जनां । कां प्रत्यया येईल मना । सांगें मज ॥७॥

**अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यंति तवाहिताः ।**
**निंदन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ३६**

तव सामर्थ्यं निन्दन्तः तव अहिताः बहून् अवाच्यवादान् वदिष्यंति; ततः दुःखतरं नु किम् ? ॥ ३६ ॥

हे म्हणती गेला रे गेला । अर्जुन आम्हां बिहाला । हा सांगें बोलु उरला । निका कायी ॥८॥ लोक सायासें करूनि बहुतें । कां वेंचिती आपुलीं जीवितें । परी वाढविती कीर्तीतें । धनु-

स्वधर्मानें वागतो, त्याच्या सर्व कामना सहज पूर्ण होतात. ८८ ह्याकरितां, तुम्हां क्षत्रियांना संग्रामावांचून दुसरें कांहीं योग्य नाहीं. ८९ मनांत कपट न धरतां समोरासमोर उभें राहून एकमेकांवर प्रहार करून युद्ध करावें हें प्रत्यक्ष तुला माहीत आहेच; आणखी आम्हीं काय सांगावें? १९०

**पार्था, सहजरीत्या प्राप्त झालेला हा युद्धप्रसंग म्हणजे स्वर्गाचें उघडलेलें द्वारच होय! असलें युद्ध भाग्यशाली क्षत्रियांनाच प्राप्त होतें. ॥ ३२ ॥**

अर्जुना, हें युद्ध म्हणजे तुमचें पूर्वजन्मांचें भाग्यच समजा! अथवा सर्व धर्मांचा ठेवाच प्रकट झाला असें म्हणा! ९१ अरे, याला काय युद्ध म्हणावें कीं, तुमच्या प्रतापानें मूर्तिमंत स्वर्गच उदयाला आला आहे कीं काय? ९२ किंवा तुझ्या गुणांचा लौकिक ऐकून तुजवर अतिशय आसक्त झाल्यामुळें कीर्तिरूप स्त्रीच तुला वरण्यास आली आहे कीं काय असें वाटतें. ९३ अरे! असल्या प्रकारचें युद्ध क्षत्रियाला सहज प्राप्त होणारें नव्हे, कारण–क्षत्रियानें पुष्कळ पुण्य करावें, तेव्हां त्याला हा असला युद्धप्रसंग प्राप्त होतो. परंतु, ज्याप्रमाणें एकाद्याला मार्गानें जातांना इच्छित फल देणारा चिंतामणि सांपडावा, ९४ किंवा जांभईनें तोंड पसरल्यावर अकस्मात् त्यांत अमृत पडावें, त्याप्रमाणें हा युद्धप्रसंग तुम्हांला प्राप्त झाला आहे! ९५

**असें असतां, जर तूं ह्या धर्मयुद्धाचा त्याग करशील, तर इहलोकींची कीर्ति व परलोकाला साधन जो स्वधर्म तो नाहींसा होऊन पापाची जोड करशील. ॥ ३३ ॥**

आतां, असला हा संग्राम टाकून भलत्या गोष्टीचा शोक करीत बसलास, तर आपली आपणच हानि करून घेतल्यासारखें होईल. ९६ ह्या रणाचे ठिकाणीं जर तूं आज शस्त्र टाकून दिलेंस, तर पूर्वजांनीं जोडून ठेविलेली कीर्ति घालविलीस असें होईल; ९७ इतकेंच नव्हे, तर तुझ्या असलेल्या कीर्तीचाही नाश होईल, व सर्व जग तुझी निंदा करील; आणि मग तुझ्या ठिकाणीं वास्तव्य करण्याकरितां महादोष तुला शोधीत येतील. ९८ ज्याप्रमाणें पतिविरहित स्त्री सर्वथा तिरस्करणीय होते, त्याप्रमाणेंच स्वधर्मत्याग करणाराची अवस्था होते; ९९ अथवा रणांत प्रेत पडलें म्हणजे ज्याप्रमाणें चोहोंकडून त्याला गिधाडें फाडतात, त्याप्रमाणें स्वधर्महीन मनुष्याला महादोष व्यापून नाश करितात. २००

**आणखी, सर्व लोक निरंतर तुझी अपकीर्ति वर्णन करतील. संभावित पुरुषाला अपकीर्ति ही मरणापेक्षांही अधिक दुःखकर आहे. ३४**

ह्याकरितां जर तूं प्रस्तुत प्राप्त झालेल्या क्षत्रियधर्माचा त्याग करशील, तर तुला पाप लागेल; आणि कल्पांतापर्यंतही अपयशाचा डाग नाहींसा होणार नाहीं. १ जोपर्यंत अपकीर्ति झाली नाहीं, तोंपर्यंतच झाल्यानें जगावें; असें असतां तूंच सांग कीं, आतां एथून कसे परत जावें? २ सदय अंतःकरणानें व मत्सररहित असा तूं माघारा फिरशील खरा, परंतु ह्या सर्वांना कांहीं ती गोष्ट पटणार नाहीं. ३ हे कौरव तुला चोहींकडून वेढतील, व तुजवर बाणांचा मारा करतील; पार्था, मग त्या प्रसंगीं ह्या तुझ्या कनवाळूपणानें कांहीं तुझी सुटका होणार नाहीं. ४ इतकेंही करून जर कदाचित् मोठ्या कष्टानें एथून तुझी सुटका झाली, तरी तें वांचणें मरणापेक्षांही वाईट आहे. ५

**[ हे सर्व ] महारथी तूं भयानें रणांतून पळून गेलास असें मानतील; आणि मग, तूं ह्या सर्वांना जो बहुमान्य आहेस, त्या तुला कमीपणा येईल!**

आणखी एक गोष्टीचा तूं विचार केला नाहींस; तूं ह्या ठिकाणीं मोठ्या थाटानें युद्धास आला असून जर दयार्द्र होऊन माघारा जाण्यास निघालास, ६ तर, अर्जुना, तूंच सांग कीं, तुझें तें दयाळूपण हे तुझे दुर्जन वैरी कौरव ह्यांना खरें वाटेल का? ७

**तुझ्या सामर्थ्याची निंदा करून तुझे शत्रु न बोलावीं अशीं पुष्कळ दुर्भाषणें तुझ्यासंबंधानें बोलतील, ह्यापेक्षां अधिक दुःखकारक तें काय आहे? ॥ ३६ ॥**

हे म्हणतील, "गेला रे गेला! अर्जुन आम्हांस भिऊन पळून गेला!" अरे, असा हा दोष तुझ्यावर राहिलेला चांगला का! ८ धनुर्धरा, पाहिजे तितके सायास करून, किंवा प्रसंगीं प्राणही खर्ची घालून लोक ज्या कीर्तीचें सं-

धरा ॥९॥ ते तुज अनायासें । अनकळित जोडिली असे । हें अद्वितीय जैसें । गगन आहे ॥२१०॥ तैसी कीर्ति निःसीम । तुझ्या ठायीं निरुपम । तुझे गुण उत्तम । तिहीं लोकीं ॥११॥ दिगंतींचे भूपति । भाट होऊनि वाखाणिती । जे ऐकिलिया दचकिती । कृतांतादिक ॥१२॥ ऐसी महिमा घनवट । गंगा तैसी चोखट । जया देखीं जगीं सुभट । वांट जाहली ॥१३॥ तें पौरुष तुझें अद्भुत । आइकोनियां हे समस्त । जाहले आथि विरक्त । जीवितेंसी ॥१४॥ जैसा सिंहाचिया हांका । युगांतु होय मदमुखा । तैसा कौरवां अशेखां । धाकु तुझा ॥१५॥ जैसे पर्वत वज्रातें । ना तरी सर्प गरुडातें । तैसे अर्जुना हे तूंतें । मानिती सदा ॥१६॥ तें अगाधपण जाईल । मग हीणावो अंगा येईल । जरी मागुता निघसील । न झुंजतचि ॥१७॥ आणि हे पळतां पळों नेदिती । धरूनि अवकळा करिती । न गणित कुटी बोलती । आइकतां तुज ॥१८॥ मग ते वेळीं हियें फुटावें । आतां लाठेपणें कां न झुंजावें । हे जिंतलें तरी भोगावें । महीतळ ॥१९॥

**हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं ।**
**जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ॥**
**तस्मादुत्तिष्ठ कौंतेय ।**
**युद्धाय कृतनिश्चयः ॥३७॥**

हतः स्वर्गं प्राप्स्यसि वा जित्वा महीम् भोक्ष्यसे वा; तस्मात् कौंतेय, युद्धाय कृतनिश्चयः उत्तिष्ठ. ॥ ३७ ॥

ना तरी रणीं एथ । झुंजतां वेंचलें जीवित । तरी स्वर्गसुख अनकळित । पावसील ॥२२०॥ म्हणोनि ये गोठी । विचारु न करीं किरीटी । आतां धनुष्य घेऊनि उठीं । झुंझ वेगीं ॥२१॥ देखें स्वधर्मु हा आचरतां । दोषु नाशे असतां । तुज भ्रांति हे कवण चित्ता । पातकाची ॥२२॥ सांगें प्लवेंचि काय बुडिजे । कां मार्गीं जातां आडळिजे । परी विपायें चालों नेणिजे । तरी तेंही घडे ॥२३॥ अमृतें तरीचि मरिजे । जरी विखेंसीं सेविजे । तैसा स्वधर्मीं दोषु पाविजे । हेतुकपणें ॥२४॥ म्हणोनियां पार्था । हेतु सांडूनि सर्वथा । तुज क्षात्रवृत्ति झुंजतां । पाप नाहीं ॥ २५ ॥

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।**
**ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥३८॥**

सुखदुःखे, लाभालाभौ, जयाजयौ समे कृत्वा ततः युद्धाय युज्यस्व, एवं पापं न अवाप्स्यसि. ॥ ३८ ॥

सुखीं संतोषा न यावें । दुःखीं विषादा न भजावें । आणि लाभालाभ न धरावे । मनामाजीं ॥२६॥ एथ विजयपण होईल । कीं सर्वथा देह जाईल । हें आधींचि कांहीं पुढील । चिंतावेना ॥२७॥ आपणयां उचिता । स्वधर्में राहाटतां । जें पावे तें निवांता । साहोनि जावें ॥२८॥ ऐसेया मनें होआवें । तरी दोषु न घडे स्वभावें । म्हणोनि आतां झुंजावें । निभ्रांत तुवां ॥२९॥

**एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धियोगे त्विमां शृणु ।**
**बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि ३९.**

पार्थ, एषा ते सांख्ये बुद्धिः अभिहिता, योगे तु इमां शृणु, यया बुद्ध्या युक्तः (त्वं) कर्मबंधं प्रहास्यसि. ॥३९॥

हे सांख्यस्थिति मुकुलित । सांगितली तुज येथ । आतां बुद्धियोगु निश्चित । अवधारीं पां ॥२३०॥ जया बुद्धियुक्ता । जाहलिया पार्था । कर्मबंधु सर्वथा । बाधूं न पवे ॥३१॥ जैसें वज्रकवच लेइजे । मग शस्त्रांचा वर्षावो साहिजे । परी जैतेंसीं उरिजे । अचुंबित ॥३२॥

**नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।**
**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ४०**

इह अभिक्रमनाशः न अस्ति, प्रत्यवायः न विद्यते. अस्य धर्मस्य स्वल्पं अपि (अनुष्ठानं) महतः भयात् त्रायते. ॥४०॥

तैसें ऐहिक तरी न नशे । आणि मोक्षु तो उरला असे । जेथ पूर्वानुक्रमु दिसे । चोखाळत ३३

पादन करितात, ९ तो गगनाप्रमाणें अनुपमेय व निष्प्रतिबंध कीर्ति संपादण्याचा प्रसंग अनायासानें तुला आला आहे. २१० तुझी कीर्ति अमर्याद असून तुझे गुणही उपमारहित आहेत, अशी तिन्ही लोकांत ख्याति आहे. ११ देशांतरींचे राजेरजवाडे स्तुतिपाठक होऊन तुझी कीर्ति गातात, ती ऐकून यमादिक देखील तुला भितात ! १२ त्या कीर्तीचा महिमा गंगेच्या पाण्याप्रमाणें निर्मल व गहन आहे, आणि तो ऐकून जगांतील मोठमोठ्या योद्ध्यांना कीर्ती संपादन करण्याचा मार्ग झाला आहे. १३ असा तुझ्या अद्भुत शौर्याचा महिमा ऐकून हे सर्व कौरव आपल्या प्राणांवर उदार झाले आहेत. १४ ज्याप्रमाणें सिंहाची गर्जना ऐकल्यावरोबर उन्मत्त हत्तीलाही प्रळयकाळच ओढवला असें वाटतें,त्याप्रमाणें ह्या सर्व कौरवांस तुझा धाक वाटतो. १५ ज्याप्रमाणें पर्वत वज्राला किंवा सर्प गरुडाला मानतात, त्याप्रमाणें हे कौरव तुला नेहमीं मानतात. १६ तेव्हां आतां युद्ध न करितां जर माघारा फिरशील, तर ही तुझी थोरवी नाहींशी होऊन तुला हीनत्व प्राप्त होईल.१७ बरें, पळून जाऊं म्हणशील, तर हे तुला जाऊं देणार नाहींत; तुला धरून आणून तुझी फजिती करतील, आणि तुझ्या तोंडावर तुझी अतिशय निंदा करतील. १८ ते मर्मभेदक शब्द ऐकून मग अंतःकरण विदीर्ण होण्यापेक्षां आतां शौर्यानें कां युद्ध करूं नये ? जर त्यांना तूं जिंकलेस तर पृथ्वीचें राज्य भोगशील. १९

**युद्धांत मरण पावलास तर स्वर्गप्राप्ति होईल, अथवा युद्धांत जय पावलास तर पृथ्वीचें राज्य भोगशील; म्हणून, अर्जुना, युद्धाविषयीं निश्चय करून ऊठ. ॥ ३७ ॥**

अथवा ह्या रणामध्यें युद्ध करतानां तूं मेलास, तर सहज स्वर्गसुख भोगशील; २२० ह्मणून, अर्जुना, ह्याबद्दल आतां विचार करीत बसूं नको; तर ऊठ आणि हातांत धनुष्य घेऊन लवकर युद्धास आरंभ कर. २१ हें पहा–स्वधर्माचें आचरण केलें तर असलेले दोष नाश पावतात, असें असून त्याच्यापासून पातक लागेल हा भ्रम तुझ्या मनांत कोठून उत्पन्न झाला ? २२ तूंच सांग, कीं नावेंत बसणारा कधीं बुडेल का ? त्याचप्रमाणें चांगल्या रस्त्यानें जाणारा कधीं ठेंच लागून पडेल का ? परंतु ज्याला चालतां येत नाहीं, तो मात्र कदाचित् ठेंच लागून पडण्याचा संभव आहे. २३ दूध प्याल्यानें मरण येणार नाहीं; परंतु तें विषाबरोबर सेवन केल्यास तो सेवन करणारा मरेल; त्याचप्रमाणें, फलाच्या आशेनें स्वधर्माचें आचरण केल्यास मात्र दोष लागतील. २४ म्हणून, अर्जुना, निष्काम होऊन क्षत्रियधर्मानें युद्ध कर, म्हणजे पातकाचा लेशही तुला लागणार नाहीं. २५

**सुख व दुःख, लाभ व हानि, जय व अपजय हीं सारखीं मानून मग युद्धास तयार हो: म्हणजे तुला पाप कधींही लागणार नाहीं. ॥ ३८ ॥**

सुख प्राप्त झालें असतां संतोष मानूं नये, दुःख प्राप्त झालें असतां खेद मानूं नये, आणि मनांत लाभालाभ धरूं नये. २६ ह्या समरांगणीं आपल्यास जय मिळेल किंवा आपण मरूं ह्या पुढील गोष्टींचा अगोदरच विचार करीत बसूं नये. २७ आपण स्वधर्मानें वागत असतांना जें बरें वाईट प्राप्त होईल, तें निमूटपणानें सहन करावें. २८ अशा रीतीनें मनाचा निश्चय केला, म्हणजे सहजच दोष घडत नाहींत;ह्मणून तूं निश्चयानें आतां युद्धास आरंभ कर.२९

**पार्था, आतांपर्यंत तुला सांख्यबुद्धि [ परमार्थशास्त्रांतील ज्ञान ] सांगितली. आतां, कर्मयोगाविषयींची जी बुद्धि–जिच्या योगानें कर्मबंध नाहींसा होतो–ती ऐक. ॥३९॥**

एथपर्यंत हा ज्ञानयोग तुला संक्षिप्तपणें सांगितला, आतां बुद्धियोग ( कर्मांशीं ज्ञानाचा संबंध-कर्मयोग ) सांगतों ऐक. २३० अर्जुना, पुरुष बुद्धियोगाला प्राप्त झाला असतां त्याला कर्मबंधाची मुळींच बाधा होत नाही. ३१ ज्याप्रमाणें अंगांत वज्रकवच घातलें म्हणजे शस्त्रांची वृष्टि सहन करून विजय खात्रीनें मिळतो. ३२

**ह्या कर्मयोगांत आरंभिलेलें कर्म मध्येंच बंद पडलें असतां घडलेलें कर्म नाश पावत नाहीं, व त्याला अडचण किंवा संकट येत नाहीं; आणि या धर्माच्या थोडक्या देखील अनुष्ठानानें मोठ्या भयापासून रक्षण होतें. ॥४०॥**

त्याप्रमाणें इहलोकचें सुख नाहींसें न होतां मोक्ष अंतरत नाहीं. ज्या कर्मयोगांत पूर्वी झालेलें कर्म पुढें खंड पडला तरी नासत नाहीं. ३३ कर्मांच्या आधारानें वागणूक ठेवावी,

कर्माधारें राहाटिजे । परी कर्मफळ न निरीक्षिजे । जैसा मंत्रज्ञु न बंधिजे । भूतबाधा ॥२४॥ तिया- परी जे सुबुद्धि । आपुलालिया निरवधि । हा असतांचि उपाधि । आकळूं न सके ॥२५ जेथ न संचरे पुण्यपाप । जें सूक्ष्म अति निष्कंप । गुणत्रयादि लेप । न लगती जेथ ॥२६॥ अर्जुना ते पुण्यवशें । जरी अल्पचि हृदयीं बुद्धि प्रकाशे । तरी अशेषही नाशे । संसारभय ॥२७॥

**व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन ।**
**बहुशाखाह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥४१॥**

कुरुनंदन, इह व्यवसायात्मिका बुद्धिः एका एव, अव्यवसायिनां हि बुद्धयः बहुशाखाः अनन्ताः च ( सन्ति ).॥४१॥

जैसी दीपकळिका धाकुटी । परी बहु तेजातें प्रगटी । तैसी सद्बुद्धि हे थेकुटी । म्हणों नये ॥२८॥ पार्था बहुतीं परीं । हे अपेक्षिजे विचार- शूरीं । जे दुर्लभ चराचरीं । सद्वासना ॥२९॥ आणिकासारिखा बहुवसु । जैसा न जोडे परिसु । कां अमृताचा लेशु । दैवगुणें ॥२४०॥ तैसी दु- र्लभ जे सद्बुद्धि । जिये परमात्माचि अवधि । जैसा गंगेसी उदधि । निरंतर ॥४१॥ तैसें ईश्वरा- वांचुनि कांहीं । जिये आणीक लाणी नाहीं । ते एकचि बुद्धि पाहीं । अर्जुना जगीं ॥४२॥ येर ते दुर्मती । जे बहुधा असे विकरती । तेथ निरंतर रमती । अविवेकिये ॥४३॥ म्हणोनि तयां पार्था । स्वर्ग संसार नरकावस्था । आत्मसुख सर्वथा । दृष्ट नाहीं ॥४४॥

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंत्यविपश्चितः ।**
**वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥४२॥**
**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।**
**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥४३॥**
**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।**
**व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ४४**

पार्थ, वेदवादरताः अन्यत् न अस्ति इति वादिनः अविपश्चितः कामात्मानः स्वर्गपराः भोगैश्वर्यगतिं प्रति क्रियाविशेषबहुलां जन्मकर्मफलप्रदां यां पुष्पितां वाचं प्रवदन्ति तया अपहृतचेतसां भोगैश्वर्यप्रसक्तानां समाधौ व्यवसायात्मिका बुद्धिः न विधीयते ॥ ४२ ॥ ४३ ॥ ४४ ॥

वेदाधारें बोलती । केवळ कर्म प्रतिष्ठिती । परी कर्मफळीं आसक्ती । धरूनियां ॥४५॥ म्हणती संसारीं जन्मिजे । यज्ञादिक कर्म कीजे । मग स्वर्ग- सुख भोगिजे । मनोहर ॥४६॥ एथ हेंवांचूनि कांहीं । आणिक सर्वथा सुखचि नाहीं । ऐसें अ- र्जुना बोलती पाहीं । दुर्बुद्धि ते ॥४७॥ देखें कामनाअभिभूत । होऊनि कर्मे आचरत । ते केवळ भोगीं चित्त । देऊनियां ॥४८॥ क्रियाविशेषें बहु- तें । न लोपिती विधीतें । निपुण होऊनि धर्मातें । अनुष्ठिती ॥४९॥ परी एकचि कुडें करिती । जे स्वर्गकामु मनीं धरिती । यज्ञपुरुषा चुकती । भोक्ता जो ॥२५०॥ जैसा कर्पूराचा राशि कीजे । मग अग्नि लाऊनि दीजे । कां मिष्टान्नीं संचरविजे । काळकूट ॥५१॥ दैवें अमृतकुंभ जोडला । तो पायें हाणोनि उलंडिला । तैसा नासिती धर्मु निप- जला । हेतुकपणें ॥५२॥ सायासें पुण्य अर्चिजे । मग संसारु कां अपेक्षिजे । परी नेणती ते काय कीजे । अप्राप्त देखें ॥५३॥ जैसी रांधवणी रस- सोय निकी । करूनियां मोलें विकी । तैसा भोगा- साठीं अविवेकी । धाडिती धर्मु ॥५४॥ म्हणोनि हे पार्था । दुर्बुद्धि देख सर्वथा । तयां वेदवाद- रतां । मनीं वसे ॥५५॥

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।**
**निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ४५**

अर्जुन, वेदाः त्रैगुण्यविषयाः ( सन्ति ). ( त्वं ) निस्त्रैगुण्यः निर्द्वंद्वः नित्यसत्त्वस्थः निर्योगक्षेमः आत्मवान् भव. ॥ ४५ ॥

परंतु त्या कर्मापासून होणाऱ्या फलाची इच्छा धरूं नये; जसा पंचाक्षरी भूतापासून बाधा पावत नाहीं, ३४ त्याप्रमाणें, [ कर्मफलाच्या ठिकाणीं आसक्ति न ठेवितां निरभिमान-बुद्धीनें कर्म करण्याची ] सद्बुद्धी ज्याला प्राप्त झाली आहे, त्याला जन्ममरणाचा उपाधि बाधा करीत नाहीं. ३५ ज्या बुद्धीला पापपुण्याची बाधा होत नाहीं; जी अतिशय सूक्ष्म असून निश्चल आहे; आणि सत्त्व, रज, व तम हे तिन्ही गुण जिच्यांत प्रवेश करीत नाहींत; ३६ अर्जुना, अशी जी सुबुद्धि, ती पुण्याईनें थोडीशी जरी एकाद्याला प्राप्त झाली तरी ती सर्व संसारभयाचा नाश करिते ३७

**अर्जुना, ह्या कर्मयोगामध्यें निश्चयात्मक बुद्धि एकच आहे, आणि अनिश्चित पुरुषांच्या बुद्धि अनेक भेदांनीं युक्त व अनंत असतात. ॥४१॥**

ज्याप्रमाणें दिव्याची ज्योत लहान असूनही तिचा प्रकाश मोठा पडतो, त्याप्रमाणे, सद्बुद्धि अल्प जरी असली, तरी तिला लहान समजूं नये. ३८ अर्जुना, जे ज्ञानी आहेत ते बहुतकरून हिची इच्छा करतात. परंतु ती सद्बुद्धि जगतांत फार दुर्लभ आहे. ३९ ज्याप्रमाणें इतर दगडांसारखे परीस कांहीं पुष्कळ सांपडत नाहींत, अथवा लेशमात्र अमृत प्राप्त होण्यास देखील दैवयोगच लागतो, २४० त्याप्रमाणें, परमेश्वरप्राप्तींतच जिचें पर्यवसान होतें अशी ही सद्बुद्धि फार दुर्लभ आहे. ज्याप्रमाणें गंगेचें पर्यवसान निरंतर समुद्रच आहे. ४१ त्याप्रमाणें, अर्जुना, जिला ईश्वरप्राप्तीवांचून दुसरी कांहीं प्राप्ति नाहीं, अशी जगतामध्यें एकच बुद्धि आहे. ४२ इजशिवाय इतर बुद्धि त्या दुर्बुद्धि होत; त्यांचे ठिकाणीं विकार उत्पन्न होतात व तेथें अविचारी लोक नेहमीं रमतात. ४३ म्हणून, अर्जुना, त्या लोकांना स्वर्ग, संसार आणि नरकावस्था प्राप्त होते; परंतु आत्मसुख कधीं माहीतच नाहीं. ४४

**अर्जुना, वेदाच्या नुसत्या अर्थवादांतच रत झालेले व कर्मावांचून दुसरें कांहीं नाहीं असें म्हणणारे अविचारी लोक, व त्याप्रमाणेंच विषयभोगांविषयीं तत्पर व स्वर्गप्राप्तीचा हेतु धरणारे लोक, भोग व ऐश्वर्य हीं मिळण्यासाठीं अनेक प्रकारच्या विशिष्ट क्रिया सांगणारी, व जन्म आणि कर्म हीं फळें देणारी जी पुष्पित [ बाह्यतः मोहक दिसणारी ] वाणी बोलतात, त्या वाणीला ज्यांचें चित्त वश झालें आहे त्या, भोग व ऐश्वर्य ह्यांच्याविषयीं तत्पर असलेल्या लोकांच्या मनांत निश्चयात्मक म्हणजे आत्मतत्त्वविषयक किंवा कर्मयोगविषयक बुद्धि वसत नाहीं. ४२।४३।४४॥**

ते वेदाचे आधारानें बोलून कर्ममार्गाचें श्रेष्ठत्व स्थापन करतात, परंतु त्या कर्माचे फळावर लोभ ठेवतात. ४५ त्यांचें असें म्हणणें असतें कीं, मृत्युलोकीं जन्म घेऊन यज्ञादिक कर्मे आचरावीं, व आल्हाददायक असें स्वर्गसुख भोगावें. ४६ अर्जुना, ते दुर्बुद्धि नेहमीं असें म्हणतात कीं, एथें ह्या स्वर्गसुखावांचून निरंतर सुख देणारें असें दुसरें सुखच नाहीं. ४७हेंपहा—ते केवळ भोगाच्या इच्छेनें आसक्त झाल्यामुळें कर्मफलावर दृष्टि देऊनच सकाम कर्मे करतात, ४८ व अनेक प्रकारचीं अनुष्ठानें विधियुक्त करून तीं शेवटास नेण्याकरितां फार दक्षतेनें धर्माचरण करतात. ४९ परंतु, अर्जुना, ते एक गोष्ट फार वाईट करतात. ती ही कीं, ते मनामध्यें स्वर्गेच्छा धारण करतात, आणि यज्ञभोक्ता जो ईश्वर त्याला विसरतात. २५० ज्याप्रमाणें कापुराच्या शुभ्र राशीस अग्नि लावून तो व्यर्थ जाळून टाकावा. अथवा मिष्टान्नांत काळकूट विष मिसळावें, ५१ किंवा दैवयोगानें मिळालेल्या अमृताचा कुंभ पायानें पालथा करावा, त्याप्रमाणे, फलप्राप्तीचे हेतूनें प्राप्त झालेला धर्म हे लोक वायां दवडतात. ५२ असें पहा कीं, मोठ्या श्रमानें पुण्य संपादन करून मग संसाराची इच्छा कां करावी ? परंतु काय करावें, हें त्या अज्ञानी लोकांना समजत नाहीं. ५३ ज्याप्रमाणें उत्तम स्वयंपाकीण नानातऱ्हेचा चांगला स्वयंपाक तयार करून तें अन्न द्रव्याच्या आशेनें विकते, त्याप्रमाणें अविचारी लोक हे सुखोपभोगासाठीं धर्म गमावितात. ५४ म्हणून, पार्था, वेदांतील अर्थवादांत मग्न झालेल्या लोकांच्या मनांत नेहमीं दुर्बुद्धिच वास करिते हें लक्षांत असूं दे. ५५

**अर्जुना, वेदांत सत्त्व, रज व तम ह्या तीन गुणांचेंच प्रतिपादन केलें आहे, म्हणून तूं गुणातीत हो; मी व माझें हें द्वंद्व टाकून दे; नित्य शुद्ध सत्त्वगुणानें स्थिर हो; योगक्षेम म्हणजे चरितार्थ कसा चालेल, ह्याची काळजी सोड; आणि आत्मस्वरूपीं चित्त ठेव. ॥४५॥**

तिहीं गुणीं आवृत्त । हे वेद जाण निभ्रांत । म्हणोनि उपनिषदादि समस्त । सात्त्विक ते ५६ येर रजतमात्मक । जेथ निरूपिजे कर्मादिक । जे केवळ स्वर्गसूचक । धनुर्धरा ॥५७॥ म्हणोनि तूं जाण । हे सुखदुःखांसीच कारण । एथ झणें अंतःकरण । रिगों देसी ॥५८॥ तूं गुणत्रयातें अव्हेरीं । मी माझें हें न करीं । एक आत्मसुख अंतरीं । विसंब झणीं ॥५९॥

**यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।**
**तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥**

यावान् अर्थः उदपाने ( तावान् ) सर्वतः संप्लुतोदके ( भवति ); ( यावान् च अर्थः ) सर्वेषु वेदेषु तावान् विजानतः ब्राह्मणस्य ( भवति ). ॥ ४६ ॥

जरी वेदें बहुत बोलिलें । विविध भेद सूचिले । तऱ्ही आपण हित आपुलें । तेंचि घेपें ॥२६०॥ जैसा प्रगटलिया गभस्ती । अशेषही मार्ग दिसती । तरी तेतुलेहि काय चालिजती । सांगें मज ॥६१॥ कां उदकमय सकळ । जऱ्ही जाहलें असे महीतळ । तरी आपण घेपें केवळ । आर्तीचजोगें ६२ तैसे ज्ञानी जे होती । ते वेदार्थातें विवरिती । मग अपेक्षित तें स्वीकारिती । शाश्वत जें ॥६३॥

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।**
**मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि ॥४७॥**

( पार्थ, ) ते अधिकारः कर्मणि एव; कदाचन फलेषु मा; ( त्वं ) कर्मफलहेतुः मा भूः, अकर्मणि च ते सङ्गः मा अस्तु. ॥ ४७ ॥

म्हणोनि आइकें पार्था । याचिपरी पहातां । तुज उचित होय आतां । स्वकर्म हें ॥६४॥ आम्हीं समस्तही विचारिलें । तंव ऐसेंचि हें मना आलें । जे न सांडिजे तुवां आपुलें । विहित कर्म ॥६५॥ परी कर्मफळीं आस न करावी । आणि कुकर्मीं संगति न व्हावी । हे सत्क्रियाचि आचरावी । हेतूविण ॥६६॥

**योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ।**
**सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते**

धनंजय, ( त्वं ) संगं त्यक्त्वा सिद्ध्यसिद्ध्योः समः भूत्वा योगस्थः ( सन् ) कर्माणि कुरु, समत्वं योगः उच्यते. ॥ ४८ ॥

तूं योगयुक्त होउनी । फळाचा संगु टाकुनी । मग अर्जुना चित्त देउनी । करीं कर्मे ॥६७॥ परी आदरिलें कर्म दैवें । जरी समाप्तीतें पावे । तरी विशेषें तेथ तोषावें । हेंही नको ॥६८॥ कीं निमित्तें कांणे एकें । तें सिद्धी न वचत ठाके । तरी तेथिंचेनि अपरितोखें । क्षोभावें ना ॥६९॥ आचरतां सिद्धी गेलें । तरी काजाचि कीर आलें । परी ठेलियाही सगुण जहालें । ऐसेंचि मानीं ॥२७०॥ देखें जेतुलालें कर्म निपजे । तेतुलें आदिपुरुषीं अर्पिजे । तरी परिपूर्ण सहजें । जहालें जाणें ॥७१॥ देखें संतासंतकर्मीं । हें जें सरिसेपण मनोधर्मीं । तेचि योगस्थिति उत्तमीं । प्रशंसिजे ॥७२॥

**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।**
**बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥४९॥**
**बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।**
**तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥५०॥**

धनंजय, ( फलाभिसंधिनाकृतं ) कर्म बुद्धियोगात् दूरेण अवरं हि, ( यतः एवं, ततः ) बुद्धौ शरणं अन्विच्छ. फलहेतवः कृपणाः ( संति. ) ॥ ४९ ॥ बुद्धियुक्तः इह उभे सुकृतदुष्कृते जहाति. तस्मात् योगाय युज्यस्व; योगः कर्मसु कौशलम् ( अस्ति. ) ॥ ५० ॥

अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाण योगाचें । जेथ मन आणि बुद्धीचें । ऐक्य आथी ॥७३॥ तो बुद्धियोग विवरितां । बहुतें पाडें पार्था । दिसे हा अरुता । कर्मभोगु ॥७४॥ परी तेंचि कर्म आचरिजे । तरीच हा योगु पाविजे । जें कर्मशेष सहजें । योगस्थिति ॥७५॥ म्हणोनि

तूं निश्चयानें असें समज कीं, वेद हे तीन गुणांनीं (सत्त्व रज, तम ह्यांनीं) भरलेले आहेत; म्हणून सर्व उपनिषदें ह्यांची सत्त्वगुणामध्यें गणना केली जाते. ५६ धनुर्धरा, बाकी ज्यामध्यें कर्म, उपासना इत्यादिकांचें निरूपण केलेलें आहे, ते सर्व रज व तम ह्या गुणांनीं युक्त असून केवळ स्वर्गसूचकच आहेत. ५७ म्हणून, तूं असें पक्कें समज कीं, हे सुखदुःखांनाच कारण आहेत; व ह्याकरितां, तूं आपलें मन कदाचित् तेथें शिरूं देशील हो ! तर तसें करूं नको. ५८ तूं ह्या गुणत्रयाची त्रिपुटी टाकून दे, व अहंममता सोडून अंतःकरणांत आत्मसुखाचा विसर पडूं देऊं नको हो ! ५९

**अल्प जलाशयांत जीं स्नानपानादिक कामें पृथक् पृथक् होतात, तीं सर्व मोठ्या जलाशयांत एकदम होतात. तसें, सर्व वेदांतील जें पृथक् पृथक् फल तें ब्रह्मज्ञान्याला एकदम प्राप्त होतें. ४६**

जरी वेदांत पुष्कळ गोष्टी सांगितल्या असून पुष्कळ प्रकार सुचविले आहेत, तरी ज्यांत आपलें हित आहे तोच मार्ग स्वीकारला पाहिजे. २६० ज्याप्रमाणें सूर्योदय झाल्यावर अनेक रस्ते दृष्टीस पडतात, परंतु तितके रस्ते मनुष्य आक्रमूं शकतो काय सांग बरें ? ६१ अथवा, सर्व पृथ्वी उदकमय झाली तरी जसें आपल्या इच्छेपुरतेंच पाणी घेतलें पाहिजे, ६२ त्याप्रमाणें, ज्ञानी जे आहेत, ते वेदार्थांचा विचार करून अपेक्षित अशा शाश्वत ब्रह्माचा तेवढा स्वीकार करतात. ६३

**अर्जुना, तूं कर्माचाच अधिकारी आहेस. तूं फलाचा अधिकारी कधींही होऊं नकोस, व कर्माच्या फलाची इच्छा देखील धारण करूं नकोस, आणि कर्म न करण्याविषयींही आग्रह धरूं नकोस. ॥४७॥**

म्हणून, पार्था, ऐक. ह्या सर्व गोष्टींचा विचार करून पाहतां तुला स्वकर्मच उचित आहे. ६४ आम्हीं सर्व गोष्टींचा विचार करून पाहिला, तों आमचे मनास असें आलें कीं, आपलें कर्तव्यकर्म सोडूं नये. ६५ पण कर्मफलाची इच्छा न ठेवतां, आणि निषिद्ध कर्मांचा अंगीकार न करतां सत्कर्मांचेंच निष्काम आचरण करावें. ६६

**हे धनंजया, कर्माविषयीं आसक्ति न ठेवितां कर्माच्या कर्तेपणाचा अभिमान व फलाची इच्छा टाकून कर्म कर. आरंभिलेलें कर्म शेवटास गेलें अगर न गेलें तरी हर्ष व शोक मानूं नको. योगाचा आश्रय करून कर्म कर. सुखदुःखांचे ठिकाणीं समता असणें ह्यालाच योग म्हणतात. ४८**

अर्जुना, त्वां योगयुक्त होऊन फलाची इच्छा टाकून द्यावी, व मन लावून कर्म करावीं. ६७ परंतु आरंभिलेलें कर्म दैवयोगानें पूर्ण झालें तरी त्याचा संतोष मानूं नये; ६८ किंवा कोणत्याही कारणानें तें कर्म सिद्धीस न जातां तसेंच राहिलें, तरी त्याबद्दल मनांत असंतोष मानून त्रासूं नये. ६९ कर्म करतांना जर शेवटास गेलें, तर तें खरोखर उपयोगालाच आलें; परंतु कदाचित् विघ्न येऊन अपुरतें राहिलें, तरीही बरेंच झालें असें समज. २७० कारण, असें पहा—जेवढें कर्म घडेल तेवढें ईश्वराला अर्पण करावें. म्हणजे सहजरीत्या पूर्ण झालें असें समज. ७१ आणखी असें पहा कीं, चांगल्या व वाईट कर्मांचे ठिकाणीं मनोधर्म सारखा राहणें हीच योगस्थिति असें उत्तम लोक म्हणतात. ७२

**अर्जुना, बुद्धियोगापेक्षां म्हणजे ईश्वराला अर्पण करण्याच्या हेतूनें केलेल्या कर्मापेक्षां फलाच्या हेतूनें केलेलें कर्म फार कमी योग्यतेचें आहे; म्हणून बुद्धियोगालाच शरण जा. कर्माच्या फलाची इच्छा करणारे अति दीन होत. ॥४९॥ बुद्धियोगानें युक्त असा पुरुष, कर्माचें फल जें पापपुण्य त्यापासून ह्या लोकींच मुक्त होतो; म्हणून, समत्वबुद्धियोग साध्य करून घे. कर्माचें कौशल्य ईश्वराला कर्म अर्पण करण्यांतच आहे. ॥ ५० ॥**

अर्जुना, ज्या ठिकाणीं मन (क्रिया) आणि बुद्धि (ज्ञान) ह्यांचें ऐक्य आहे, त्याच ठिकाणीं चित्ताची समता राहते, आणि तेंच योगाचें सार आहे. ७३ पार्था, विचारांतीं बुद्धियोगाची व कर्मयोगाची तुलना केली असतां हा (अहंकारयुक्त व फलेच्छासहित) कर्मयोग फार कमी योग्यतेचा आहे. ७४ परंतु त्या कर्माचेंच आचरण केलें, म्हणजे हा बुद्धियोग साध्य होतो; आणि अशा रीतीनें कर्मसिद्धि झाली म्हणजे त्याला योगस्थिति म्हणतात. ७५

बुद्धियोगु सधरु । तेथ अर्जुना होईं स्थिरु । मनें करीं अव्हेरु । फळहेतूचा ॥७६॥ जे बुद्धियोगा योजिले । तेचि पारंगत जाहले । इहीं उभयबंधीं सांडिले । पापपुण्यीं ॥७७॥

**कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।**
**जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयम् ॥५१॥**

बुद्धियुक्ताः हि मनीषिणः ( भूत्वा ) कर्मजं फलं त्यक्त्वा जन्मबंधविनिर्मुक्ताः ( सन्तः ) अनामयं पदं गच्छंति. ॥५१॥

ते कर्मीं तरी वर्तती । परी कर्मफळा नातळती । आणि यातायाति न लोपती । अर्जुना तयां ॥७८॥ मग निरामयभरित । पावती पद अच्युत । ते बुद्धियोगयुक्त । धनुर्धरा ॥७९॥

**यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।**
**तदा गंतासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥५२॥**

यदा ते बुद्धिः मोहकलिलं व्यतितरिष्यति, तदा त्वं श्रोतव्यस्य श्रुतस्य च निर्वेदं गंतासि. ॥५२॥

तूं ऐसा तैं होसी । जैं मोहातें यया सांडिसी । आणि वैराग्य मानसीं । संचरेल ॥२८०॥ मग निष्कळंक गहन । उपजेल आत्मज्ञान । तेणें निचाड होईल मन । अपैसें तुझें ॥८१॥ तेथ आणिक कांहीं जाणावें । कां मागिलातें स्मरावें । हें अर्जुना आघवें । पारुषेल ॥८२॥

**श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।**
**समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥५३॥**

यदा ते श्रुतिविप्रतिपन्ना बुद्धिः निश्चला ( भूत्वा ) समाधौ अचला स्थास्यति, तदा योगं अवाप्स्यसि. ॥५३॥

इंद्रियांचिया संगति । जियें पसरु होतसे मति । ते स्थिर होईल मागुति । आत्मस्वरूपीं ॥८३॥ समाधिसुखीं केवळ । जैं बुद्धि होईल निश्चळ । तैं पावसी तूं सकळ । योगस्थिति ॥८४॥

अर्जुन उवाच—

**स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥**

केशव, समाधिस्थस्य स्थितप्रज्ञस्य का भाषा ? स्थितधीः किं प्रभाषेत ? किं आसीत ? किं व्रजेत ? ॥५४॥

तेथ अर्जुन म्हणे देवा । हाचि अभिप्रावो आघवा । मी पुसेन आतां सांगावा । कृपानिधि ॥८५॥ मग अच्युत म्हणे सुखें । जें किरीटी तुज निकें । तें पूस पां उन्मेखें । मनाचेनि ॥८६॥ या बोला पार्थें । म्हणितलें सांग पां श्रीकृष्णातें । काय म्हणिपे स्थितप्रज्ञातें । वोळखों केवीं ॥८७॥ आणि स्थिरबुद्धि जो म्हणिजे । तो कैसिया चिन्हीं जाणिजे । जो समाधिसुख भुंजे । अखंडित ॥८८॥ तो कवणें स्थिती असे । कैसेनि रूपीं विलसे । देवा सांगावें हें ऐसें । लक्ष्मीपती ॥८९॥ तंव परब्रह्मअवतरणु । जो षड्गुणाधिकरणु । तो काय तेथ नारायणु । बोलतु असे ॥२९०॥

श्रीभगवानुवाच—

**प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ।**
**आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥५५॥**

पार्थ, यदा ( नरः ) मनोगतान् सर्वान् कामान् प्रजहाति आत्मनि एव आत्मना तुष्टः ( भवति ), तदा स्थितप्रज्ञः उच्यते. ॥५५॥

म्हणे अर्जुना परियेसीं । जो हा अभिलाषु प्रौढ मानसीं । तो अंतराय स्वसुखेंसी । करीत असे ॥९१॥ जो सर्वदा नित्यतृप्तु । अंतःकरणभरितु । परी विषयामाजिं पतितु । जेणें संगें कीजे ॥९२॥ तो कामु सर्वथा जाये । जयाचें आत्मतोषीं मन राहे । तोचि स्थितप्रज्ञु होये । पुरुष जाणें ॥९३॥

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥५६॥**

दुःखेषु अनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः वीतरागभयक्रोधः मुनिः स्थितधीः उच्यते. ॥५६॥

नाना दुःखीं प्राप्ती । जयासी उद्वेगु नाहीं चित्तीं । आणि सुखाचिया आर्ती । अडपेजेना ॥९४॥ अर्जुना तयाच्या ठायीं । कामक्रोधु

म्हणून, अर्जुना, बुद्धियोग हाच पायाशुद्ध आहे, आणि त्याचेंच ठिकाणीं तूं आपलें मन लाव; परंतु मनांत फलप्राप्तीची आशा करूं नको. ७६ ज्यांची बुद्धियोगाकडे प्रवृत्ति झाली, तेच पार पडतात; आणि पाप व पुण्य या दोहोंच्या बंधनांतून सुटतात. ७७

**म्हणून समत्वबुद्धियुक्त असे पुरुष ज्ञानी होऊन कर्मफलाची आशा सोडून, व जन्मबंधापासून मुक्त होऊन सर्व उपद्रवांनीं रहित अशा [ परब्रह्म ] पदाप्रत पावतात. ॥ ५१ ॥**

अर्जुना, त्यांनीं जरी कर्में केलीं, तरी ते कर्मांच्या फलांची इच्छा धरीत नाहींत, म्हणून ते जन्ममरणाच्या यातायातीनें लिप्त होत नाहींत म्हणजे जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडत नाहींत. ७८ धनुर्धरा, मग बुद्धियोगयुक्त होऊन ब्रह्मानंदानें भरलेलें अविनाशी असें पद ते पावतात. ७९

**जेव्हां तुझी बुद्धि मोहरूपी अज्ञान तरून जाईल, तेव्हां तूं ऐकावयाचें व ऐकलेलें ह्यांबद्दल विरक्त होशील. ॥ ५२ ॥**

जेव्हां तूं ह्या मोहाचा त्याग करशील, तुझ्या मनांत वैराग्य प्रवेश करील, २८० त्या योगानें निर्दोष आणि गहन असें आत्मज्ञान उत्पन्न होऊन तुझें अंतःकरण सर्व प्रकारें निरिच्छ होईल त्या वेळीं तूं अच्युतपदाला पावशील. ८१ त्या पदप्राप्तीनंतर पुढल्याबद्दल कांहीं विचार करणें किंवा मागील गोष्टी आठवणें हे सर्व प्रकार जागचे जागीं राहतील. ८२

**वेदांतील नानाप्रकारचीं वाक्यें श्रवण करून घोंटाळ्यांत पडलेली तुझी बुद्धि जेव्हां घोंटाळ्यांतून सुटून समाधीमध्यें म्हणजे आत्म्याच्या ठिकाणीं स्थिर होईल, तेव्हां तूं योगाप्रत प्राप्त होशील. ॥५३॥**

इंद्रियांच्या संगतीनें जी बुद्धि चंचल होते, ती आत्मस्वरूपाची प्राप्ति झाल्यावर मग सहज स्थिर होते. ८३ समाधिसुखाचे ठिकाणीं जेव्हां तुझी बुद्धि स्थिर होईल, तेव्हांच तुला सर्व योगस्थिति साधेल. ८४

**अर्जुन म्हणालाः—हे केशवा, ज्याची बुद्धि स्थिर होऊन योगस्थ झाली आहे, त्या स्थितप्रज्ञ पुरुषाचें लक्षण काय ? तो बोलतो काय ? बसतो कसा ? आणि जातो कोठें ? ॥ ५४ ॥**

त्या वेळीं अर्जुन म्हणालाः—श्रीकृष्णा, कृपानिधे, ह्याजबद्दलचा खुलासा मी जो विचारीन, तो कृपा करून मला सांगा. ८५ मग श्रीकृष्ण म्हणतात-''अर्जुना, जें तुला मनोपिन मनानें योग्य वाटेल तें खुशाल विचार.'' ८६ असें म्हटल्यावर अर्जुन श्रीकृष्णांस म्हणाला, '' स्थितप्रज्ञ ( ज्याची बुद्धि स्थिर आहे तो ) कोणाला म्हणावें, व तो ओळखावा कसा, हें उघड करून सांगा. ८७ ज्याला स्थिरबुद्धि म्हणतात, व जो निरंतर समाधिसुख भोगतो, तो कोणत्या चिन्हांनीं ओळखावा ? ८८ देवा, लक्ष्मीपते, तो कोणत्या स्थितींत असतो, व कोणत्या रूपानें वर्तन करतो, हें कृपा करून मला सांगा. '' ८९ तेव्हां षड्गुणैश्वर्यसंपन्न, सर्व गुणांचें अधिष्ठान व परब्रह्मावतार असे भगवान श्रीकृष्ण बोलूं लागले. २९०

**श्रीकृष्ण म्हणालेः—हे अर्जुना, जेव्हां मनुष्य मनांत असलेल्या सर्व वासना अगदीं निःशेष टाकून आत्मसमाधानानें आपल्या ठिकाणींच संतुष्ट होईल, तेव्हां त्याला स्थितप्रज्ञ असें म्हणावें. ॥ ५५ ॥**

श्रीभगवान म्हणतातः—अर्जुना, ऐक. मनांतील जो बलवत्तर इच्छा, ती आत्मसुखाला विघ्न आणते. ९१ जो सर्वदा तृप्त असून ज्याचें अंतःकरण आत्मज्ञानानें भरलेलें आहे, आणि ज्याच्या संगतीनें विषयांमध्यें पतन घडतें, ९२ त्या कामाची ज्याच्या मनांतून पूर्ण निवृत्ति होऊन ज्याचें मन आत्मसंतोषांत म्हणजे स्वानंदांत रममाण असतें, तोच पुरुष स्थिरबुद्धि असें जाणावें. ९३

**ज्याचें मन दुःखप्राप्तीनें खेद पावत नाहीं, व सुखाविषयीं ज्याला इच्छा नाहीं; आणि काम, क्रोध व भय हे विकार ज्याच्या अंतःकरणांतून गेलेले आहेत, असा जो मुनि त्याला स्थितप्रज्ञ असें म्हणतात. ॥ ५६ ॥**

नानाप्रकारचीं दुःखें प्राप्त झालीं असतां ज्याच्या मनांत त्रास उत्पन्न होत नाहीं, आणि जो सुखाच्या इच्छेमध्यें अडकून रहात नाहीं; ९४ अर्जुना, त्या सत्पुरुषाचे अंतः-

सहजें नाहीं । आणि भयातें नेणे कहीं । परिपूर्णु तो ॥९५॥ ऐसा जो निरवधि । तो जाण पां स्थिरबुद्धि । जो निरसूनि उपाधि । भेदरहितु ॥९६॥

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।**
**नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥५७॥**

यः सर्वत्र अनभिस्नेहः तत् तत् शुभाशुभं प्राप्य न अभिनन्दति न द्वेष्टि, तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता. ॥ ५७ ॥

जो सर्वत्र सदा सरिसा । परिपूर्णु चंद्रु कां जैसा । अधमोत्तम प्रकाशा- । माजीं न म्हणे ९७ ऐसी अनवच्छिन्न समता । भूतमात्रीं सदयता । आणि पालटु नाहीं चित्ता । कवणे वेळे ॥९८॥ गोमटें कांहीं पावे । तरी संतोषें तेणें नाभिभवे । जो ओखटेनि नागवे । विषादासी ॥९९॥ ऐसा हरिखशोकरहितु । जो आत्मबोधभरितु । तो जाण पां प्रज्ञायुक्तु । धनुर्धरा ॥३००॥

**यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ।**
**इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥५८॥**

यदा च कूर्मः अङ्गानि इव अयं इंद्रियार्थेभ्यः इंद्रियाणि सर्वशः संहरते, ( तदा ) तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता. ॥५८॥

कां कूर्माचियापरी । उवाइला अवेव पसरी । ना तरी इच्छावशें आवरी । आपुले आपण ॥१॥ तैसीं इंद्रियें आपैतीं होती । जयाचें म्हणितलें करिती । तयाची प्रज्ञा आण स्थिति । पातली असे ॥२॥

**विषया विनिवर्तंते निराहारस्य देहिनः ।**
**रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥**

निराहारस्य देहिनः विषयाः रसवर्जं विनिवर्तंते; अस्य रसः अपि परं दृष्ट्वा निवर्तते. ॥५९॥

अर्जुना आणिकही एक । सांगेन ऐकें कवतिक । या विषयांतें साधक । त्यजिती नियमें ३ श्रोत्रादि इंद्रियें आवरिती । परी रसने नियमु न करिती । ते सहस्रधा कवळिजती । विषयीं इहीं ॥४॥ जैसी वरिवरी पालवी खुडिजे । आणि मुळीं उदक घालिजे । तरी कैसेनि नाशु निपजे । तया वृक्षा ॥५॥ तो उदकाचेनि बळें अधिकें । जैसा आडवेनि आंगें फांके । तैसा मानसीं विषो पोखे । रसनाद्वारें ॥६॥ येरां इंद्रियां विषय तुटे । तैसा नियमूं न ये रस हटें । जें जीवन हें न घटे । येणेंविण ॥७॥ मग अर्जुना स्वभावें । ऐसिही नियमातें पावे । जैं परब्रह्म अनुभवें । होऊनि जाइजे ॥८॥ तैं शरीरभाव नासती । इंद्रियें विषय विसरती । जैं सोहंभावप्रतीति । प्रगट होय ॥९॥

**यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः ।**
**इंद्रियाणि प्रमाथीनि हरंति प्रसभं मनः ॥६०॥**

कौंतेय, प्रमाथीनि इंद्रियाणि यततः विपश्चितः अपि पुरुषस्य मनः प्रसभं हरन्ति हि. ॥६०॥

येऱ्हवीं तरी अर्जुना । हें आया नये साधना । जे राहाटताति जतना । निरंतर ॥३१०॥ जयातें अभ्यासाची घरटी । यमनियमांची ताटी । जे मनातें सदा मुठी । धरूनि आहाती ॥११॥ तेही किजती कासाविसी । या इंद्रियांची प्रौढी ऐसी । जैसी मंत्रज्ञातें विवसी । भुलवी कां ॥१२॥ देखें विषय हे तैसे । पावती ऋद्धिसिद्धीचेनि मिषें । मग आकळिती स्पर्शें । इंद्रियांचेनी ॥१३॥ तिये संधीं मन जाये । मग अभ्यासीं ठोटावलें ठाये । ऐसें बळकटपण आहे । इंद्रियांचें ॥१४॥

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।**
**वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥६१॥**

तानि सर्वाणि ( इंद्रियाणि ) संयम्य युक्तः ( सन् ) मत्परः आसीत, यस्य हि वशे इंद्रियाणि ( संति ) तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता. ॥६१॥

म्हणोनि आइकें पार्था । यांतें निर्दळी जो सर्वथा । सर्व विषयीं आस्था । सांडूनियां ॥१५॥ तोचि तूं जाण । योगनिष्ठेसि कारण । जयाचें विषयसुखें अंतःकरण । झकवेना ॥१६॥ जो आत्म-

करणांतून कामक्रोध सहज नाहींतसे झालेले असतात, व त्या पूर्णावस्थेस पोहोंचलेल्या पुरुषास भयाचें नांव देखील माहीत नसतें; ९५ अशा प्रकारें संसार सोडून देऊन जो केवळ भेदरहित झालेला असतो, तोच पुरुष स्थिरबुद्धि असें समजावें. ९६

**सर्व विषयांविषयीं ज्याचें ममत्व नष्ट झालें आहे, व ज्याला चांगले अगर वाईट विषय प्राप्त झाले तरी त्यांपासून सुख किंवा दुःख होत नाहीं, त्याचीच बुद्धि स्थिर झाली असें समजावें. ॥५७॥**

पौर्णिमेचा चंद्र जसा चांगल्या किंवा वाईट लोकांस सारखा प्रकाश देतो, तसा जो सर्वांशीं सदैव सारखें वर्तन ठेवितो; ९७ त्याप्रमाणेंच अखंड समता आणि प्राणिमात्राविषयीं सदयता असून ज्याच्या चित्ताची स्थिति कधींही पालटत नाहीं; ९८ कांहीं चांगलें प्राप्त झालें तरी त्याच्या संतोषानें ज्याला गर्व होत नाहीं, व वाईट गोष्टींपासून ज्याला दुःख होत नाहीं, ९९ असा जो हर्षशोकरहित असून नेहमीं आत्मविचारांत निमग्न असतो, तोच, अर्जुना, स्थिरबुद्धि असें जाण. ३००

**ज्याप्रमाणें कांसव आपले अवयव आपले इच्छेप्रमाणें आंवरून घेतें, त्याप्रमाणें सर्व विषयांपासून इंद्रियें माघारीं ओढून आपले ताब्यांत मनुष्य जेव्हां ठेवतो, तेव्हां त्याची बुद्धि स्थिर झाली असें म्हणावें. ॥ ५८ ॥**

किंवा, कांसव आनंदांत असतां आपले हातपाय पसरतें, अथवा हवे असल्यास आपले आपण आंवरून धरतें; १ त्याप्रमाणें, ज्याचीं इंद्रियें स्वाधीन होऊन ज्याच्या ताब्यांत वागतात त्याची बुद्धि स्थिरता पावली असें समज. २

**आहार न करणाऱ्या पुरुषांचे विषय नाहींतसे होऊन त्यांचे ठिकाणीं फक्त प्रीति उरते; परंतु ती प्रीतिही ब्रह्मसाक्षात्कार झाल्यावर नाहींशी होते. ॥ ५९ ॥**

अर्जुना, आणखी एक मौजेची गोष्ट तुला सांगतों, ऐक. जे साधक या विषयांचा नियमानें त्याग करितात, ३ श्रोत्रादि इंद्रियांचें आकलन करितात, परंतु जिव्हेचा मात्र निग्रह करीत नाहींत, ते नानातऱ्हेनें ह्या विषयांमध्यें गुरफटले जातात. ४ एकाद्या वृक्षाचे वरचे वरचे शेंडे खुडले आणि मुळाशीं पाणी घातलें तर त्या वृक्षाचा नाश कसा होईल? ५ तो जसा उदकाच्या बळानें आडवा फुटतो, त्याप्रमाणें ह्या रसनेच्या द्वारें अंतःकरणांत विषय अधिकाधिकच पुष्ट होतात; ६ इतर विषयांचे विषय कमी केले असतां कमी होतात; पण त्याच प्रमाणानें जिव्हेचा विषय हट्टानें कमी करतां येत नाहीं; कारण, तें जीवन आहे, त्याशिवाय हें शरीर चालावयाचें नाहीं ७ परंतु, अर्जुना, साधक जेव्हां परब्रह्माचा अनुभव घेतो, तेव्हां रसनेचें ( रसना शब्दानें उपलक्षित वासना ) सहज नियमन होऊं शकतें. ८ ज्या वेळीं, आपण ब्रह्म आहों असा मनुष्यास अनुभव येतो, त्या वेळीं शरीराचे व्यवहार बाधित ( दृढ मिथ्यात्व निश्चय ) होऊन इंद्रियें विषयांना विसरून जातात. ९

**अर्जुना, बलवान् इंद्रियें, मनुष्य विद्वान् असून इंद्रियनिग्रह करण्याचा यत्न करीत असला तरी त्याचें मन बलात्कारानें आपल्याकडे ओढून घेतात. ॥ ६० ॥**

एरवीं, अर्जुना, इंद्रियांना जिंकण्याबद्दल जे निरंतर यत्न करतात, त्यांच्या देखील हीं आधीन होत नाहींत. ३१० जो आपल्या भोंवतीं अभ्यासाची गस्त ठेवून यमनियमांचें कुंपण करितो, आणि मन सदा मुठींत बाळगतो, ११ त्याला सुद्धां हीं इंद्रियें व्याकूळ करून टाकतात, असा या इंद्रियांचा प्रताप आहे. ज्याप्रमाणें मांत्रिकाला जखीण भुलवून टाकते, १२ त्याप्रमाणें हे विषय ऋद्धिसिद्धीच्या रूपानें योग्याला प्राप्त होऊन इंद्रियद्वारां योग्याचें मन भ्रष्ट करतात. १३ अशा संधींत जर मन सांपडलें तर अभ्यास जागच्या जागीं राहतो, अशी ह्या इंद्रियांची मोठी शक्ति आहे! १४

**म्हणून, तीं सर्व इंद्रियें आपल्या ताब्यांत ठेवून ज्ञानी पुरुषानें माझ्या ठिकाणींच आपलें मन स्थिर करावें. ज्याचीं इंद्रियें स्वाधीन असतात, तो निश्चल बुद्धीचा असें समजावें. ॥ ६१ ॥**

म्हणून, पार्था, सर्व विषयांचे ठिकाणची इच्छा सोडून इंद्रियांना जो जिंकतो, १५ व ज्याचें अंतःकरण विषयाच्या सुखानें भुलून जात नाहीं, तोच योगनिष्ठा प्राप्त होण्यास योग्य असें जाण. १६ कारण, तो नेहमीं आत्मबोधानें युक्त

बोधयुक्तु । होऊनि असे सततु । जो मातें हृदयाआंतु । विसंबेना ॥१७॥ येऱ्हवीं बाह्य विषय तरी नाहीं। परी मानसीं होईल जरी कांहीं। तरी साद्यंतुचि पाहीं। संसारु असे ॥१८॥ जैसा कां विषाचा लेशु । घेतलियां होय बहुवसु । मग निभ्रांत करी नाशु । जीवितासि ॥१९॥ तैसी विषयाची शंका। मनीं वसती देखा। घातु करी अशेखा । विवेकजाता ॥२२०॥

**ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते ।**
**संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते**
**क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।**
**स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ६३**

विषयान् ध्यायतः पुंसः संगः तेषु उपजायते. संगात् कामः संजायते, कामात् क्रोधः अभिजायते, क्रोधात् संमोहः भवति, संमोहात् स्मृतिविभ्रमः ( भवति ), स्मृतिभ्रंशात् बुद्धिनाशः ( भवति ), बुद्धिनाशात् ( पुमान् ) प्रणश्यति. ॥६२॥६३॥

जरी हृदयीं विषय स्मरती । तरी निःसंगाही आपजे संगती । संगें प्रगटे मूर्ति । अभिलाषाची ॥२१॥ जेथ कामु उपजला । तेथ क्रोधु आधींचि आला । क्रोधीं असे ठेविला । संमोह जाणें ॥२२॥ संमोहा जालिया व्यक्ति । तरी नाशु पावे स्मृति। चंडवातें ज्योति । आहत जैसी ॥२३॥ कां अस्तमानीं निशी । जैसा सूर्यतेजातें ग्रासी। तैसी दशा स्मृतिभ्रंशीं । प्राणियासी ॥२४॥ मग अज्ञानांध केवळ । तेणें आप्लविजे सकळ । तेथ बुद्धि होय व्याकुळ । हृदयामाजीं ॥२५॥ जैसें जात्यंधा पळणी पावे । मग ते काकुळती सैरा धांवे । तैसे बुद्धीसि होती भंवे । धनुर्धरा ॥२६॥ ऐसा स्मृतिभ्रंशु घडे । मग सर्वथा बुद्धि अवघडे। तेथ समूळ हें उपडे । ज्ञानजात ॥२७॥ चैतन्याच्या भ्रंशीं । शरिरा दशा जैशी । तैसें पुरुषा बुद्धिनाशीं । होय देखें ॥२८॥ म्हणोनि आइकें अर्जुना । जैसा विस्फुलिंग लागे इंधना । मग तो प्रौढ जालिया त्रिभुवना । पुरों शके ॥२९॥ तैसें विषयांचें ध्यान । जरी विपायें वाहे मन । तरी येसणें हें पतन। गिंवसीत पावे ॥२३०॥

**रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिंद्रियैश्चरन् ।**
**आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥६४॥**

विधेयात्मा तु रागद्वेषवियुक्तैः आत्मवश्यैः इंद्रियैः विषयान् चरन् प्रसादम् अधिगच्छति. ॥६४॥

म्हणोनि विषय हे आघवे । सर्वथा मनौनि सांडावे । मग रागद्वेष स्वभावें । नाशतील ॥३१॥ पार्था आणिकही एक । जरी नाशले रागद्वेष । तरी इंद्रियां विषयीं बाधक । रमतां नाहीं ॥३२॥ जैसा सूर्य आकाशगतु । रश्मिकरें जगातें स्पर्शतु। तरी संगदोषें काय लिंपतु । तेथिंचेनि ॥३३॥ तैसा इंद्रियार्थीं उदासीन । आत्मरसेंचि निर्भिन्न। जो कामक्रोधविहीन । होऊनि असे ॥३४॥ तरी विषयांतया कांहीं । आपणपेंवांचूनि नाहीं । मग विषय कवण कायी । बाधितील कवणा ॥३५॥ जरी उदकीं उदकें बुडिजे । कां अग्नि आगी पोळिजे । तरी विषयसंगें आप्लविजे । परिपूर्णु तो ॥३६॥ ऐसा आपणचि केवळु । होऊनि असे निखळु । तयाचि प्रज्ञा अचळु । निभ्रांत मानीं ॥३७॥

**प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।**
**प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥६५॥**

प्रसादे अस्य सर्वदुःखानां हानिः उपजायते, प्रसन्नचेतसः हि बुद्धिः आशु पर्यवतिष्ठते. ॥६५॥

देखें अखंडित प्रसन्नता । आथी जेथ चित्ता । तेथ रिगणें नाहीं समस्तां । संसारदुःखां ॥३८॥ जैसा अमृताचा निर्झरु । प्रसवे जयाचा जठरु । तया क्षुधेतृषेचा अडदरु । कहींचि नाहीं ॥३९॥ तैसें हृदय प्रसन्न होये । तरी दुःख कैचें कें आहे। तेथें आपैसी बुद्धि राहे । परमात्मरूपीं ॥२४०॥ जैसा निर्वातींचा दीपु । सर्वथा नेणे कंपु । तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूपु । योगयुक्तु ॥४१॥

होऊन राहतो, व तो अंतःकरणांत मला कधीं विसरत नाहीं. १७ जरी कोणी बाहेरचे विषय सोडून कर्मेंद्रियांना आंवरून धरून स्वस्थ बसला, व त्यानें मनांत जरी विषयांची इच्छा केली, तथापि तो जन्ममरणाचे फेऱ्यांतून सुटला असें म्हणतां येत नाहीं. १८ विष हें सेवन करतेवेळीं जरी थोडें असलें तरी तें शरीरांत पसरून जिवाचा निःसंशय नाश करितें, १९ त्याप्रमाणें, मनांत ज्याप्रमाणें, विषयांची थोडी जरी इच्छा राहिली, तरी ती सर्व विचारसमूहाचा घात करिते! ३२०

**विषयांचें चिंतन करणाऱ्या पुरुषाच्या ठिकाणीं विषयांची आसक्ति [ प्रीति ] उत्पन्न होते. प्रीतीमुळें काम [ प्रबल इच्छा ] उत्पन्न होते. त्या इच्छेच्या आड कोणी आलें असतां क्रोध, क्रोधापासून मूर्खपणा, मूर्खपणापासून स्मृतिनाश, स्मृतिनाशापासून बुद्धिनाश, व बुद्धिनाशामुळें पुरुषाचा सर्वस्वीं नाश होतो! ॥ ६२ ॥ ॥ ६३ ॥**

. अंतःकरणांत विषयांची नुसती आठवण झाली, तरी विरक्तालाही त्याच्या प्राप्तीविषयीं मूर्तिमंत इच्छा म्हणजे काम उत्पन्न होतो. २१ काम उत्पन्न झाला कीं, त्या ठिकाणीं आधीं क्रोध आलेलाच, व क्रोधामध्यें अविचार आपला ठेविलेला असावयाचाच! २२ ज्याप्रमाणें दिव्याची ज्योत वाऱ्यानें नाहींशी होते, त्याप्रमाणें अविचारामुळें स्मृति म्हणजे आत्मज्ञान नाश पावतें. २३ संध्याकाळ होतांच रात्र जशी सूर्यतेजाला गिळून टाकते, त्याप्रमाणें स्मृतीचा भ्रंश झाल्यावर मनुष्याची दशा होते. २४ मग अज्ञानामुळें त्याची बुद्धि केवळ आंधळी होऊन तो सर्व गोष्टींस आंचवतो, आणि त्याला कांहीं सुचेनासें होतें. २५ जन्मांधाला पळण्याचा प्रसंग आल्यावर तो जसा दीन होऊन सैरावैरा धांवूं लागतो, त्याप्रमाणें, अर्जुना, बुद्धीला भ्रमण होतें. २६ अशा रीतीनें बुद्धीला भ्रंश झाला म्हणजे बुद्धि घोंटाळ्यांत पडते, आणि मग सर्व ज्ञान नष्ट होतें. २७ शरीरांतील प्राण निघून गेला म्हणजे जसा देह प्रेतरूपी होतो, त्याप्रमाणें, बुद्धि नष्ट झाल्यावर जिवाची स्थिति होते. २८ म्हणून, अर्जुना, ऐक:-इंधनाला ठिणगी लागून ती भडकली म्हणजे जशी त्रिभुवनाला देखील पुरते, २९ त्याप्रमाणें अंतःकरणांत यत्किंचित् जरी विषयाचें स्मरण झालें, तरी एवढा हा अनर्थ ओढवतो! ३३०

**प्रीति व द्वेष टाकून ज्यानें आपलीं इंद्रियें आपल्या आधीन ठेविलीं आहेत, त्यानें विषयांचें जरी सेवन केलें तरी त्या जितेंद्रियाच्या अंतःकरणाची प्रसन्नता बिघडत नाहीं. ॥ ६४ ॥**

म्हणून, मनांतून सर्व विषय काढून टाकावे, म्हणजे राग, प्रीति आणि द्वेष [ अप्रीति ] हे आपोआप नाहींतसे होतात. ३१ पार्था, आणखी तुला सांगतों कीं, राग व द्वेष नाहींतसे झाल्यावर जरी इंद्रियें विषयांचे ठिकाणीं रममाण झालीं, तरी ते विषय बाधक होत नाहींत. ३२ ज्याप्रमाणें, आकाशांतून सूर्य हा आपल्या किरणरूपी हातांनीं जगतांतील वस्तूंना स्पर्श करितो, परंतु त्यांच्या संसर्गदोषानें लिप्त होतो कीं काय? [ नाहीं! ] ३३ त्याप्रमाणें, जो विषयांचे ठिकाणीं उदासीन, आत्मस्वरूपाचे ठिकाणीं निमग्न, व कामक्रोधांपासून अलिप्त असतो, ३४ आणि, अर्जुना, जो विषयांमध्यें आपल्या स्वरूपाशिवाय दुसरें कांहींच पहात नाहीं, त्याला विषय कसले? आणि बाधणार तरी कोणाला? ३५ जर पाण्यांत पाणी बुडेल, किंवा अग्नीनें अग्नि जळेल, तर मात्र तो परिपूर्णत्वास पावलेला पुरुष विषयांचे संगतीनें बुडेल. ३६ अशा प्रकारें जो आपण स्वतःच सर्वरूप होऊन राहतो, तोच अचलप्रज्ञ ( स्थिरबुद्धि ) असें निभ्रांत समज. ३७

**चित्ताला प्रसन्नता प्राप्त झाली म्हणजे त्याच्या सर्व दुःखांचा नाश होतो, आणि प्रसन्नचित्त झालेल्या पुरुषाची बुद्धि लवकर आत्म्याच्या ठिकाणीं स्थिर होते. ॥ ६५ ॥**

असें पहा कीं, ज्या ठिकाणीं मनाची पूर्ण शांति आहे, तेथें ह्या सर्व संसारदुःखांचा प्रवेश होत नाहीं. ३८ ज्याचे उदरांतच अमृताचा झरा उत्पन्न झाला आहे, त्याला जशी तहानभुकेची कधींच पीडा होत नाहीं, ३९ त्याप्रमाणें, ज्याचें हृदय प्रसन्न आहे, त्याला दुःख कसलें! आणि तें होणार तरी कोठून! त्याची बुद्धि आपोआप परमात्मस्वरूपीं जडून राहते; ३४० ज्याप्रमाणें निवाऱ्यांतील दिव्याची ज्योत मुळींच कधींही हालत नाहीं, त्याप्रमाणें, जो स्थिरबुद्धि आहे, तो आत्मस्वरूपसमाधीमध्यें निश्चलपणें रत असतो. ४१

**नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चाऽयुक्तस्य भावना ।**
**न चाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखम् ६६**

अयुक्तस्य बुद्धिः नास्ति अयुक्तस्य च भावना न ( अस्ति) अभावयतः च शांतिः न (अस्ति) अशांतस्य सुखं कुतः? ६६

ये युक्तीचि कडसणी । नाहीं जयाच्या अंतःकरणीं । तो आकळिला जाण गुणीं । विषयादिकीं ॥४२॥ तया स्थिरबुद्धि पार्था । कहीं नाहीं सर्वथा । आणि स्थैर्याची आस्था । तेही नुपजे ॥४३॥ निश्चळत्वाची भावना । जरी नव्हेचि देखें मना । तरी शांति केवीं अर्जुना । आपु होय ॥४४॥ जेथ शांतीचा जिव्हाळा नाहीं । तेथ सुख विसरोनि न रिघे कहीं । जैसा पापियाच्या ठायीं । मोक्षु न वसे ॥४५॥ देखें अग्निमाजि घापती । तियें बीजें जरी विरूढती । तरी अशांता सुखप्राप्ती । घडों शके ॥४६॥ म्हणोनि अयुक्तपण मनाचें । तेंचि सर्वस्व दुःखाचें । या कारणें इंद्रियांचें । दमन निकें ॥४७॥

**इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।**
**तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि॥६७॥**

चरतां इंद्रियाणां हि यन्मनः अनुविधीयते, तत् अंभसि वायुः नावं इव अस्य प्रज्ञां हरति. ॥६७॥

इंद्रियें जें जें म्हणती । तें तेंचि जे पुरुष करिती । ते तरलेचि न तरती । विषयसिंधु ॥४८॥ जैसी नाव थडिये ठाकितां । जरी वरपडी होय दुर्वाता । तरी चुकलाही मागौता । अपावो पावे ॥४९॥ तैसी प्राप्तेंही पुरुषें । इंद्रियें लाळिलीं जरी कौतुकें । तरी आक्रमिला जाण दुःखें । संसारिकें ॥३५०॥

**तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।**
**इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥६८॥**

तस्मात्, हे महाबाहो, यस्य इंद्रियाणि इंद्रियार्थेभ्यः सर्वशः निगृहीतानि, तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता. ॥६८॥

म्हणोनि आपुलीं आपणपया । जरी इंद्रियें प्रेनी आया । तरी अधिक कांहीं धनंजया । सार्थक असे ॥५१॥ देखें कूर्म जियापरी । उवाइला अवयव पसरी । ना तरी इच्छावशें आवरी आपणपेंचि ॥५२॥ तैसीं इंद्रियें अपैतीं होती । जयाचें म्हणितलें करिती । तयाची प्रज्ञा जाण स्थिती । पावली असे ॥५३॥ आतां आणिक एक गहन । पूर्णाचें चिन्ह । अर्जुना तुज सांगेन । परिसपां ॥५४॥

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥**

या सर्वभूतानां निशा तस्यां संयमी जागर्ति. यस्यां भूतानि जाग्रति सा पश्यतः मुनेः निशा. ॥६९॥

देखें भूतजात निदेलें । तेथेंचि जया पाहलें । आणि जीव जेथ चेइले । तेथ निद्रितु जो ॥५५॥ तोचि तो निरुपाधि । अर्जुना तो स्थिरबुद्धि । तोचि जाणें निरवधि । मुनीश्वर ॥५६॥

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं**
**समुद्रमापः प्रविशंति यद्वत् ।**
**तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे**
**स शांतिमाप्नोति न कामकामी ॥७०॥**

यद्वत् आपः आपूर्यमाणं अचलप्रतिष्ठं समुद्रं प्रविशंति, तद्वत् सर्वे कामाः यं प्रविशंति सः शांति आप्नोति; कामकामी न. ॥७०॥

पार्था आणीकही परीं । तो जाणों येईल अवधारीं । जैसी अक्षोभता सागरीं । अखंडित ॥५७॥ जऱ्ही सरितावोघ समस्त । परिपूर्ण होऊनि मिळत । तऱ्ही अधिक नोहे ईषत् । मर्यादा न संडी ॥५८॥ ना तरी ग्रीष्मकाळीं सरिता । शोषूनि जाती समस्ता । परी न्यून नव्हे पार्था । समुद्रु जैसा ॥५९॥ तैसा प्राप्तीं ऋद्धिसिद्धि । तयासि क्षोभु नाहीं बुद्धि । आणि न पवतां न बाधी । अधृति तयातें ॥३६०॥ सांगें सूर्याच्या घरीं । प्रकाशु काय वातीवेरी । कां न लविजे तरी अंधारीं । कोंडेल तो ॥६१॥ देखें ऋद्धिसिद्धि तयापरी । आली गेली से न करी । तो बिगुंतला असे अंतरीं । महासुखीं ॥६२॥ जो आपुलेनि नागर-

मार्ग चालतो, त्याप्रमाणें ज्ञान्यांनीं स्वतः धर्माचें आचरण करून अज्ञानी जनांस धर्माचे मार्गास लावावें. ५६ अरे, जर ज्ञान्यांनी अशा प्रकारचें वर्तन केलें नाहीं, तर अज्ञानी लोकांस कसें कळण लागेल ? आणि त्यांना हा मार्ग कोणच्या उपायानें समजेल ? ५७

**श्रेष्ठ पुरुष जें जें कर्म आचरण करितो, तें तेंच कर्म इतर लोक करितात; आणि तो पुरुष जें प्रमाण ठरवितो, त्याचेंच लोक अनुकरण करितात. ॥ २१ ॥**

ह्या लोकीं श्रेष्ठ लोक जें आचरण करतात, त्यालाच धर्म असें नांव ठेवून इतर सर्व लोक त्याचेंच आचरण करितात. ५८ ही गोष्ट साहजिक असल्यामुळें, कर्माचा त्याग करितां येत नाहीं; आणि साधुसंतांना तर कर्माचें आचरण विशेषेंकरून करावें लागतें. ५९

**पार्था, त्रैलोक्यामध्यें मला कांहीं करावयाचें आहे, अथवा कांहीं अप्राप्य प्राप्त करून घ्यावयाचें आहे, असें नाहीं; तथापि [ लोकसंग्रहाकरितां ] मी कर्म करितोंच. ॥ २२ ॥**

अर्जुना, आतां, फार लांब दुसऱ्याच्या गोष्टी कशाला सांगत बसूं, मीच या धर्माचरणांत वागत आहे. १६० आतां, मला कांहींतरी एकादें संकट पडलें असेल, किंवा कोणती तरी इच्छा असेल, म्हणून मी स्वधर्माचें आचरण करितों असें जर तूं म्हणशील, ६१ तर ह्या जगांत माझ्याइतका गुण व ऐश्वर्य ह्यांनीं संपन्न दुसरा कोणी नाहीं; हें माझें सामर्थ्य तुला माहीत आहेच; ६२ सांदीपनि गुरूचा मेलेलाही मुलगा आणून दिला, तो पराक्रम तूं पाहिलास; पण असाही जो मी निरिच्छ, तो सुद्धां कर्ममार्गानें मुकाट्यानें आचरण करीत आहें. ६३

**पार्था, जर मी आळस टाकून कर्माचें कधींही आचरण करणार नाहीं, तर हे सर्व लोक सर्वांशीं माझ्या मार्गाला अनुसरून चालूं लागतील. [ तेही कर्म करणार नाहींत ]. ॥ २३ ॥**

परंतु त्या एका लोककल्याणाच्या उद्देशानेंच मी स्वधर्माचें आचरण कशा प्रकारें करितों, कीं जसा कांहीं सकाम पुरुष ! ६४ कारण, सर्व प्राणी आमच्यावरच अवलंबून असतात, तेव्हां त्यांनीं कर्मभ्रष्ट होऊं नये. ६५

**जर मी कर्म करणार नाहीं, तर सर्व मनाचा नाश केल्याचा दोष मलाच लागेल; प्रजांचा वर्णसंकर मींच केलासें होईल; व सर्व लोकांना मारणारा मीच होईन ! ॥ २४ ॥**

आम्ही निष्काम होऊन आत्मानंदामध्येंच राहिलों आणि धर्माचरण न केलें, तर प्रजेचा तरणोपाय कसा होईल ? ६६ वास्तविक संप्रदाय असा कीं, लोकांनी आमच्या वर्तनाकडे पाहून धर्माच्या वागणुकीचे प्रकार समजून घ्यावे, ही जी लोकांची राहाटी आहे, ती आम्हीं धर्माचरण न केलें तर बिघडून जाईल. ६७ म्हणून, जो समर्थ व सर्वज्ञानसंपन्न असेल, त्यानें विशेषेंकरून कर्माचा त्याग कधींही करूं नये. ६८

**हे भारता, जसे अविद्वान् लोक कर्मफलाच्या ठिकाणीं सक्त होऊन कर्म करितात, तसें विद्वानांनीं लोकसंग्रहार्थ फलाची इच्छा न धरितां कर्म करावें. ॥ २५ ॥**

फलाची इच्छा करणारा पुरुष ज्याप्रमाणें कर्माचरण करितो, त्याप्रमाणें ज्ञानवानानेंही कर्माचरणांत विशेष भर ठेविला पाहिजे. ६९ कारण, पार्था, पुढें होणाऱ्या लोकसमुदायाचें रक्षण करणें आवश्य आहे म्हणून. १७० थोरांनीं सन्मार्गानें वागून लोकांची धर्माचरणाकडे दिशा लावावी, परंतु आपण स्वर्गादि लोकप्राप्तीविषयीं आसक्ति ठेवूं नये. ७१

**विद्वान् मनुष्यानें फलाच्या आशेनें कर्म करणाऱ्या अज्ञानी लोकांचा बुद्धिभेद करूं नये; तर उलट त्या कर्मांचें आपण निष्कामबुद्धीनें आचरण करून त्यांना कर्म करण्याविषयीं अभिरुचि उत्पन्न करावी. ॥ २६ ॥**

त्याचप्रमाणें कर्माचरणें करून चित्तशुद्धि होण्याचे पूर्वी त्यांना नैष्कर्म्य ब्रह्मस्थितीचेंही ज्ञान सांगूं नये, कारण धनुर्धरा, जें मूल स्तनपान देखील मोठ्या आयासानें करितें, तें पक्वान्नें कसें बरें खाणार ? म्हणून त्याला ज्याप्रमाणें तीं देऊं नये, ७२ त्याचप्रमाणें, कर्माचरण करण्यासही जो अनधिकारी आहे, त्याला ज्ञानमार्गाची थोरवी थट्टेंत सुद्धां सांगूं नये. ७३ त्याला सत्कर्माचेंच आचरण करण्यास लावावें, सत्कर्माचीच प्रशंसा करावी, आणि निष्काम झालेल्या पुरुषांनींही सत्कर्म आचरण करून दाखवावें. ७४

तया लोकसंग्रहालागीं । वर्ततां कर्मसंगीं । तो कर्मबंधु आंगीं । बाजेलना ॥७५॥ जैसी बहुरूपियांची रावो राणी । स्त्रीपुरुषभावो नाहीं मनीं । परी लोकसंपादणी । तैसीच करिती ॥७६॥

**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।**
**अहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते ॥ २७ ॥**

प्रकृतेः गुणैः सर्वशः ( अपि ) कर्माणि क्रियमाणानि ( सन्ति ), अहंकारविमूढात्मा 'अहं कर्ता' इति मन्यते.॥२७॥

देखें पुढिलाचें वोझें । जरी आपुला माथां घेइजे । तरी सांगें कां न दाटिजे । धनुर्धरा ॥७७॥ तैसीं शुभाशुभें कर्में । जियें निफजती प्रकृतिधर्में । तियें मूर्ख मतिभ्रमें । मी कर्ता म्हणे ॥७८॥ ऐसा अहंकारादि रूढ । एकदेशी मूढ । तया हा परमार्थ गूढ । प्रगटावा ना ॥७९॥ हें असो प्रस्तुत । सांगिजेल तुज हित । तें अर्जुना देऊनि चित्त । अवधारीं पां ॥१८०॥

**तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।**
**गुणा गुणेषु वर्तंत इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥**

महाबाहो, गुणकर्मविभागयोः तत्त्ववित् तु गुणाः गुणेषु वर्तन्ते इति मत्वा न सज्जते. ॥ २८ ॥

जे तत्त्वज्ञानियांच्या ठायीं । तो प्रकृतिभावो नाहीं । जेथ कर्मजात पाहीं । निफजत असे ॥८१॥ ते देहाभिमानु सांडुनी । गुणकर्में वोलांडुनी । साक्षिभूत होउनी । वर्तती देहीं ॥८२॥ म्हणुनि शरीरी जरी होती । तरी कर्मबंधा नातळती । जैसा कां भूतचेष्टा गभस्ती । घेपवेना ॥८३॥

**प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जंते गुणकर्मसु ।**
**तानकृत्स्नविदो मंदान्कृत्स्नविन्न विचालयेत्॥२९॥**

प्रकृतेः गुणसंमूढाः गुणकर्मसु सज्जन्ते, कृत्स्नवित् तान् अकृत्स्नविदः मन्दान् न विचालयेत् .॥ २९ ॥

एथ कर्मीं तोचि लिंपे । जो गुणसंभ्रमें घेपे । प्रकृतीचेनि आटोपें । वर्ततु असे ॥८४॥ इंद्रियें गुणाधारें । राहाटती निजव्यापारें । तें परकर्म बलात्कारें । आपादी जो ॥८५॥

**मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।**
**निराशीर्निर्ममो भूत्वा युद्धयस्व विगतज्वरः ३०**

मयि सर्वाणि कर्माणि अध्यात्मचेतसा संन्यस्य निराशीः निर्ममः विगतज्वरः भूत्वा युद्धयस्व. ॥ ३० ॥

तरी उचितें कर्में आघवीं । तुवां आचरोनि मज अर्पावीं । परी चित्तवृत्ति न्यासावी । आत्मरूपीं ॥८६॥ आणि हें कर्म मी कर्ता । कां आचरेन या अर्था । ऐसा अभिमानु झणें चित्ता । रिघों देसी ॥८७॥ तुवां शरीरपरा नोहावें । कामनाजात सांडावें । मग अवसरोचित भोगावे । भोग सकळ ॥८८॥ आतां कोदंड घेऊनि हातीं । आरूढ पां इयें रथीं । देईं आलिंगन वीरवृत्ती । समाधानें ॥८९॥ जगीं कीर्ति रूढवीं । स्वधर्माचा मानु वाढवीं । इया भारापासोनि सोडवीं । मेदिनी हे ॥१९०॥ आतां पार्था निःशंकु होईं । या संग्रामा चित्त देईं । एथ हेंवांचूनि कांहीं । बोलों नये ॥९१॥

**ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठंति मानवाः ।**
**श्रद्धावंतोऽनसूयंतो मुच्यंते तेऽपि कर्मभिः ॥३१॥**

ये मानवाः श्रद्धावंतः अनसूयन्तः ( संतः ) इदं मे मतं नित्यं अनुतिष्ठन्ति, ते अपि कर्मभिः मुच्यन्ते. ॥ ३१ ॥

हें अनुपरोध मत माझें । जिहीं परमादरें स्वीकारिजे । श्रद्धापूर्वक अनुष्ठिजे । धनुर्धरा ॥९२॥ तेही सकळ कर्मीं वर्ततु । जाण पां कर्मरहितु । म्हणोनि हें निश्चितु । करणीय गा ॥९३॥

**ये त्वेतदभ्यसूयंतो नानुतिष्ठंति मे मतम् ।**
**सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥**

ये तु एतत् अभ्यसूयंतः ( संतः ) मे मतं न अनुतिष्ठंति, तान् सर्वज्ञानविमूढान् अचेतसः नष्टान् विद्धि. ॥ ३२ ॥

नातरी प्रकृतिमंतु होउनी । इंद्रियां लळा देउनी । जें हें माझें मत अव्हेरुनी । वोसंडिती ॥९४॥ जे सामान्यत्वें लेखिती । अवज्ञा करूनि देखती । कां हा अर्थवादु म्हणती । वाचाळपणें ॥९५॥ ते मोहमदिरा भुलले । विषयविखें घारले । अज्ञानपंकीं बुडाले । निभ्रांत मानीं ॥९६॥ देखें शवाच्या हातीं दिधलें । जैसें कां रत्न वायां गेलें ।

वर्णाश्रमधर्मरक्षणाकरितां कर्ममार्गाचें आचरण करीत असतां त्यांना कर्मबंध भोगावा लागणार नाहीं. ७५ बहुरूप्यांनीं जरी राजाराणीचीं सोंगें घेतलीं, तरी त्यांच्या मनांत स्त्रीपुरुषभाव मुळींच नसतो; पण लोकांना दाखविण्याकरितां ते तसेच वागतात. ७६

**सर्व कर्में सर्व प्रकारें प्रकृतीच्या गुणांनीं होत असूनही, अहंकारानें ज्याचं मन मोहित झालें आहे असा मनुष्य तीं कर्में ' मीं केलीं ' असें मानितो. ॥ २७ ॥**

आतां तींच कर्में अज्ञान्यास कशीं बाधक होतात असें म्हणशील तर—अर्जुना, असें पहा कीं, दुसऱ्याचें ओझें आपल्या डोक्यावर जर घेतलें, तर आपली मान का अवघडणार नाहीं? ७७ प्रकृतीचे गुण, जीं बरीं वाईट कर्में उत्पन्न करितात, तीं बुद्धिभ्रंशामुळें मूर्ख होऊन मींच केलीं असें म्हणतो. ७८ अशा रीतीनें साडेतीन हात देहाचाच अभिमान धारण करणाऱ्या पुरुषाला ह्या नैष्कर्म स्थितीचा परमार्थ प्रकट करूं नये. ७९ कारण अनधिकारामुळें परमार्थ तत्त्व कळणार नाहीं आणि कर्मापासूनही भ्रष्ट होईल.—असो. अर्जुना, हें राहूं दे. प्रस्तुत तुझें हीत कशांत आहे, तें तुला सांगतों, लक्ष देऊन ऐक. ८०

**हे महाबाहो, गुणकर्मांच्या विभागांचें तत्त्व जाणणारा पुरुष तर, गुण हे गुणांचे ठिकाणीं म्हणजे इंद्रियें हीं विषयांचे ठिकाणीं राहतात, असें मानून गुणकर्मांच्या ठिकाणीं आसक्त होत नाहीं. ॥ २८ ॥**

ज्या ठिकाणीं सर्व कर्म उत्पन्न होतें, तो प्रकृतीचा विकार ज्ञान्यांचे ठिकाणीं मुळींच नसतो. ८१ ते ज्ञानी देहाचा अभिमान सोडून व गुणकर्मातीत होऊन देहांत फक्त साक्षित्वानें वागतात. ८२ म्हणून, सूर्य ज्याप्रमाणें जगतावर प्रकाश पाडीत असून जगाच्या कर्मांनीं लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें, ते जरी देह धारण करितात, तरी देहकर्मांनीं बद्ध होत नाहींत. ८३

**प्रकृतीच्या गुणांनीं जे मोहित झाले आहेत, ते गुणांनीं केलेल्या कर्मांच्या ठिकाणीं सक्त होतात. अशा मंदबुद्धि व अल्पज्ञ लोकांचा ज्ञानी मनुष्यानें बुद्धिभेद करूं नये. ॥२९॥**

प्रकृतीच्या आधीन होऊन जो वागतो, व गुणांच्या सपाट्यांत सांपडतो. तोच कर्मांनें लिप्त होतो. ८४ इंद्रियें गुणांच्या आधीन होऊन आपआपल्या व्यापारांत वर्तत असतां, तें दुसऱ्याचें कर्म ' मीच करतों ' असें तो मुद्दाम अंगावर घेतो. ८५

**अर्जुना, माझ्या ठायीं विचारपूर्वक सर्व कर्में अर्पण कर; कर्मफलाचे ठिकाणीं आशा धरूं नको; कर्तेपणाचा अभिमान सोड; आणि शोकरहित होऊन युद्ध कर. ॥३०॥**

म्हणून, सर्व विहित कर्मांचें आचरण करून त्वां तीं मला अर्पण करावीं, पण चित्तवृत्ति मात्र सदैव आत्मस्वरूपीं ठेवावी ८६ ह्या कर्मांचा मी कर्ता आहें आणि अमुक फलासाठीं हें मी करीत आहें, असा अभिमान तूं आपल्या चित्तांत उत्पन्न होऊं देशील हो, ८७ तूं शरिराच्या स्वाधीन न होतां सर्व इच्छा सोडून दे, आणि मग सकल भोग यथाकालीं भोग. ८८ एवढ्याकरितां आतां हातांत धनुष्य घेऊन ह्या रथावर बैस, आणि आनंदानें वीरवृत्तीचा स्वीकार कर. ८९ जगांत तूं आपली कीर्ति वाढीव, स्वधर्माचा महिमा वाढीव; आणि दुर्योधनादिक दुष्टांच्या भारापासून ह्या पृथ्वीला सोडीव. १९० पार्था, आतां तूं निःशंक होऊन ह्या युद्धाचे ठिकाणीं लक्ष दे; ह्याशिवाय दुसरें कांहीं बोलूं नको. ९१

**जे लोक श्रद्धेनें व धिक्कार न करितां माझ्या ह्या मताचें नेहमीं अनुष्ठान करितात, ते देखील कर्मबंधापासून मुक्त होतात. ॥३१॥**

अर्जुना, ह्या माझ्या अबाधित मताचा जे मोठ्या आदरानें स्वीकार करून त्याचें श्रद्धापूर्वक आचरण करतील ९२ ते सकल कर्मांचें आचरण करून कर्मरहित आहेत असें जाण. म्हणून, हें माझें मत निश्चयानें आचरण्यास योग्य आहे. ९३

**जे ह्या माझ्या मताची निंदा करून त्याचें अनुष्ठान करीत नाहींत, ते लोक, सर्व-ज्ञानविहीन, मूर्ख, चित्तभ्रष्ट व नष्ट झाले असें जाण. ॥३२॥**

नाहीं तर, देहाचे पाशांत गुंतून व इंद्रियांचे लाड पुरवून जे माझे मताचा तिरस्कार करून टाकून देतात, ९४ जे त्याला सामान्य समजतात, व त्याची थट्टा करितात, किंवा वाचाळपणें ती व्याजस्तुति आहे असें म्हणतात, ९५ ते मोहरूपी मद्यपान करून भुललेले व विषयरूप विषानें व्यापलेले आणि अज्ञानरूपी चिखलांत रुतलेले आहेत असें निःसंशय समज. ९६ पहा कीं, प्रेताच्या हातीं परीक्षेकरितां दिलेलें रत्न जसें वायां जातें, किंवा, जो जन्मा-

नातरी जात्यंधा पाहलें । प्रमाण नोहे ॥९७॥ कां चंद्राचा उदयो जैसा । उपयोगा नवचे वायसा । मूर्खा विवेकु हा तैसा । रुचेल ना ॥९८॥ तैसे जे पार्था । विमुख या परमार्था । तयांसी संभाषण सर्वथा । करावेना ॥९९॥ म्हणोनि ते न मानिती । आणि निंदाही करूं लागती । सांगें पतंगु काय साहती । प्रकाशातें ॥२००॥ पतंगा दीपीं आलिंगन । तेथ त्यासी अचुक मरण । तेविं विषयाचरण । आत्मघाता ॥१॥

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।**
**प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति॥३३॥**

ज्ञानवान् अपि स्वस्याः प्रकृतेः सदृशं चेष्टते, भूतानि प्रकृतिं यांति, निग्रहः किं करिष्यति ? ॥ ३३ ॥

म्हणोनि इंद्रियें एकें । जाणतेनि पुरुखें । लाळावीं ना कौतुकें । आदिकरुनी ॥२॥ हां गा सर्पेंसीं खेळों येईल । कीं व्याघ्रसंसर्ग सिद्धि जाईल । सांगें हाळाहाळ जिरेल । सेविलिया काई ॥३॥ देखें खेळतां अग्नि लागला । मग तो न सांवरे जैसा उधवला । तैसा इंद्रियां लळा दिधला । भला नोहे ॥४॥ एऱ्हवीं तरी अर्जुना । या शरीरा पराधीना । कां नाना भोगरचना । मेळवावी ॥५॥ आपण सायासेंकरूनि बहुतें । सकळही समृद्धिजातें । उदोअस्तु या देहातें । प्रतिपाळावें कां ॥६॥ सर्वस्वें शिणोनि एथें । आर्जवावीं संपत्तिजातें । तेणें स्वधर्मु सांडूनि देहातें । पोखावें काई ॥७॥ मग हें तंव पांचमेळावा । शेखीं अनुसरेल पंचत्वा । ते वेळीं केला कें गिंवसावा । शीणु आपुला ॥८॥ म्हणूनि केवळ देहभरण । ते जाणें उघडी नागवण । यालागीं एथ अंतःकरण । देयावेंना ॥९॥

**इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।**
**तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपंथिनौ ॥ ३४ ॥**

इंद्रियस्य अर्थे इंद्रियस्य रागद्वेषौ व्यवस्थितौ ( स्तः ) तयोः वशं न आगच्छेत्, तौ हि अस्य परिपंथिनौ. ॥ ३४ ॥

एऱ्हवीं इंद्रियांचिया अर्था- । सारिखा विषयो पोखितां । संतोषु कीर चित्ता । आपजेल ॥२१०॥ परी तो संवचोराचा सांगातु । जैसा नावेक स्वस्थु । जंव नगराचा प्रांतु । सांडिजेना ॥११॥ बापा विषाची मधुरता । झणें आवडी उपजे चित्ता । परी तो परिणामु विचारितां । प्राणु हरी ॥१२॥ देखें इंद्रियीं कामु असे । तो लावी सुखदुराशे । जैसा गळीं मीनु आमिषें । भुलविजे गा ॥१३॥ परी तयामाजीं गळु आहे । जो प्राणातें घेऊनि जाये । तो जैसा ठाउवा नोहे । झांकलेपणें ॥१४॥ तैसें अभिलाषें येणें कीजेल । विषयांची आशा धरिजेल । तरी वरपडा होइजेल । क्रोधानळा ॥१५॥ जैसा कवळोनियां पारधी । घातेचिये संधी । आणी मृगातें बुद्धी । साधावयां ॥१६॥ एथ तैसीचि परी आहे । म्हणूनि संगु हा तुज नोहे । पार्था दोन्ही कामक्रोध हे । घातकु जाणें ॥१७॥ म्हणऊनि हा आश्रोचि न करावा । मनेंही आठवो न धरावा । एकु निजवृत्तीचा वोलावा । नासों नेदीं ॥१८॥

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥**

स्वधर्मः विगुणः ( अपि ) स्वनुष्ठितात् परधर्मात् श्रेयान् ( अस्ति ); स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मः भयावहः (अस्ति). ३५

अगा स्वधर्मु हा आपुला । जरी कां कठिणु जाहला । तरी हाचि अनुष्ठिला । भला देखें ॥१९॥ येरु आचारु जो परावा । तो देखतां कीर बरवा । परी आचरतेनि आचरावा । आपुलाचि ॥२२०॥ सांगें शूद्रघरीं आघवीं । पक्वान्नें आहाति बरवीं । तीं द्विजें केंवि सेवावीं । दुर्बळु जरी जाहला ॥२१॥ हें अनुचित कैसेनि कीजे । अग्राह्य केंवि इच्छिजे । अथवा इच्छिलेंही पाविजे । विचारीं पां ॥२२॥ तरी लोकांचीं धवळारें । देखोनियां मनोहरें । असतीं आपुलीं तणारें । मोडावीं केवीं ॥२३॥ हें असो वनिता आपुली । कुरूप जरी जाहली । तऱ्ही भोगितां तेचि भली । जियापरी ॥२४॥ तेवीं आवडे तैसा सांकडु । आचरतां जरी दुवाडु ।

पासून अंधळा आहे त्यानें दिवस उगवला असें जर म्हटलें तर त्याचें बोलणें जसें लोक खरें मानीत नाहींत, ९७अथवा चंद्रप्रकाश ज्याप्रमाणें कावळ्याच्या उपयोगीं पडत नाहीं, त्याप्रमाणें, जे मूर्ख आहेत त्यांना हा विचार रुचत नाहीं. ९८ तसेंच, पार्था, जे जन ह्या परमार्थाविषयीं बहिर्मुख आहेत, त्यांच्याशीं भाषण सुद्धां करूं नये. ९९ कारण, ज्याप्रमाणें पतंग दिव्याचा मत्सर करितात, त्याप्रमाणें ते जन त्या विचारावर भरवंसा न ठेवितां ७८ट त्यांची निंदा करतात. २०० पतंगानें दिव्याला आलिंगन दिलें असतां तेथेंच त्याचें जसें बिनचूक मरण आहे, तसें विषयाचरण करण्यांतच आत्मघात आहे. १

ज्ञाता देखील आपल्या स्वभावाला अनुसरून वागतो, व सर्व भूतेंही आपल्या स्वभावाला अनुसरून वागतात, तर तेथें निग्रहाचें काय चालणार? ॥३३॥

म्हणून, कोणीं विचारवान मनुष्यानें ह्या इंद्रियांचे कौतुकानें देखील लाड पुरवूं नयेत.२अरे,असें पहा—सर्पाबरोबर खेळतां येईल का? किंवा वाघाचा सहवास सिद्धीस जाईल का? अथवा हालाहल विष प्राशन केलें तर तें जिरेल का सांग पाहूं? ३ हें पहा—बुद्धिपूर्वक नव्हे, परंतु सहज खेळतांना जरी अग्नि लागला, तरी तो जसा भडकल्यावर आंवरत नाहीं. तसें कौतुकानें इंद्रियांचे लाड पुरविणें चांगलें नाहीं. ४अर्जुना, वास्तविक पाहतां हें शरीर पराधीन ( गुणाधीन ) जर आहे, तर त्याच्याकरतां यत्नानें विषयोपभोग मिळविण्याची खटपट कां करावी? ५ पुष्कळ यत्न करून आणि सर्व गोष्टी संपादन करून ह्या देहाचें अहोरात्र लालन कां करावें? ६ ह्या ठिकाणीं सर्व परिश्रम करून, पुष्कळ संपत्ति मिळवून, व स्वधर्माचा त्याग करून केवळ देहाचें पोषण कां करावें? ७ मग हें पंचतत्त्वांचें झालेलें शरीर शेवटीं पंचतत्त्वांतच जाऊन मिळाल्यावर त्या वेळीं आपण केलेली खटपट कोठें शोधीत बसावें? ८ म्हणून केवळ शरीरपोषण करणें म्हणजे प्रत्यक्ष हानि आहे असें समज. ह्याकरितां, त्यांच विचारांत आयुष्य घालवूं नये.९

इंद्रियांचे अर्थ जे विषय, त्यांच्या ठिकाणीं इंद्रियांची प्रीति [ राग ] किंवा अप्रीति [ द्वेष ] हीं ठरलेलींच आहेत. त्या रागद्वेषांना वश होऊं नये; कारण, ते मनुष्याचा घात करितात.॥३४॥

विषयसेवनापासून प्रत्यक्ष सुख प्राप्त होत असतां, त्यांत सुख नाहीं, हें म्हणणें सयुक्तिक नाहीं असें तुला वाटल्यास, सहज विचार केला असतां, इंद्रियांना आवडेल त्याच विषयांचें सेवन केलें, तर चित्ताला समाधान होईल हें खरें; २१० परंतु तें समाधान म्हणजे संभावित चोराची गांठ पडल्यावर तो जसा नगरसीमा ओलांडापर्यंत क्षणभर स्वस्थ असतो, ( आणि मग घोर वनांत गेल्यावर जसा सर्वस्वी नाश करितो, ) तसें होय. ११ बाबारे, बचनाग ( विषाची कांडी ) प्रथम खातांना गोड लागतो खरा, परंतु त्याच्या परिणामाचा विचार केला असतां तो प्राणनाशक असतो, त्याप्रमाणें १२ इंद्रियांचे ठिकाणीं असणारा जो काम तो विषयसुखाच्या दुराशेला लावतो. ज्याप्रमाणें मासा गळाला लावलेल्या आमिषाला भुलतो १३ परंतु आमिषाचे आंत गळ झांकलेला आहे तो आपला प्राण घेईल, हें त्याला कळत नाहीं. १४ त्याप्रमाणें, विषयसुखाच्या अभिलाषानें जो विषयाची इच्छा करील, तो क्रोधाग्नींत पडेल. १५ ज्याप्रमाणें पारधी मृगाला धरण्याकरितां चारी बाजूंनीं मारण्याची संधि साधून वळवून आणितात, १६ त्याप्रमाणें ह्या विषयसुखाची तऱ्हा आहे; म्हणून, पार्था, कामक्रोध हे घातक समजून त्यांचा संग तूं करूं नको; १७ आणि ह्या विषयांना थारा न देतां मनाला त्यांची आठवण देखील होऊं देऊं नको, तसेंच आत्मज्ञानाचा ओलावा नाहींसा होऊं देऊं नको.१८

आपला धर्म जरी वैगुण्ययुक्त असला, तरी उत्तम प्रकारें आचरिलेल्या परधर्मापेक्षां तो चांगला आहे. स्वधर्माचरणांत मृत्यु जरी आला तरी तो कल्याणप्रद आहे. [ परंतु ] परधर्म भय देणारा आहे. ॥ ३५ ॥

अरे, आपला धर्म जरी आचरण्यास कठिण असला, तरी त्याचेंच आचरण करणें उत्तम होय. १९ दुसऱ्याचा धर्म खरोखर दिसण्यांत जरी चांगला असला, तरी आचरण करणारांनीं आपल्याच धर्माचें आचरण केलें पाहिजे. २२० ब्राह्मण जरी दरिद्री झाला, तरी त्यानें शूद्रांच्या घरचीं उत्तम पक्वान्नें कशीं सेवावीं सांग बरें? २१ असें हें अनुचित कर्म कसें करावें? आणि जी गोष्ट घेण्यास योग्य नाहीं, तिची इच्छा कशी करावी? अथवा जरी इच्छित प्राप्त झालें, तरी तें घ्यावें का? ह्याचा विचार कर. २२ तसेंच, लोकांचे मोठमोठे सुंदर वाडे पाहून आपल्या असलेल्या गवती झोंपड्या मोडाव्या का? २३ हें असो, आपली स्त्री कुरुप असली तरी तीच आपल्यास भोगण्यास ज्याप्रमाणें योग्य होय, २४ त्याप्रमाणें, वाटेल तसा कठिण आणि आचरण्यास दुर्घट असा स्वधर्म असला, तरी

तऱ्ही स्वधर्मुचि सुरवाडु । परत्रींचा ॥२५॥ हां गा साकर आणि दूध । हें गौल्य कीर प्रसिद्ध । परी कृमिदोषीं विरुद्ध । घेपे केवीं ॥२६॥ ऐसेनिही जरी सेविजेल । तरी ते आळुकीचि उरेल । जे तें परिणामीं पथ्य नव्हेल । धनुर्धरा ॥२७॥ म्हणोनि आणिकांसी जें विहित । आणि आपणपेयां अनुचित । तें नाचरावें जरी हित । विचारिजे ॥२८॥ या स्वधर्मातें अनुष्ठितां । वेचु होईल जीविता । तोहि निका वर उभयतां । दिसत असे ॥२९॥ ऐसें समस्तसुरशिरोमणी । बोलिले जेथ श्रीशार्ङ्गपाणी । तेथ अर्जुन म्हणे विनवणी । असे देवा ॥२३०॥ हें जें तुम्हीं सांगितलें । तें सकळ कीर म्यां परिसिलें । तरी आतां पुसेन कांहीं आपुलें । अपेक्षित ॥३१॥

अर्जुन उवाच—

**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ।**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥३६॥**

वार्ष्णेय, अथ केन प्रयुक्तः अयं पूरुषः अनिच्छन् अपि बलात् नियोजितः इव पापं चरति ? ॥ ३६ ॥

तरी देवा हें ऐसें कैसें । जे ज्ञानियांही स्थिति भ्रंशे । मार्गु सांडुनी अनारिसे । चालत देखों ॥३२॥ सर्वज्ञुही जे होती । हेयोपादेयही जाणती । तेही परधर्में व्यभिचरती । कवणें गुणें ॥३३॥ बीजा आणि भुसा । अंधु निवाडु नेणे जैसा । नावेक देखणाही तैसा । बरळे कां पां ॥३४॥ जे असता संगु सांडिती । तेंचि संसर्गु करितां न धाती । वनवासीही सेविती । जनपदातें ॥३५॥ आपण तरी लपती । सर्वस्वें पाप चुकविती । परी बळात्कारें सुइजती । तयाचि माजीं ॥३६॥ जयाची जीवें घेती विवसी । तेंचि जडोनि ठाके जीवेंसीं । चुकवितां ते गिंवसी । तयातेंचि ॥३७॥ ऐसा बलात्कारु एकु दिसे । तो कवणाचा एथ आग्रहो असे । हें बोलावें हृषीकेशें । पार्थु म्हणे ३८

श्रीभगवानुवाच—

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥३७॥**

एषः कामः एषः क्रोधः रजोगुणसमुद्भवः ( अस्ति; एषः ) महाशनः महापाप्मा (अस्ति; त्वं) एनं इह वैरिणं विद्धि.३७

तंव हृदयकमळआरामु । जो योगियांचा निष्कामकामु । तो म्हणतसे पुरुषोत्तमु । सांगेन आइक ॥३९॥ तरी हे कामु क्रोधु पाहीं । जयांतें कृपेची सांठवण नाहीं । हे कृतांताच्या ठायीं । मानिजती ॥२४०॥ हे ज्ञाननिधीचे भुजंग । विषयदरींचे वाघ । भजनमार्गींचे मांग । मारक जे ॥४१॥ हे देहदुर्गींचे धोंड । इंद्रियग्रामींचे कोंड । यांचें व्यामोहादिक दबड । जगावरी ॥४२॥ हे रजोगुण मानसींचे । समूळ आसुरियेचे । धालेपण ययांचें । अविद्या केलें ॥४३॥ हे रजाचे कीर जाहले । परी तमासी पढियंते भले । तेणें निजपद यां दिधलें । प्रमादमोहो ॥४४॥ हे मृत्यूच्या नगरीं । मानिजती निकियापरी । जे जीविताचे वैरी । म्हणऊनियां ॥४५॥ जयांसि भुकेलियां आमिषा । हें विश्व न पुरेचि घांसा । कुळवाडियांचिया आशा । चाळीत असे ॥४६॥ कौतुकें कवळितां मुठी । जिये चवदा भुवनें थेंकुटीं । तिये भ्रांतिही धाकुटी । वाल्हीदुल्ही ॥४७॥ जे लोकत्रयाचें भातुकें । खेळतांचि खाय कवतिकें । तिच्या दासीपणाचेनि बिकें । तृष्णा जिये ॥४८॥ हें असो मोहें मानिजे । यांतें अहंकारें घेपे दीजे । जेणें जग आपुलेनि भोजें । नाचवीत असे ॥४९॥ जेणें सत्याचा भोकसा काढिला । मग अकृत्य तृणकुटा भरिला । तो दंभु रूढविला । जगीं इहीं ॥२५०॥ साध्वी शांति नागविली । मग माया मांगी शृंगारिली । तियेकरवीं विटाळविलीं । साधुवृंदें ॥५१॥ इहीं विवेकाची त्राय फेडिली । वैराग्याची खाल काढिली । जितया मान मोडिली । उपशमाची ॥५२॥ इहीं संतोषवन खांडिलें । धैर्यदुर्ग पाडिले । आनंदरोप सांडिलें । उपडूनियां ॥५३॥ इहीं बोधाचीं रोपें लुंचिलीं । सुखाची लिपि पुसिली । जिव्हारीं आगी सूदली । तापत्रयाची ॥५४॥ हे आंगा तंव

तोच परलोकाचा सखा होय. २५ असें पहा कीं, दूध आणि साखर हे दोन पदार्थ गोड आहेत म्हणून प्रसिद्ध आहे; पण ज्यांना जंत झाले आहेत, त्यांना ते विरुद्ध आहेत, त्यांनीं ते कसे सेवन करावे? २६ अर्जुना, इतक्यावरही जर रोग्यानें ते सेवन केले, तर त्याचा तो हटवादीपणाच आहे. कारण, परिणामीं ते त्यास हितकर होणार नाहींत. २७ म्हणून, आम्हांला हित विचारशील तर जें दुसऱ्यास उचित असून आपल्यास अनुचित आहे, त्याचें आचरण करूं नये. २८ स्वधर्माचें आचरण करीत असतांना जरी आपला जीव खर्ची पडला, तरी तो दोन्ही लोकीं खरोखर श्रेष्ठ असा मानला जातो. २९ देवाधिदेव श्रीशार्ङ्गपाणि ह्यांचें हें भाषण ऐकून अर्जुन म्हणालाः–देवा, माझी एक विनंती आहेः २३० आपण जें मला आतां सांगितलें, तें मीं सर्व नीट ऐकलें; तर आतां मला जें कांहीं पाहिजे आहे तें मी विचारितों. ३१

**अर्जुन म्हणाला—कृष्णा, तर मग जीवाला विषयांची इच्छा नसूनही, कोणाच्या प्रेरणेनें तो जीव बलात्कारानें ढकलल्याप्रमाणें पापाचरण करितो? ॥ ३६ ॥**

देवा, ज्ञान्यांची सुद्धां स्थिति भ्रष्ट होऊन ते भलत्याच मार्गानें जातात हें कसें? ३२ ते सर्वज्ञ असून व त्यांना त्याज्य काय व ग्राह्य काय हें माहीत असून ते परधर्माचें आचरण कां करितात? ३३ जसें अंधळ्या मनुष्यास धान्य आणि कोंडा हे निराळे करतां येत नाहींत, तसें क्षणभर डोळसासही कां व्हावें? ३४ जे असलेला संग सोडतात, तेच पुनः संग करूनही तृप्त होत नाहींत; व वनवासांत असलेलेही व्यावहारिक लोकांचें आचरण करितात. ३५ वास्तविक ते पापापासून अलिप्त असावे, व पाप आपल्या हातून होऊं नये अशी इच्छा करितात, परंतु त्यांना बलात्कारें करून पापांत कोणी तरी घातल्याची प्रतीति येते. ३६ ज्या विषयांची ते मनापासून भिती बाळगतात, तेच विषय त्यांच्या जिवाशीं जडून राहतात. ते चुकवायाचा प्रयत्न केला तरी ते पुनः त्यांतच गुरफटतात. ३७ अशा रीतीनें ज्ञानवानांच्या विषयसेवनांत बलात्कार दिसतो तो बलात्कार करण्याचा आग्रह कोणाचा आहे, हें आपण कृपा करून सांगावें, असें अर्जुन म्हणाला. ३८

**श्रीभगवान् म्हणाले—हा काम व हाच क्रोध. ह्याची उत्पत्ति रजोगुणापासून आहे. हा अधाशी व महापापी आहे. तूं या लोकीं याला वैरी समज. ॥ ३७ ॥**

तेव्हां हृदयास रमविणारा, आणि योगीजन ज्याची निष्कामबुद्धीनें इच्छा करतात असा जो पुरुषोत्तम तो म्हणालाः—सांगतों ऐक. ३९ हृदयामध्यें वास करणारे हे काम आणि क्रोध हेच पुरुषास पापामध्यें प्रवृत्त करणारे आहेत, कारण ज्या कामक्रोधांच्या ठिकाणीं दया म्हणून बिलकूल नाहीं, फार काय सांगावें, दुसऱ्याचा नाश करण्याविषयीं यमाप्रमाणें यांचें सामर्थ्य आहे. २४० काय सांगूं, हे कामक्रोध ज्ञानरूप धनाच्या ठेवीवरील नाग, व विषयखोऱ्यांतील वाघ आणि भजनमार्गाचे मारेकरी मांग आहेत. ४१ देहरूप किल्ल्यावरील मोठे दगड व इंद्रियरूप गांवांतील कोंडवाडे आहेत, आणि भ्रांति वगैरे उत्पन्न करण्याचा ह्यांचा जगावर दपटशा आहे. ४२ हे मनाच्या ठिकाणीं भासणारे मुळापासून असुरी संपत्तींतील असून रजोगुणाचें कार्य आहेत. ह्यांची तृप्ती अविवेकाकडून होते. ४३ हे रजोगुणापासून झालेले आहेत खरे, परंतु तमोगुणाचे फार आवडते आहेत; म्हणून तमोगुणानें आपलें सर्वस्व—माजुरपणा व अज्ञान–ह्यांस दिलें आहे. ४४ हे जीविताचे शत्रु आहेत, म्हणून मृत्यूचे नगरांत ह्यांना चांगल्या प्रकारचा मान मिळतो. ४५ काय चमत्कार सांगावा, ह्यांच्या नुसत्या भुकेच्या इच्छेला हें विश्व एक घांसाला देखील पुरत नाहीं, आणि आशा ही ह्यांच्या व्यापाराची वृद्धि करते. ४६ जिने सहज आपल्या मुठी वळल्या असतां त्यांत मावण्याला चौदा भुवनेंही कमीच; अशा तऱ्हेची जी भ्रांति ती आशेची धाकटी बहीण आहे. ४७ जी ही भ्रांति केवळ भातुकली खेळतां खेळतां सहज तिन्ही लोक खाऊन टाकते; आणि तृष्णा जी पुष्ट होते, ती हिच्या दास्यत्वाच्या बळावरच! ४८ हें असो; पण ह्या कामक्रोधांना मोहाच्या घरीं प्रतिष्ठा आहे; आणि ज्या अहंकारानें सर्व जगाला नाचवून सोडलें आहे, त्या अहंकाराची ह्यांशीं दवधेव आहे. ४९ ज्या दंभानें सत्याचा कोथळा फोडून त्यांत दुष्ट कृत्यांचा पेंढा भरला, त्या दंभाला ह्यांनींच जगांत प्रसिद्धीला आणलें. २५० ह्यांनीं पतिव्रतारूप शांतीला लुबाडून घेऊन मायारूप मांगिणीला सजविलें आणि तिच्याकडून साधूंचे समुदाय भ्रष्ट करविले! ५१ ह्यांनीं विवेकाचा ठिकाण नाहींसा केला; वैराग्याची खोड मोडली आणि जित्या उपशमाची मान तोडिली! ५२ ह्यांनीं संतोषरूपी वन तोडून टाकिलें, धैर्यरूपी किल्ले जमीनदोस्त केले. आणि आनंदरूपी रोपडें उपटून टाकिलें. ५३ ह्यांनीं ज्ञानाचीं रोपें खुडून टाकलीं, सुखाचें नांवसुद्धां पुसून टाकलें, आणि प्राणिमात्रांच्या हृदयांत त्रिविध तापांची आग उत्पन्न केली. ५४ हे शरीराबरोबर घडलेले असून जिवांतच जडून राहिले आहेत;

घडले । जीवींचि आथी जडले । परी नातुडती गिंवसिले । ब्रह्मादिकां ॥५५॥ हे चैतन्याचे शेजारीं । वसती ज्ञानाच्या एका हारीं । म्हणोनि प्रवर्तले महामारी । सांवरती ना ॥५६॥ हे जळेंवीण बुडविती । आगीवीण जाळिती । न बोलतां कवळिती । प्राणियांतें ॥५७॥ हे शस्त्रेंवीण साधिती । दोरेंवीण बांधिती । ज्ञानियासी तरी वधिती । पैज घेउनी ॥५८॥ हे चिखलेंवीण रोंविती । पाशिकेंवीण गोंविती । हे कवणाजोगे न होती । आंतौटेपणें ॥५९॥

**धूमेनाऽऽव्रियते वह्निर्यथाऽऽदर्शो मलेन च ।**
**यथोल्बेनाऽऽवृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥३८॥**

यथा धूमेन वह्निः आव्रियते, यथा च आदर्शः मलेन ( आव्रियते ), यथा गर्भः उल्बेन आवृतः, तथा तेन (कामेन) इदं आवृतम्. ॥३८॥

जैसी चंदनाची मुळी । गिंवसोनि घेपे व्याळीं । नातरी उल्बाची खोळी । गर्भस्थासी ॥२६०॥ कां प्रभावीण भानु । धूमेवीण हुताशनु । जैसा दर्पण मळहीनु । कहींच नसे ॥६१॥ तैसें इहींवीण एकलें । आम्हीं ज्ञान नाहीं देखिलें । जैसें कोंडेनि पां गुंतलें । बीज निपजे ॥६२॥

**आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।**
**कामरूपेण कौंतेय दुष्पूरेणाऽनलेन च ॥३९॥**

कौंतेय, ज्ञानिनः नित्यवैरिणा एतेन कामरूपेण दुष्पूरेण च अनलेन [ इव ] ज्ञानं आवृतम्. ॥३९॥

तैसें ज्ञान तरी शुद्ध । परी इहीं असे प्ररुद्ध । म्हणोनि तें अगाध । होऊनि ठेलें ॥६३॥ आधीं यांतें जिणावें । मग तें ज्ञान पावावें । तंव पराभवो न संभवे । रागद्वेषां ॥६४॥ यांतें साधावयालागीं । जें बळ बाणिजे आंगीं । तें इंधनें जैसीं आगी । सावावो होय ॥६५॥

**इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।**
**एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥**

इंद्रियाणि, मनः, बुद्धिः अस्य अधिष्ठानं उच्यते. एषः एतैः ज्ञानं आवृत्य देहिनं विमोहयति. ॥ ४० ॥

तैसे उपाय कीजती जे जे । ते यांसीचि होती विरजे । म्हणोनि हटियांतें जिणिजे । इहींचि जगीं ॥६६॥ ऐसियांही सांकडां बोला । एक उपायो आहे भला । तो करितां जरी आंगवला । तरी सांगेन तुज ॥६७॥

**तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।**
**पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥**

भरतर्षभ, तस्मात् त्वं आदौ इंद्रियाणि नियम्य ज्ञानविज्ञाननाशनं एनं पाप्मानं प्रजहि. ॥ ४१ ॥

यांचा पहिला कुरुठा इंद्रियें । एथूनि प्रवृत्ति कर्मातें विये । आधीं निर्दळूनि घालीं तियें । सर्वथैव ॥६८॥

**इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यो: परं मनः ।**
**मनसस्तु परा बुद्धियों बुद्धेः परतस्तु सः ॥४२॥**

इंद्रियाणि पराणि आहुः, इंद्रियेभ्यः मनः परं [ अस्ति ], बुद्धिः तु मनसः परा [ अस्ति ]; यः बुद्धेः परतः सः तु ( परमात्मा ). ॥ ४२ ॥

मग मनाची धांव पारुषेल । आणि बुद्धीची सोडवण होईल । इतुकेनि थारा मोडेल । या पापियांचा ॥६९॥

**एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।**
**जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥४३॥**

महाबाहो, एवं आत्मानं बुद्धेः परं बुद्ध्वा ( आत्मानं ) आत्मना संस्तभ्य दुरासदं कामरूपं शत्रुं जहि. ॥ ४३ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतियोऽध्यायः

हे अंतरींहूनि जरी फिटले । तरी निभ्रांत जाण निवटले । जैसें रश्मीवीण उरलें । मृगजळ नाहीं ॥२७०॥ तैसे रागद्वेष जरी निमाले । तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें । मग तो भोगी सुख आपुलें । आपणचि ॥७१॥ ते गुरुशिष्यांची गोठी । पदपिंडाची गांठी । तेथ स्थिर राहोनि नुठीं । कवणे काळीं ॥७२॥ ऐसें सकळ सिद्धांचा रावो । देवी लक्ष्मीयेचा नाहो । राया ऐकें देवदेवो । बोलता जाहला ॥७३॥ आतां पुनरपि तो अनंतु । आद्य एकी मातु । सांगेल तेथ पंडुसुतु । प्रश्नु करील ॥७४॥ तया बोलाचा हन माडु । कीं रसवृत्तीचा निवाडु । येणें श्रोतयां होईल सुरवाडु । श्रवणसुखाचा ॥७५॥ ज्ञानदेवो म्हणे निवृत्तीचा । चांग उठावा करूनि उन्मेषाचा । मग संवादु श्रीहरिपार्थांचा । भोगावा बापा ॥२७६॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां तृतियोऽध्यायः ॥ ३ ॥ श्लोक ४३. ओंव्या २७६

परंतु शोध करायाला गेलें असतां सांपडत नाहींत. ५५ हे ब्रह्मस्वरूपाच्या शेजारीं आणि ज्ञानाच्या पंक्तीला वास करतात, म्हणून जगताचा महाप्रलय करण्यास प्रवृत्त होऊन कोणाला आंवरत नाहींत. ५६ पाण्याशिवाय बुडवितात, अग्नीशिवाय जाळतात आणि प्राण्याला न कळतां ग्रासतात. ५७ हे शस्त्राशिवाय मारतात, दोराशिवाय बंधन करतात, आणि तत्त्ववेत्त्यांना तर पैजेनें आपल्या आधीन करून घेतात. ५८ हे चिखलाशिवाय रोंवतात, पाशाशिवाय लोकांना बांधून ठेवितात, आणि शरिराच्या इतक्या अंतर्यामीं पोहोंचल्यामुळें ह्यांच्या साम्यतेचे दुसरे कोणी नाहींत. ५९

**जसा धुरानें अग्नि, मळानें आरसा, व खोळीनें गर्भ आच्छादिलेला असतो, तसें हें शुद्ध ज्ञान ह्या कामानें आच्छादिलेलें आहे. ॥ ३८ ॥**

अर्जुना, फार काय सांगावें, जेथें ज्ञान आहे तेथें हे काम क्रोध आहेतच— जसा साप चंदनाच्या मुळाला वेढून राहतो, किंवा मोटेनें गर्भ जसा आच्छादित असतो; २६० अथवा प्रभेसिवाय सूर्य, धुराशिवाय अग्नि किंवा मळाशिवाय आरसा हीं ज्याप्रमाणें सांपडावयाचीं नाहींत, ६१ त्याप्रमाणें कामक्रोधांशिवाय शुद्ध ज्ञान आमच्या दृष्टीस कधीं पडलें नाहीं. ६२

**हे कौंतेया, ज्ञान्याचें नित्य वैर करणारा, व कधींही तृप्त न होणाऱ्या अग्नीप्रमाणें असणारा, अशा ह्या इच्छारूप कामानें ज्ञान झांकून टाकलें आहे. ॥ ३९ ॥**

तसें ज्ञान हें स्वतः जरी शुद्ध आहे, तरी कामक्रोधांनीं आच्छादित असतें, म्हणूनच तें महाबलवान होऊन बसलें आहे. ६३ अगोदर कामक्रोधास जिंकावें, मग ज्ञान प्राप्त होणार, पण त्या कामक्रोधास जिंकणें अगोदर कठीण! ६४ कारण, ह्यांना जिंकण्याकरितां जें जें अवसान आणावें तें तें उलट त्यांनाच साह्यकारी होतें. जसें अग्नी विझविण्याकरितां लांकडें टाकलीं असतां तीं त्यालाच साह्य करितात, ६५

**इंद्रियें, मन आणि बुद्धि हीं त्या कामाचीं राहण्याचीं स्थानें होत, असें सांगितलेलें आहे. म्हणून हा काम इंद्रियादिकांच्या योगें जीवाचें ज्ञान झांकून टाकून त्याला मोहांत पाडितो. ॥ ४० ॥**

त्याप्रमाणें, जे जे उपाय करावे ते ते ह्यांनाच साह्यकारी होतात; म्हणून ह्या जगामध्यें हठयोग्यांना देखील [ सुद्धां ] हेच जिंकितात. ६६ मग हे काम क्रोध अजिंक्यच झाले असें तुला वाटेल, तर तसें मात्र नाहीं. अर्जुना, अशाही संकटांतून पार पडण्यास एक उत्तम उपाय आहे; तो तुला साधेल तर सांगतों. ६७

**म्हणून, अर्जुना, तूं प्रथम इंद्रियांना जिंक; आणि शास्त्रीय व स्वानुभविक ज्ञानाचा नाश करणाऱ्या अशा ह्या महापापी कामाला मारून टाक.**

ह्यांचें मूळ वास्तव्य इंद्रियांचे ठिकाणीं आहे, आणि इंद्रियांपासून कर्माची प्रवृत्ति होते, म्हणून त्या इंद्रियांना अगोदर सर्वथैव जिंक. ६८

**देहापेक्षां इंद्रियें सूक्ष्म, इंद्रियांपेक्षां मन सूक्ष्म, मनापेक्षां बुद्धि सूक्ष्म, व बुद्धीपेक्षां परमात्मा सूक्ष्म, असें ज्ञानी म्हणतात. ॥ ४२ ॥**

असें झालें म्हणजे मनाची धांव कुंठित होऊन बुद्धीची सोडवणूक होईल आणि मग तेथून ह्या दुष्टांचें बिऱ्हाड मोडेल. ६९

**हे महाबाहो, ह्याप्रमाणें बुद्धीपेक्षां सूक्ष्म म्हणजे बुद्धीच्या पलीकडे असणाऱ्या परमात्म्याला जाणून जिंकण्यास कठीण अशा कामरूपी शत्रूस जिंक.**

ह्याप्रमाणें ह्यांची अंतःकरणांतून वस्ती मोडली म्हणजे हे खास मेले असें समज. ज्याप्रमाणें सूर्यकिरणांशिवाय मृगजळ दृष्टीस पडावयाचें नाहीं, २७० त्याप्रमाणें, राग आणि द्वेष हे जर नाश पावले, तर ब्रह्मरूपी स्वराज्यच हातीं आलें असें समज. मग तो आपलेंच सुख आपण भोगतो. ७१ हीच गुरुशिष्यांची गुह्य गोष्ट; हेंच जीवब्रह्माचें ऐक्य. तूं तेथें स्थिर होऊन तेथून कधींही हालूं नको. ७२ संजय म्हणतोः—राजा, ऐक; सकलसिद्धमुगुटमणि लक्ष्मीपति श्रीकृष्ण ह्याप्रमाणें बोलले. आतां ह्यापुढें भगवान् श्रीकृष्ण एक पुरातन कथा सांगतील, ती ऐकून अर्जुन प्रश्न करील. ७३ ७४ त्या कथेची योग्यता व रसिकपणा हीं ऐकून श्रोत्यांना श्रवणसुखाचा सुकाळ होईल. ७५ निवृत्तींचे दास जे ज्ञानदेव, ते म्हणतात, "आपांनो, आत्मज्ञानप्राप्तीच्या चांगल्या तयारीनें तुम्ही कृष्णार्जुनसंवाद ऐका." २७६

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय चौथा.

आजि श्रवणेंद्रिया पाहलें । जे येणें गीतानिधान देखिलें । आतां स्वप्नचि हें तुकलें । साचासरिसें ॥१॥ आधींचि विवेकाची गोठी । वरी प्रतिपादी श्रीकृष्ण जगजेठी । आणि भक्तराजु किरीटि । परिसत असे ॥२॥ जैसा पंचमालापु सुगंधु । कीं परिमळु आणि सुस्वादु । तैसा भला जाहला विनोदु । कथेचा इये ॥३॥ कैसी आगळिक दैवाची । जे गंगा जोडली अमृताची । हो कां जपतपें श्रोतयांचीं । फळा आलीं ॥४॥ आतां इंद्रियजात आघवें । तिहीं श्रवणाचें घर रिघावें । मग संवादसुख भोगावें । गीताख्य हें॥५॥ हा अतिसो अतिप्रसंगें । सांडूनि कथाचि ते सांगें । जे कृष्णार्जुन दोघे । बोलत होते ॥६॥ ते वेळीं संजयो रायातें म्हणे । अर्जुनु अधिष्ठिला दैवगुणें। जे अतिप्रीति श्रीनारायणें । बोलतु असे ॥७॥ जें न संगेचि पितया वसुदेवासी । जें न संगेचि माते देवकीसी । जें न संगेचि बंधु बळिभद्रासी । तें गुह्य अर्जुनेंशीं बोलत ॥८॥ देवी लक्ष्मीयेवढी जवळिक । परी तेही न देखे या प्रेमाचें सुख । आजि कृष्णस्नेहाचें बिक । यातेंचि आथी ॥९॥ सनकादिकांचिया आशा । वाढीनल्या होतिया कीर बहुवसा । परी त्याही येणें मानें यशा । येतीचिना ॥१०॥ या जगदीश्वराचें प्रेम । एथ दिसतसे निरुपम । कैसें पार्थें येणें सर्वोत्तम । पुण्य केलें ॥११॥ हो कां जयाचिया प्रीती । अमूर्त हा आला व्यक्ती । मज एकवंकी याची स्थिती । आवडतु असे ॥१२॥ एऱ्हवीं हा योगियां नाडळे । वेदार्थासी नाकळे । जेथ ध्यानाचेही डोळे । पावतीना ॥१३॥ तो हा निजस्वरूप । अनादि निष्कंप । परी कवणें मानें सकृप । जाहला आहे ॥१४॥ हा त्रैलोक्यपटाची घडी । आकाराची पैलथडी । कैसा याचिये आवडी । आवरला असे ॥१५॥

श्रीभगवानुवाच—

**इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।**
**विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ १ ॥**

अहं इमं अव्ययं योगं विवस्वते प्रोक्तवान्; विवस्वान् मनवे प्राह; मनुः ( च ) इक्ष्वाकवे अब्रवीत्. ॥ १ ॥

मग देव म्हणे पंडुसुता । हाचि योगु आम्हीं विवस्वता । कथिला परी ते वार्ता । बहुतां दिवसांची ॥१६॥ मग तेणें विवस्वतें रवी । हे योगस्थिति आघवी । निरूपिली बरवी । मनूप्रती ॥१७॥ मनूनें आपण अनुष्ठिली । मग इक्ष्वाकुवा उपदेशिली । ऐसी परंपरा विस्तारिली । आद्य हे गा ॥१८॥

**एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।**
**स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥**

परंतप, एवं परंपराप्राप्तं इमं ( योगं ) राजर्षयः विदुः; सः योगः महता कालेन इह नष्टः. ॥ २ ॥

मग आणिकही या योगातें । राजर्षि जाहले जाणते । परि तेथोनि आतां सांप्रतें । नेणिजे कोण्ही ॥१९॥ जे प्राणिया कामीं भरु । देहाचिवरी आदरु । म्हणोनि पडिला विसरु । आत्मा

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय चौथा.

गीताशास्त्राच्या प्रथम तीन अध्यायांचें व्याख्यान केल्यानंतर आपल्या श्रोत्रेंद्रियांचें भाग्य वर्णन करण्याचे मिषानें मुमुक्षूंस ग्रंथामध्यें रुची उत्पन्न होण्याकरितां महाराज अवतरण देतातः—

आज कानांना उजाडलें म्हणजे त्यांचा भाग्योदय झाला; कारण, यथार्थ गीता श्रवण होणें बहुतेक स्वप्नवत आहे! असा गीतेचा ठेवा आज त्यांनीं पाहिला. आतां जागृत झाल्यावर स्वप्नांतील गोष्ट खोटीशी भासते; पण ती आज खरी झाली! १ आधींच आत्मविचाराची गोष्ट, त्यांत श्रीकृष्ण जगजेठी प्रतिपादन करणारा, आणि भक्तशिरोमणि अर्जुन ऐकणारा. २ पंचम स्वर आणि त्यांतच उत्तम सुवास व गोडी या तिहींचा ऐक्यभाव असतां जसा आनंद होईल तसा प्रकार या गीतारूपी कथामृताचा आहे, म्हणजे यांत सर्व इंद्रियांना आनंद होईल अशी गोडी आहे. ३ दैवाची थोरवी काय वर्णावी, कीं जिच्यामुळें श्रोत्यांचीं जपतपें फळास येऊन अमृतरूप गंगाच त्यांना प्राप्त झाली. ४ म्हणून, सर्व इंद्रियांनीं आपआपलीं कामें सोडून श्रवणाचे ठिकाणीं वास करून कृष्णार्जुनसंवादरूप गीतेचें सुख घ्यावें. ५ तेव्हां संतमंडळी ज्ञानेश्वरास म्हणाली कीं, आतां तुझा पाल्हाळ व अधिक प्रसंग पुरे करून कृष्णार्जुन जें बोलत होते ती कथा आम्हांला सांग. ६ त्या वेळेस संजय धृतराष्ट्रास म्हणालाः—दैवीसंपत्तीनें युक्त असलेल्या अर्जुनास श्रीकृष्ण अति प्रेमानें म्हणालेः- अति प्रेमानें कशावरून म्हणशील तर—७ जें गुह्य श्रीकृष्णांनीं आपला पिता वसुदेव, माता देवकी व बंधु बलराम ह्यांसही सांगितलें नाहीं, तें अर्जुनास सांगितलें. ८ लक्ष्मीदेवी नेहमीं सन्निध राहणारी, पण तिलाही ज्या प्रेमसुखाचा अनुभव लाभला नाहीं, त्या कृष्णप्रेमाचा उमाळा आज पार्थावरच आला आहे; काय चमत्कार सांगावा—९ सनकादिक त्याची बहुत दिवसांपासून इच्छा करीत होते, पण त्यांनाही इतक्या योग्यतेचें तें प्रेम प्राप्त झालें नाहीं. १० त्याचे ठिकाणीं जगदीश्वराचें अनुपमेय प्रेम दृष्टास पडतें, यावरून या अर्जुनानें किती सर्वोत्कृष्ट पुण्य केलें असावें! ११ पहा कीं, ज्याच्या प्रीतीकरितां निराकार साकार झाला, ह्यावरून मला तर असें वाटतें कीं, ह्या दोघांची स्थिति (देह) जरी भिन्न आहे, तरी दोघे एकरूपच आहेत. १२ एऱ्हवीं हा भगवान् योग्यांना आढळत नाहीं, वेदालाही आकलन होत नाहीं, व त्याचे ठिकाणीं ध्यानाचीही दृष्टि पोहोंचत नाहीं. १३ असा जो आत्मस्वरूप अनादि अविक्रिय भगवान्, तो अर्जुनावर कसा कृपावंत झाला आहे! १४ हा त्रैलोक्यरूप वस्त्राच्या संकोचविस्तारांचें अधिष्ठान आहे. (त्रैलोक्य हें ह्याचें रूप असून त्याची घडी करून हा अवतार घेऊन आला आहे,) आणि आकाराच्या पलीकडला असून हा अर्जुनाला इतक्या प्रेमानें कसा स्वाधीन झाला नकळे! १५

**श्रीभगवान् म्हणालेः—हा नाशरहित कर्मयोग आम्हीं पूर्वीं सूर्याला सांगितला; सूर्यानें मनूला सांगितला; आणि मनूनें इक्ष्वाकूला सांगितला. १**

मग श्रीकृष्ण अर्जुनास म्हणालेः—हा कर्मयोग आम्हीं पूर्वीं विवस्वानाला—सूर्याला—सांगितला; परंतु त्या गोष्टीला पुष्कळ दिवस झाले. १६ मग सूर्यानें हा सर्व योग वैवस्वत मनूला सांगितला; १७ आणि मनूनें त्याचें आचरण करून इक्ष्वाकुनामक आपल्या पुत्रास त्याचा उपदेश केला, अशी ही मुळापासून परंपरा चालत आली आहे. १८

**अर्जुना, अशा परंपरेनें प्राप्त होऊन हा योग राजर्षींना समजला. परंतु तोच योग पुष्कळ काल गेल्यामुळें ह्या लोकीं नष्ट झाला. ॥ २ ॥**

पुढें आणखीही कांहीं राजर्षींना हा योग माहीत होता परंतु त्यानंतर आजपर्यंत कोणालाही तो माहीत नाहीं. १९ कारण, प्राणिमात्राची आवड विषयसेवनाविषयीं असून, देहावरच विशेष प्रेम असल्यामुळें त्यांना आत्मबोधाचा

बोधाचा ॥२०॥ अव्हांटलिया आस्थाबुद्धि । विषयसुखचि परमावधि । जीवु तैसा उपाधि । आवडे लोकां ॥२१॥ एरवीं तरी खवणेयांच्या गांवीं । पाटाउवें काय करावीं । सांगें जात्यंधा रवी । काय आथी ॥२२॥ कां बहिरयांच्या आस्थानीं । कवण गीतातें मानी । कीं कोल्हेया चांदणी । आवडी उपजे ॥२३॥ पैं चंद्रोदया आरौतें । जयांचे डोळे फुटती असते । ते काउळे केविं चंद्रातें । वोळखती ॥२४॥ तैसी वैराग्याची शिंव न देखती । जे विवेकाची भाष नेणती । ते मूर्ख केविं पावती । मज ईश्वरातें ॥२५॥ कैसा नेणों मोहो वाढीनला । तेणें बहुतेक काळु व्यर्थ गेला । म्हणोनि योगु हा लोपला । लोकीं इये ॥२६॥

**स एवाऽयं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।**
**भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ३**

सः एव अयं पुरातनः योगः मया अद्य ते प्रोक्तः; (त्वं) मे भक्तः असि, सखा च ( असि ); इति हि एतत् उत्तमं रहस्यं ( ते मया कथितम् ). ॥३॥

तोचि हा आजि आतां । तुजप्रती कुंतीसुता । सांगितला आम्हीं तत्वता । भ्रांति न करीं ॥२७॥ हें जीवींचें निज गुज । परी केवीं राखों तुज । जे पढियेसी तूं मज । म्हणऊनियां ॥२८॥ तूं प्रेमाचा पुतळा । भक्तीचा जिव्हाळा । मैत्रियेचि चित्कळा । धनुर्धरा ॥२९॥ तूं अनुसंगाचा ठावो । आतां तुज काय वंचूं आवो । जऱ्ही संग्रमारूढ आहों । जाहलों आम्ही ॥३०॥ तरी नावेक हें सहावें । गाजाबज्यही न धरावें । परी तुझें अज्ञानत्व हरावें । लागे आधीं ॥३१॥

अर्जुन उवाच—

**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।**
**कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥**

भवतः जन्म अपरं, विवस्वतः जन्म परं (अस्ति; अतः) त्व आदौ प्रोक्तवान् इति एतत् (अहं) कथं विजानीयाम्? ॥४॥

तंव अर्जुन म्हणे श्रीहरी । माय आपुलेयाचा स्नेहो करी । येथ विस्मयो काय अवधारीं । कृपानिधि ॥३२॥ तूं संसारश्रांतांची साउली । अनाथ जीवांची माउली । आम्हातें कीर प्रसवली । तुझीच कृपा ॥३३॥ देवा पांगुळ एकादें विजे । तरी जन्मौनि जोजारु साहिजे । हें बोलों काय तुझें । तुजचि पुढां ॥३४॥ आतां पुसेन जें मी कांहीं । तेथ निकें चित्त देईं । तेवींचि देवें कोपावें ना कांहीं । बोला एका ॥३५॥ तरी मागील जे वार्ता । तुवां सांगितली होती अनंता । ते नावेक मज चित्ता । मानेचिना ॥३६॥ जे तो विवस्वतु म्हणजे कायी । ऐसें हें वडिलां ठाउवें नाहीं । तरी तुवांचि केविं पाहीं । उपदेशिला ॥३७॥ तो तरी आइकिजे बहुतां काळांचा । आणि तूं तंव श्रीकृष्ण सांपेंचा । म्हणोनि गा इये मालूचा । विसंवादु ॥३८॥ तेवींचि देवा चरित्र तुझें । आपण कांहींचि नेणिजे । हें लटिकें केविं म्हणिजे । एकिहेळां ॥३९॥ परी हेचि मातु आघवी । मीं परियसें ऐशी सांगावी । जे तुवांचि रवी केवीं । पाही उपदेशु केला ॥४०॥

श्रीभगवानुवाच—

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥**

परंतप अर्जुन, मे तव च बहूनि जन्मानि व्यतीतानि; तानि सर्वाणि अहं वेद, त्वं न वेत्थ. ॥५॥

तंव श्रीकृष्ण म्हणे पंडुसुता । तो विवस्वतु जैं होता । तैं आम्ही नसों ऐसी चित्ता । भ्रांति जरी तुज ॥४१॥ तरी तूं गा हें नेणसी । पैं जन्में आम्हा तुम्हासी । बहुतें गेलीं परी न स्मरसी । आपुलीं तूं ॥४२॥ मी जेणें जेणें अवसरें । जें जें होऊनि अवतरें । तें समस्तही स्मरें । धनुर्धरा ॥४३॥

**अजोऽपिसन्नव्ययात्माभूतानामीश्वरोऽपिसन् ।**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥**

( अहं ) अजः अव्ययात्मा अपि सन् भूतानां ईश्वरः अपि सन् स्वां प्रकृतिं अधिष्ठाय आत्ममायया संभवामि. ॥६॥

म्हणोनि हें आघवें । मागील मज आठवे । मी अजुही परि संभवें । प्रकृतियोगें ॥४४॥ माझें अव्ययत्व तरी न नसे । परी होणें जाणें एक दिसे । तें प्रतिबिंबे मायावशें । माझ्याचि ठायीं ॥४५॥

विसर पडला. २० आस्तिक्यबुद्धि आडमार्गानें गेल्यामुळें विषयसुख म्हणजेच इतिकर्तव्यता असें लोकांना वाटून, ते जीवाप्रमाणेंच विषयरूप उपाधीवर प्रेम करूं लागले! २१ असें पहा—ओसाड गांवांत उंची वस्त्रांची वाड काय असणार? किंवा जन्मांधाला सूर्याचा काय उपयोग सांग बरें? २२ किंवा बहिऱ्यांच्या सभेंत गाण्याला कोण मान देईल? अथवा कोल्ह्याला चांदण्यापासून कसा आनंद होईल? २३ तसेंच, चंद्रोदयापूर्वी ज्यांचें डोळे फुटतात—मिटतात—ते कावळे चंद्रास कसे ओळखतील? २४ त्याचप्रमाणें, ज्यांनीं वैराग्याची शीवसुद्धां पाहिली नाहीं, आणि ज्यांना विचाराचें नांव देखील माहीत नाहीं, त्या मूर्खांना मज परमेश्वराचा लाभ कसा होईल? २५ हा मोह इतका कसा वाढला कोण जाणे; पण त्यामुळें बहुतेक काळ व्यर्थ गेला; आणि म्हणून ह्या लोकीं हा योग बुडाला. २६

**तोच हा पुरातन योग मीं तुला आज सांगितला; तूं माझा भक्त व सखा आहेस, म्हणूनच हें उत्कृष्ट रहस्य मीं तुला कथन केलें. ॥ ३ ॥**

हे कुंतीसुता, खरोखर तोच हा योग तुला आज आम्हीं सांगितला आहे. तूं कांहींसुद्धां शंका धरूं नको. २७ हा योग म्हणजे माझा जीव कीं प्राण आहे; परंतु तुजपासून तो चोरून कसा ठेवावा? कारण, तूं माझा फार आवडता भक्त आहेस. २८ धनुर्धरा, तूं केवळ प्रेमाची मूर्ति असून, भक्तींचा जिव्हाळा, जिवलग मित्रत्वाचें तर केवळ जीवन. २९ आणि माझ्या ऐक्यभावाचें ठिकाण तूं आहेस, म्हणून आपण जरी युद्धास सिद्ध झालों आहों तरी हा योग तुझ्याशीं चोरून कसा ठेवावा; ३० कारण, युद्धाची गडबड असली तरी ती क्षणभर एके बाजूस ठेऊन त्यास न जुमानतां प्रथम तुझें अज्ञान आम्हांस दूर केलें पाहिजे. ३१

**अर्जुन म्हणालाः—कृष्णा, तुमचा जन्म अलीकडचा, आणि सूर्य तर प्राचीन काळचा; तेव्हां तुम्हीं त्याला प्रथम योग सांगितला, हें मीं कसें समजावें? ॥ ४ ॥**

त्या वेळेस अर्जुन म्हणतो, "हे कृपानिधे, श्रीहरि! आईनें आपल्या लेंकरावर प्रेम केलें तर त्यांत आश्चर्य तें कोणतें? ३२ तूं संसारांत थकलेल्यांची सावली व दीन जनांची माऊली आहेस; आणि जणूं काय आमचा जन्म तुमचेच कृपेपासून झाला आहे. ३३ देवा, आईला पांगळें मूल झालें, तर त्याच्या जन्मापासून तिला त्रास सोसावा लागतो, हें सर्व तुम्ही जाणतां; तर आम्ही तुमच्या पुढें तुमचें महत्त्व काय बोलावें? ३४ आतां मी जें कांहीं विचारणार आहें, त्याकडे चांगलें लक्ष द्यावें; व त्या गोष्टीचा राग मनांत आणूं नये. ३५ हे अनंता, तुम्हीं जी मागील गोष्ट म्हणून सांगितली, (सूर्याला हा कर्मयोग मीं सांगितला त्याची) ती माझ्या मनाला रुचत नाहीं. ३६ सूर्य म्हणजे कोण हें आमच्या वाडवडिलांनासुद्धां माहीत नाहीं. तर त्याला आपण कधीं व कसा उपदेश केला? ३७ तो सूर्य तर फार जुनाट आहे असें ऐकतों, आणि आपण तर श्रीकृष्णा, हल्लींचे; म्हणून ह्या गोष्टींत आम्हांला विरोध दिसतो. ३८ तशांतून, देवा, तुमचें चरित्र अगाध! आम्हांस कांहीं कळत नाहीं; तेव्हां, आपण म्हणतां तें खोटें आहे असें तरी आम्हीं एकदम कसें म्हणावें? ३९ तेव्हां मीं सूर्याला उपदेश केला, हें जें आपण म्हणतां, तें मला समजेल अशा रीतीनें स्पष्ट सांगा." ४०

**श्रीभगवान् म्हणालेः—हे शत्रुतापना अर्जुना, माझे व तुझे बहुत जन्म होऊन गेले; त्या सर्वांचें स्मरण मला आहे, तुला [ मात्र ] नाहीं! ॥५॥**

तेव्हां श्रीकृष्ण म्हणालेः अर्जुना, ज्या वेळेस तो सूर्य होता, त्या वेळेस आम्ही नव्हतों अशी जरी तुझ्या मनांत शंका आली, ४१ तरी तुला हें माहीत नाहीं, कीं तुझे व माझे जन्म पुष्कळ झाले, परंतु तुझ्या जन्मांची तुला आठवण नाहीं. ४२ अर्जुना, मीं ज्या ज्या वेळेस जे जे अवतार घेतले, त्या सर्व अवतारांचें मला स्मरण आहे. ४३

**मी जन्मनाशरहित व सर्व भूतांचा नियंता असूनही, स्वकीय प्रकृतीचा स्वीकार करून आपल्या मायेनें जन्म घेतों. ॥ ६ ॥**

म्हणून, मला मागील सर्व गोष्टींचें स्मरण आहे. मी जन्मरहित असूनही मायेचे योगानें अवतार घेतों; ४४ माझें अव्ययत्व नाहींसें होत नाहीं; पण अवतार घेणें व तो संपविणें हें जें भासतें, तें मायेच्या योगानें माझ्या ठिकाणींच भासतें. ४५ माझ्या स्वातंत्र्याचा तर भंग होत

माझी स्वतंत्रता तरी न मोडे । परी कर्माधीनु ऐसा आवडे । तेही भ्रांतिबुद्धि तरी घडे । एऱ्हवीं नाहीं ॥४६॥ कीं एकचि दिसे दुसरें । तें दर्पणाचेनि आधारें । एऱ्हवीं काय वस्तुविचारें । दुजें आहे ॥४७॥ तैसा अमूर्तचि मी किरीटी । परी प्रकृति जैं अधिष्ठीं । तैं साकारपणें नटनटीं । कार्यालागीं ॥४८॥

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥७॥**

भारत, यदा यदा हि धर्मस्य ग्लानिः भवति अधर्मस्य (च) अभ्युत्थानं (भवति), तदा अहं आत्मानं सृजामि. ॥७॥

जें धर्मजात आघवें । युगायुगीं म्यां रक्षावें । ऐसा ओघु हा स्वभावें । आद्यु असे ॥४९॥ म्हणोनि अजत्व परतें ठेवीं । मी अव्यक्तपणही नाठवीं । जे वेळीं धर्मातें अभिभवी । अधर्मु हा ५०

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥**

साधूनां परित्राणाय, दुष्कृतां विनाशाय, धर्मसंस्थापनार्थाय च अहं युगे युगे संभवामि. ॥८॥

ते वेळीं आपुल्याचेनि कैवारें । मी साकारु होऊनि अवतरें । मग अज्ञानाचे आंधारें । गिळूनि घालीं ॥५१॥ अधर्माची अवधी तोडीं । दोषांचीं लिहिलीं फाडीं । सज्जनांकरवीं गुढी । सुखाची उभवीं ॥५२॥ दैत्यांचीं कुळें नाशीं । साधूंचा मानु गिंवशीं । धर्मासीं नीतीशीं । शेंज भरीं ॥५३॥ मी अविवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीप उजळीं । तैं योगियां पाहे दिवाळी । निरंतर ॥५४॥ सत्सुखें विश्व कोंदे । धर्मचि जगीं नांदे । भक्तां निघती दोंदें । सात्त्विकाचीं ॥५५॥ तैं पापांचा अचळु फिटे । पुण्याची पहांट फुटे । जैं मूर्ति माझी प्रगटे । पंडुकुमरा ॥ ५६ ॥ ऐसेया काजालागीं । अवतरें मी युगींयुगीं । परी हेंचि वोळखे जो जगीं । तो विवेकिया ॥५७॥

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥९॥**

अर्जुन, यः तत्त्वतः मे दिव्यं जन्म कर्म च एवं वेत्ति, सः देहं त्यक्त्वा पुनर्जन्म न एति ( किंतु ) मां एति. ॥९॥

माझें अजत्वें जन्मणें । अक्रियताचि कर्म करणें । हें अविकार जो जाणे । तो परममुक्त ॥५८॥ तो चालिला संगें न चले । देहींचा देहा नाकळे । मग पंचत्वीं तंव मिळे । माझ्याचि रूपीं ॥५९॥

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥**

वीतरागभयक्रोधाः मन्मयाः माम् उपाश्रिताः बहवः ज्ञानतपसा पूताः ( सन्तः ) मद्भावं आगताः. ॥१०॥

एऱ्हवीं परापर न शोचिती । जे कामनाशून्य होती । वाटा कें वेळीं न वचती । क्रोधाचिया ॥६०॥ सदा मियांचि आथिले । माझिया सेवा जियाले । कीं आत्मबोधें तोषले । वीतराग जे ॥६१॥ जे तपोतेजाचिया राशी । कीं एकायतन ज्ञानासी । जे पवित्रता तीर्थांसी । तीर्थरूप ॥६२॥ ते मद्भावा सहजें आले । मी तोचि ते होऊनि ठेले । जे मज तयां उरले । पदर नाहीं ॥६३॥ सांगें पितळेची गंधिकाळिक । जैं फिटली होय निःशेख । तैं सुवर्ण काई आणिक । जोडूं जाइजे ॥६४॥ तैसे यमनियमीं कडसले । जे तपोज्ञानें चोखाळले । मी तेचि ते जाहले । एथ संशयो कायसा ॥६५॥

**ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ।**
**मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥**

ये यथा मां प्रपद्यंते, तान् तथा एव अहं भजामि. पार्थ, मनुष्याः सर्वशः मम वर्त्म अनुवर्तंते. ॥११॥

एऱ्हवीं तरी पाहीं । जे जैसे माझ्या ठायीं । भजती तयां मीही । तैसाचि भजें ॥६६॥ देखें मनुष्यजात सकळ । हें स्वभावता भजनशीळ । जाहलें असे केवळ । माझ्याचि ठायीं ॥६७॥ परी ज्ञानेंवीण नाशिले । जे बुद्धिभेदासी आले । तेणेंचि

नाहींच; पण मी कर्माधीन आहें असें जें लोकांस वाटतें, तें भ्रांतीमुळें वाटतें; बाकी खरोखर पाहतां तसें कांहीं नाहीं. ४६ किंवा एकच वस्तु आरशाच्या योगानें दोन ठिकाणीं दिसते, पण वस्तुस्थितीचा विचार केला तर त्या दोन का आहेत? ४७ त्याचप्रमाणें, अर्जुना, मी तर निराकारच आहे. पण जगत्कार्यासाठीं मायेचा स्वीकार करून नटाप्रमाणें बाह्यतः आकार धारण करितों. ४८

**अर्जुना, जेव्हां जेव्हां धर्म क्षीण होतो, आणि अधर्म वाढतो, तेव्हां तेव्हां मी अवतार घेतों. ॥ ७ ॥**

धर्म म्हणून जेवढे आहेत, त्यांचें म्यां युगायुगांचे ठायीं रक्षण करावें असा हा क्रम अगदीं मुळापासून चालत आलेला आहे, ४९ म्हणून, ज्या ज्या वेळीं अधर्मानें धर्माचा ऱ्हास होतो, त्या त्या वेळीं मी आपला जन्मरहितपणा बाजूला ठेवतों, व निराकारपणाची आठवणही धरीत नाहीं. ५०

**साधूंचें रक्षण करण्याकरितां, दुष्टांचा समूळ नाश करण्याकरितां, व धर्म स्थापन करण्याकरितां मी युगायुगांच्या ठिकाणीं अवतीर्ण होतों. ॥ ८ ॥**

त्या वेळीं भक्तांच्या कैवारानें मी देह धारण करून अवतार घेतों, आणि मग अज्ञानरूप अंधेरास गिळून टाकतों. ५१ अधर्माची मर्यादा तोडतों, दोषांनीं केलेल्या सनदा फाडून टाकतों, आणि जे साधु आहेत त्यांजकडून सुखाचे ध्वज उभारवितों. ५२ दैत्यकुलांचा नाश करतों, साधूंना योग्य मान देववितों, आणि धर्म व नीति ह्यांची ओटी भरतों (गांठ घालतों.) ५३ अविचाररूप काजळी काढून विचाररूप दिवा प्रज्वलित करतों, त्या वेळीं योगी लोकांना निरंतर आनंदाची दिवाळीच भासते. ५४ मग सत्सुखानें सर्व विश्व भरून जातें, जिकडे तिकडे लोक धर्माचें आचरण करितात, आणि भक्तजन सत्त्वगुणानें परिपूर्ण होतात. ५५ अर्जुना, ज्या वेळीं माझा अवतार प्रकट होतो, त्या वेळीं पापांचे पर्वत नाहींतसे होतात, व पुण्याचा उदय होतो. ५६ अशा कामाकरितां मी युगायुगांचे ठायीं अवतार धारण करितों, परंतु असें जो ओळखतो तोच जगांत विचारवान् होय. ५७

**अर्जुना, अशा प्रकारें, माझें जन्म व कर्म दिव्य आहे असें जो यथार्थ जाणतो, तो देहत्यागानंतर पुनः जन्मास येत नाहीं; तर मजप्रत प्राप्त होतो. ॥ ९ ॥**

माझें अजत्व कायम असून जन्म घेणें, व अकर्तृत्व कायम असून कर्म करणें असें जें माझें अविकार स्वरूप, तें जो निःशंक जाणतो, तोच परममुक्त होय. ५८ असें जाणणारा देहाच्या संबंधानें जरी चालतोसा दिसला, तरी तो चालत नाहीं; आणि त्यानें देह धारण केला, तरी तो देहभावानें आकळिला जात नाहीं. मग मेल्यावर माझ्या स्वरूपांत येऊन मिळतो. ५९

**ज्यांचे काम, भय व क्रोध हे दोष गेले, व जे मद्रूप होऊन माझाच आश्रय करून राहिले, असे, ज्ञानरूप तपानें पवित्र झालेले पुष्कळ ज्ञानी माझ्या स्वरूपाला पावले. ॥ १० ॥**

एरव्हीं, मागील व पुढील गोष्टींचा जे शोक करीत नाहींत, आणि जे वासनारहित असतात, ते कोणत्याही वेळेस क्रोधाच्या मार्गाला जात नाहींत. ६० जे विषयप्रीतिरहित आहेत, जे नेहमीं माझ्या स्वरूपाच्या प्राप्तीमुळें आपल्यास धन्य मानतात, आणि माझ्याच सेवेमुळें जे वांचले आहेत, किंवा जे ज्ञानाच्या बोधानें संतोष पावतात, ६१ जे तपाच्या तेजाचे राशी किंवा ज्ञानाचें घरच अथवा जे तीर्थालाही पवित्र करणारे तीर्थरूप आहेत. ६२ ते माझ्या स्वरूपास सहज येऊन मिळतात, आणि मद्रूपच होतात;-त्यांच्यांत व माझ्यांत भिन्नभाव नसतो. ६३ सांग कीं, पितळेचा कळकटपणा व रंग अजिबात नाहींसा झाला तर मग सोनें संपादन करायला दुसरीकडे गेलें पाहिजे काय? तेंच सोनें. ६४ त्याचप्रमाणें, जे यमनियमादि अष्टांग योगांत पारंगत होऊन तपानें व ज्ञानानें शुद्ध झाले आहेत, ते मद्रूप झाले ह्याविषयीं संशय कशाला पाहिजे! ६५

**जे ज्या भावनेनें माझें भजन करितात, त्यांच्या इच्छा त्या भावनेनेंच मी पूर्ण करितों. अर्जुना, सर्व लोक सर्व प्रकारें माझ्या मार्गानें चालणारे आहेत. ॥ ११ ॥**

सहज पाहिलें तर जे ज्या ज्या भावानें मला भजतात, त्या त्या भावानें मीही त्यांना तसाच भजतों. ६६ हें पहा: मनुष्यमात्राची स्वभावतःच माझें भजन करण्याकडे प्रवृत्ति आहे. ६७ परंतु ज्ञानाच्या अभावानें म्हणजे

त्या कल्पिलें । अनेकत्व ॥६८॥ म्हणऊनि अभेदीं भेदु देखती । यया अनाम्या नामें ठेविती । देवी देवो म्हणती । अचर्चातें ॥६९॥ जें सर्वत्र सदा सम । तेथ विभाग अधमोत्तम । मतिवशें संभ्रम । विवंचिती ॥७०॥

**कांक्षंतः कर्मणां सिद्धिं यजंत इह देवताः ।**
**क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥१२॥**

कर्मणां सिद्धिं कांक्षंतः इह देवताः यजन्ते; मानुषे हि लोके कर्मजा सिद्धिः क्षिप्रं भवति. ॥१२॥

मग नानाहेतुप्रकारें । यथोचितें उपचारें । मानिलीं देवतांतरें । उपासिती ॥७१॥ तेथ जें जें अपेक्षित । तें तैसेंचि पावती समस्त । परी तें कर्मफळ निश्चित । वोळख तूं ॥७२॥ वांचूनि देतें घेतें आणिक । निभ्रांत नाहीं सम्यक । एथ कर्मचि फळसूचक । मनुष्यलोकीं ॥७३॥ जैसें क्षेत्रीं जें पेरिजे । तेंवांचूनि आन न निपजे । कां पाहिजे तेंचि देखिजे । दर्पणाधारें ॥७४॥ नातरी कडेयातळवटीं । जैसा आपुलाची बोलु किरीटी । पडिसादु होऊनि उठी । निमित्तयोगें ॥७५॥ तैसा समस्तां यां भजना । मी साक्षिभूतु पैं अर्जुना । एथ प्रतिफळे भावना । आपुलाली ॥७६॥

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।**
**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥१३॥**

मया गुणकर्मविभागशः चातुर्वर्ण्यं सृष्टं; तस्य कर्तारं अपि मां अकर्तारं अव्ययं विद्धि. ॥१३॥

आतां याचिपरि जाण । चाऱ्ही हे वर्ण । सृजिले म्यां गुण- । कर्मविभागें ॥७७॥ जे प्रकृतीचेनि आधारें । गुणाचेनि व्यभिचारें । कर्में तदनुसारें । विवंचिलीं ॥७८॥ एथ एकचि हे धनुष्यपाणी । परी जाहले गा चहूं वर्णीं । ऐसी गुणकर्मकडसणी । केली सहजें ॥७९॥ म्हणोनि आइकें पार्था । हे वर्णभेदसंस्था । मी कर्ता नव्हें सर्वथा । याचिलागीं ॥८०॥

**न मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा ।**
**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥१४॥**

मां कर्माणि न लिंपन्ति, मे कर्मफले स्पृहा न, इति यः मां अभिजानाति, सः कर्मभिः न बध्यते. ॥१४॥

हें मजचिस्तव जाहलें । परी म्यां नाहीं केलें । ऐसें जेणें जाणितलें । तो सुटला गा ॥८१॥

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।**
**कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥**

एवं ज्ञात्वा, पूर्वैः मुमुक्षुभिः अपि पूर्वैः पूर्वतरं कृतं कर्म कृतं; तस्मात् त्वं कर्म एव कुरु. ॥१५॥

मागील मुमुक्षु जे होते । तिहीं ऐसिया जाणोनि मातें । कर्में केलीं समस्तें । धनुर्धरा ॥८२॥ परि तें बीजें जैसीं दग्धलीं । नुगवतीचि पेरिलीं । तैसीं कर्मेंचि परि तयां जाहलीं । मोक्षहेतु ॥८३॥ एथ आणिकही एक अर्जुना । हे कर्माकर्मविवंचना । आपुलिये चाडें सज्ञाना । योग्यु नोहे ॥८४॥

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।**
**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् १६**

किं कर्म किं अकर्म इति अत्र कवयः अपि मोहिताः, तत् कर्म ते प्रवक्ष्यामि, यत् ज्ञात्वा अशुभात् मोक्ष्यसे. ॥१६॥

कर्म म्हणिपे तें कवण । अथवा अकर्मा काय लक्षण । ऐसें विचारितां विचक्षण । गुंफोनि ठेले ॥८५॥ जैसें कां कुडें नाणें । खऱ्याचेनि सारखेपणें । डोळ्याचेंहि देखणें । संशयीं घाली ॥८६॥ तैसें नैष्कर्म्यतेचेनि भ्रमें । गिंवसिजत आहाती कर्में । जे दुजी सृष्टि मनोधर्में । करूं सकती ८७. वांचूनि मूर्खांची गोठी कायसी । एथ मोहले गा क्रांतदर्शी । म्हणोनि आतां तेंचि परियेसीं । सांगेन तुज ॥८८॥

**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।**
**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥**

कर्मणः ( तत्त्वं ) हि बोद्धव्यं, विकर्मणः अपि ( तत्त्वं ) च बोद्धव्यं, अकर्मणः (तत्त्वं) च बोद्धव्यं; कर्मणः गतिः गहना ( अस्ति ). ॥१७॥

आपण परमात्मरूपच आहोंत हें न समजल्यामुळे बुद्धीचे ठिकाणीं भेद उत्पन्न होऊन, मी जो एक आहे, त्या माझे ठिकाणीं ते अनेकत्व कल्पितात, ६८ म्हणून सर्व भूतमात्रांशीं अभिन्न असतां माझ्या ठिकाणीं भेद कल्पितात, मी नामरहित असून मला अनेक नावें देतात, आणि मी शब्दातीत असून मला कोणी देव, कोणी देवी असें म्हणतात. ६९ आपआपल्या बुद्धीप्रमाणें जो मी नेहमीं सर्व ठिकाणीं सारखा आहें, त्या माझ्या ठिकाणीं ते भ्रांतीनें ' वाईट, चांगला ' असा भेद मानतात. ७०

**कर्मांच्या फलाच्या प्राप्तीची इच्छा धरणारे पुरुष ह्या लोकीं देवतांचें यजन करितात. कारण, ह्या मनुष्यलोकीं कर्मापासून फलाची सिद्धि त्वरित होते. ॥ १२ ॥**

मग मनात नाना हेतु धारण करून, जे ज्यास आवडतात त्या उपचारांनीं अनेक देव मानून त्यांची उपासना करतात. ७१ अशा प्रकारें, ज्यांचें जे इच्छित असतें, तें त्यांना तसेंच प्राप्त होतें; परंतु हें त्यांच्या कर्माचें फळ आहे असें निश्चयानें तूं समज. ७२ खरोखर पाहतां, देणारा किंवा घेणारा कर्मांशिवाय निःसंशय दुसरा कोणी नसून ह्या मनुष्यलोकीं कर्मापासूनच फलप्राप्ति होते. ७३ जसें जमिनींत जें धान्य पेरावें त्यावांचून दुसरें उत्पन्न व्हावयाचें नाहीं, किंवा आरशांत जें पहावें तेंच दृष्टीस पडतें, ७४ किंवा, अर्जुना, डोंगराच्या कड्याखालीं ज्याप्रमाणें आपलाच शब्द आपण बोलल्यानें प्रतिध्वनि येऊन उठतो, ७५ त्याचप्रमाणें, अर्जुना, प्रत्येक उपासनेला मीच आधारभूत आहे, म्हणून प्रत्येकास त्याचे भावनेप्रमाणें फलप्राप्ति होते. ७६

**गुणकर्मांच्या विभागानुसार [ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे ] चार वर्ण मीं उत्पन्न केले; [ आणि म्हणून ] ह्या वर्णांचा मी कर्ता असें दिसलें; तरी मी अकर्ता व अविकारी आहें, असें जाण. ॥ १३ ॥**

आतां ह्याचप्रमाणें तूं हेंही लक्षांत ठेव कीं, हे जे चार वर्ण आहेत; तेही गुण व कर्म यांच्या विभागानें मीच उत्पन्न केले आहेत; ७७ आणि त्या चारही वर्णांच्या कर्मांची आपआपल्या प्रकृतिधर्मानें आणि गुणांच्या तारतम्यानें व्यवस्था केली आहे. ७८ अर्जुना, हे सर्व लोक एकच असून, गुण व कर्म ह्यांच्या योगानें त्यांच्या चार वर्णांची व्यवस्था सहज झाली ७९ गुणकर्मानुरूपच वर्णभेदाची व्यवस्था झाली आहे, म्हणून, पार्था, या वर्णभेदाच्या स्थापनेचा मी मुळींच कर्ता नाहीं. ८०

**कर्में मला बद्ध करीत नाहींत. आणि कर्मफलाविषयीं मला आसक्तिही नाहीं. मी असा आहें असें जो जाणतो, त्यालाही कर्में बद्ध करीत नाहींत. ॥१४॥**

वरील ओव्यांच्या अर्थावरून अनिश्वरवाद प्राप्त होईल, म्हणून पुढच्या ओवींत त्याचें खंडण करितातः—

हा वर्णभेद जरी माझ्यापासून झाला आहे म्हणजे माझ्या सत्तेनें झाला आहे; तरी तो मीं केला नाहीं असें जो जाणतो तोच कर्मातीत झाला. ८१

**[ मी कर्म करून अकर्ता आहें ] असें माझ्याविषयीं जाणून पूर्वीच्या मुमुक्षूंनीं देखील त्यांच्या पूर्वीच्या मुमुक्षूंनीं पूर्वीच्या काळीं जशीं कर्में केलीं होतीं तशीं कर्में केलीं; म्हणून तूंही तसें कर्मच कर. ॥१५॥**

अर्जुना, पूर्वीचे जे मुमुक्षु झाले, त्यांनीं अशा प्रकारेंच मला जाणून सर्व कर्में केलीं, ८२ परंतु ज्याप्रमाणें भाजलेलें बीं पेरलें असतां मुळींच उगवत नाहीं, त्याप्रमाणें त्यांचीं निष्काम कर्मेंच त्यांना मोक्षप्राप्तीस कारणीभूत झालीं, ८३ आणि अर्जुना, त्यांत आणखी एक गोष्ट अशी आहे कीं, हें कर्म आहे कीं अकर्म आहे ह्याचा विचार आपल्याच मतानें ठरविणें बुद्धिमानाससुद्धां कठीण आहे ८४

**कर्म म्हणजे काय, व अकर्म म्हणजे काय, हें जाणण्याविषयीं मोठे दूरदर्शी देखील मोहांत पडले आहेत! असें जें कर्म, तें मी तुला सांगतों. तें जाणलें असतां तूं संसारदुःखापासून मुक्त होशील. ॥१६॥**

कर्म म्हणतात तें कोणतें, व अकर्माचें लक्षण काय हा विचार करतां करतां शहाणे देखील घोटाळ्यांत पडले. ८५ जसें खोटें नाणें खऱ्यासारखें हुबेहूब दिसल्यानें सराफाच्याही डोळ्यांस संशयात घालतें, ८६ तसें, संकल्पमात्रेंकरून प्रतिसृष्टि निर्माण करण्याचें सामर्थ्य ज्यांना आहे ते ज्याला भ्रमानें नैष्कर्म्य असें समजतात तें वास्तविक कर्म असून ते कर्माचे पाशांत सांपडतात ८७ कर्माकर्म विचारामध्यें मोठमोठ्या सर्वज्ञांची त्रेधा उडते मग मूर्खांची—अज्ञान्यांची गोष्ट कशाला पाहिजे? म्हणून, तीच गोष्ट सांगतों ती ऐक. ८८

**कर्माचें, विकर्माचें व अकर्माचें तत्त्व यथार्थ जाणलेंच पाहिजे. कारण, त्या कर्मादिकांचें यथार्थ तत्त्व समजण्यास फार कठीण आहे.॥१७॥**

तरी कर्म म्हणजे स्वभावें। जेणें विश्वाकारु संभवे। तें सम्यक आधीं जाणावें। लागे एथ ८९ मग वर्णाश्रमासि उचित। जें विशेष कर्मविहित। तेंही वोळखावें निश्चित। उपयोगेंसीं ॥९०॥ पाठीं जें निषिद्ध म्हणिपे। तेंही बुझावें स्वरूपें। येतुलेनि कांहीं न गुंफे। आपैसेंचि ॥९१॥ एऱ्हवीं जग हें कर्माधीन। ऐसी याची व्याप्ती गहन। परी तें असो आइकें चिन्ह। प्राप्ताचें गा ॥९२॥

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः।**
**स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् १८**

यः कर्मणि अकर्म पश्येत्, अकर्मणि च यः कर्म पश्येत्, सः मनुष्येषु बुद्धिमान्, सः युक्तः, (सः) कृत्स्नकर्मकृत् (अस्ति). १८

जो सकळकर्मीं वर्ततां। देखे आपुली नैष्कर्म्यता। कर्मसंगें निराशता। फळाचिया ॥९३॥ आणि कर्तव्यतेलागीं। जया दुसरें नाहीं जगीं। ऐसिया नैष्कर्म्यता तरी चांगी। बोधला असे ९४ तरी क्रियाकलापु आघवा। आचरतु दिसे बरवा। तोचि तो ये चिन्हीं जाणावा। ज्ञानिया गा ॥९५॥ जैसा कां जळापाशीं उभा ठाके। तो जरी आपणपें जळामाजिं देखे। तरी तो निभ्रांत वोळखे। म्हणे मी वेगळा आहें ॥९६॥ अथवा नावे ह्न जो रिगे। तो थडियेचे रुख जातां देखे वेगें। तेचि साचोकारें जों पाहों लागे। तंव रुख म्हणे अचळ ॥९७॥ तैसें सर्व कर्मीं असणें। तें फुडें मानूनि वायाणें। मग आपणया जो जाणे। नैष्कर्म्यु ऐसा ॥९८॥ आणि उदोअस्ताचेनि प्रमाणें। जैसें न चलतां सूर्याचें चालणें। तैसें नैष्कर्म्यत्व जाणे। कर्मींचि असतां ॥९९॥ तो मनुष्यासारिखा तरी आवडे। परी मनुष्यत्व तया न घडे। जैसें जळामाजीं न बुडे। भानुबिंब ॥१००॥ तेणें न पाहतां विश्व देखिलें। न करितां सर्व केलें। न भोगितां भोगिलें। भोग्यजात ॥१॥ एकेचि ठायीं बैसला। परि सर्वत्र तोचि गेला। हें असो विश्व जाहला। आंगेंचि तो ॥२॥

**यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥१९॥**

यस्य सर्वे समारम्भाः कामसंकल्पवर्जिताः ( सन्ति ), तं बुधाः ज्ञानाग्निदग्धकर्माणं पंडितं आहुः. ॥१९॥

जया पुरुषाच्या ठायीं। कर्माचा तरी खेदु नाहीं। परी फळापेक्षा कहीं। संचरेना ॥३॥ आणि हें कर्म मी करीन। अथवा आदरिलें सिद्धी नेईन। येणें संकल्पेंही जयाचें मन। विटाळेना ४ ज्ञानाग्नीचेनि मुखें। जेणें जाळिलीं कर्में अशेखें। तो परब्रह्मचि मनुष्यवेखें। वोळख तूं ॥५॥

**त्यक्त्वा कर्मफलासङ्गं नित्यतृप्तो निराश्रयः।**
**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ॥२०॥**

( यः ) कर्मफलसंगं त्यक्त्वा नित्यतृप्तः निराश्रयः (भवति), सः कर्मणि अभिप्रवृत्तः अपि न एव किंचित् करोति. ॥२०॥

जो शरीरीं उदासु। फळभोगीं निरासु। नित्यता उल्हासु। होऊनि असे ॥६॥ जो संतोषाचा गाभारा। आत्मबोधाचिया वोगरां। पुरे न म्हणेचि धनुर्धरा। आरोगितां ॥७॥

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः।**
**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥२१॥**
**यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः।**
**समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबद्ध्यते ॥२२॥**

निराशीः, यतचित्तात्मा, त्यक्तसर्वपरिग्रहः केवलं शारीरं कर्म कुर्वन् किल्बिषं न आप्नोति. ॥२१॥ यदृच्छालाभसंतुष्टः, द्वंद्वातीतः, विमत्सरः, सिद्धौ असिद्धौ च समः ( पुरुषः ) कृत्वा अपि न निबद्ध्यते. ॥२२॥

कैसी अधिकाधिक आवडी। घेत महासुखाची गोडी। सांडोनियां आशा कुरोंडी। अहंभावेंसीं ॥८॥ म्हणोनि अवसरें जें जें पावे। तेणेंचि तो सुखावे। आपुलें आणि परावें। दोन्ही नाहीं ॥९॥ तो दिठी जें पाहे। तें आपणचि होऊनि जाये। आइके तें आहे। तोचि जाहला ॥११०॥ चरणीं ह्न चाले। मुखें जें जें बोले। ऐसें चेष्टाजात

ईश्वराचे ठिकाणीं जीवांच्या कर्मानुसार विश्व उत्पन्न करण्याचा जो संकल्प, त्याचें नांव कर्म. त्याच यथार्थ स्वरूप समजून घेतलें पाहिजे. ८९ मग जें कर्म वर्णाश्रमास योग्य व वेदांत सांगितलेलें आहे, त्याचाही अनुष्ठान, प्रकार व फल यामुद्धां ओळख करून घेतली पाहिजे. ९० आतां ज्यांच्या ठिकाणीं सर्व कर्मांचा निषेध सांगितला आहे, असा जो परमात्मा, तो आपलें स्वरूपच आहे अशा रीतीनें यथार्थ दृढनिश्चय झाला असतां, पुरुष कर्मामध्यें सहजच गुंतणार नाहीं. ९१ अशा विचाराचा जर अभाव असला, तर सर्व जग आपल्या ताब्यांत ठेवील, अशी कर्माची व्याप्ति फार जबर आहे. परंतु, प्रस्तुत हे असो. आतां वर सांगितल्याप्रमाणें कर्माकर्मांचें यथार्थ ज्ञान प्राप्त असणाऱ्या पुरुषाचीं चिन्हें सांगतों; ऐक. ९२

जो कर्मांत अकर्म पाहतो, व अकर्मांत कर्म पाहतो, तो सर्व मनुष्यांत बुद्धिमान्, योगी व सर्व कर्में करणारा होय. ॥१८॥

फळाची आशा न धरितां जो कर्माचें आचरण करितो, पण ते कर्म आपण करितों असें मानीत नाहीं. ९३ आणि त्याला अशा प्रकारें कर्मातीतपणा इतका चांगला समजला असतो कीं, त्याला आत्मस्वरूपाशिवाय जगांत दुसरें कांहीं उरलें नाहीं म्हणून कर्तव्य नाहींसें झालें. ९४ तथापि लोकदृष्टया तो सगळीं कर्में नीट रीतीनें आचरील आहे असें दिसलें तरी वरच्या लक्षणानें युक्त तोच ज्ञानी आहे. ९५ ज्याप्रमाणें एकादा मनुष्य नदीच्या कांठीं उभा राहिल्यावर आपलें प्रतिबिंब पाण्यांत पाहत असला तरी 'पाण्यापासून मी वेगळा आहें' असें तो निःसंशय समजतो, ९६ अथवा नावेंत बसून जाणाऱ्या मनुष्यास नदीच्या कांठावरील झाडें धांवतात असें दिसतें, परंतु तोच खरें पाहूं लागला म्हणजे त्याला तीं झाडें अचल आहेत असें समजतें. ९७ त्याप्रमाणें, सर्व कर्में करीत असतां, आपल्या ठिकाणीं कर्म प्रतितीला येतें तें अगदीं खोटें असून कर्मरहित जो परमात्मा तोच आपलें स्वरूप आहे असें जो जाणतो. ९८ आणि सूर्य उगवतो व मावळतो एवढ्याच प्रमाणावरून तो चालतो असें आपल्यास दिसतें तसें कर्म आचरीत असतां तें आपण करीत नाहीं असें जो जाणतो, ९९ तो मनुष्यासारखा जरी दिसतो, तरी तो मनुष्य नसून परब्रह्मच आहे असें समजावें. ज्याप्रमाणें सूर्याचें प्रतिबिंब पाण्यांत पडलें तरी सूर्य त्यांत नसतो, १०० असा जो पुरुष त्यानें कांहीं पाहिलें नाहीं, तरी सर्व विश्व पाहिलें, कांहीं केलें नाहीं, तरी सर्व केलें, कांहीं भोगिलें नाहीं, तरी यच्चयावत् भोग भोगिले. १ तो एकाच ठिकाणीं जरी बसला, तरी सर्वत्र गमन त्यानेंच केलें. हें असो, फार काय सांगावें, सर्व विश्वरूप तो बनला आहे, २

ज्याच्या सर्व कर्मांचे आरंभ फलाची इच्छा व कर्तेपणाचा अभिमान यांविरहित असतात, त्याला ज्ञानी जन 'ज्ञानाग्नीनें सर्व कर्में दग्ध झालेला पंडित' असें म्हणतात. ॥१९॥

ज्या पुरुषाला कर्माचरणाविषयीं खेद होत नाहीं, परंतु कर्मफलाची इच्छा ज्याचे मनांत मुळींच उद्भवत नाहीं, ३ आणि अमुक एक कर्म मी करीन अथवा अमुक कर्म सुरू केलेलें शेवटास नेईन, असा संकल्प देखील ज्याचे मनास स्पर्श करीत नाहीं, ४ कां ? तर-ज्ञानरूप अग्नीचे मुखांत ज्यानें आपलीं सर्व कर्में जाळून टाकलीं आहेत, असा तो पुरुष म्हणजे मनुष्यरूपानें परब्रह्मच अवतरला आहे असें समज. ५

जो कर्माचे फलाची इच्छा सोडून देतो, आणि [आत्मानंदांत] नित्य तृप्त राहून कशाचाही आश्रय करीत नाहीं, तो सर्व कर्में करीत असला तरी वस्तुतः कांहींच करीत नाहीं. ॥२०॥

जो शरीराविषयीं उदासीन असतो, आणि कर्मापासून होणाऱ्या फलप्राप्तीविषयीं निरिच्छ असतो, व जो नेहमीं आनंदस्वरूपांत निमग्न असतो, ६ पार्था, जो संतोषाच्या गाभाऱ्यामध्यें बसून आत्मबोधाचें पक्वान्न जेवीत असतां तो पुरे म्हणत नाहीं, ७

ज्यानें आशा सोडली आहे, आपलें चित्त व बुद्धि हीं स्वाधीन ठेवलीं आहेत, आणि [अशा प्रकारें निरिच्छ होऊन] सर्व संग्रह सोडला आहे, त्यानें शरीरनिर्वाहापुरतीं [भिक्षाटनादिक] कर्में केलीं तरी त्याला कर्माचा दोष लागत नाहीं. [संसार प्राप्त होत नाहीं.]॥२१॥ सहजगत्या मिळेल त्यांत संतुष्ट असणारा, [मी व माझें या] द्वंद्वाच्या पलीकडे गेलेला, मत्सररहित, आणि कर्म पूर्ण किंवा अपूर्ण झालें असतां हर्ष किंवा खेद न मानणारा असा पुरुष संपूर्ण कर्में करीत असतांही कर्मबंधानें लिप्त होत नाहीं. २२

जो अहंकारासुद्धां आशेची ओंवाळणी करून अधिकाधिक प्रेमानें ब्रह्मसुखाची गोडी घेतो, ८ म्हणून ज्या ज्या वेळेस जें जें मिळेल त्यांतच तो सुख मानतो, आणि ज्याला आपलें आणि दुसऱ्याचें असा भेद नाहीं, ९ तो आपल्या दृष्टीनें जें जें पाहतो व ऐकतो, तें तो आपणच होतो. ११० पायानें चालतो, तोंडानें बोलतो, व त्याचप्रमाणें

तिजुलें । आपणचि जो ॥११॥ हें असो विश्व पाहीं । जयासि आपणपेंवांचूनि नाहीं । आतां कवण तें कर्म कायी । बाधी तयातें ॥१२॥ हा मत्सरु जेथ उपजे । तेनुलें नुरेचि जया दुजें । तो निर्मत्सरु काइ म्हणिजे । बोलवरी ॥१३॥ म्हणोनि सर्वांपरी मुक्तु । तो सकर्मुचि कर्मरहितु । सगुण परि गुणातीतु । एथ भ्रांति नाहीं ॥१४॥

**गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।**
**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥**

गतसंगस्य, मुक्तस्य, ज्ञानावस्थितचेतसः, यज्ञाय कर्म आचरतः ( तत् ) समग्रं प्रविलीयते. ॥२३॥

तो देहसंगें तरी असे । परि चैतन्यासरिखा दिसे । पाहतां परब्रह्माचेनि कसें । चोखाळु भला ॥१५॥ ऐसाही परी कौतुकें । जरी कर्म करी यज्ञादिकें । तरी तियें लया जाती निःशेखें । तयाचाचि ठायीं ॥१६॥ अकाळींचीं अभ्रें जैशीं । उर्मीवीण आकाशीं । हरपती आपैशीं । उदयलीं सातीं ॥१७॥ तैसीं विधिविधानें विहितें । जरी आचरे तो समस्तें । तरी तियें ऐक्यभावें ऐक्यातें । पावतीचि गा ॥१८॥

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।**
**ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥**

ब्रह्म ( एव ) अर्पणं, ब्रह्म ( एव ) हविः, ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ( च ) ब्रह्मकर्मसमाधिना तेन ब्रह्म एव गंतव्यं. २४

हें हवन मी होता । कां इये यज्ञीं हा भोक्ता । ऐसिया बुद्धीसि नाहीं भिन्नता । म्हणऊनियां ॥१९॥ जे इष्टयज्ञ यजावे । तें हविर्मंत्रादि आघवें । तो देखतसे अविनाशभावें । आत्मबुद्धि ॥१२०॥ म्हणऊनि ब्रह्म तेंचि कर्म । ऐसें बोधा आलें जया सम । तया कर्तव्य तें नैष्कर्म्य । धनुर्धरा ॥२१॥ आतां अविवेक कुमारत्वा मुकले । जयां विरक्तीचें पाणिग्रहण जाहलें । मग उपासन जिहीं आणिलें । योगाग्नीचें ॥२२॥

**दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।**
**ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥**

अपरे योगिनः दैवं एव यज्ञं पर्युपासते. अपरे ब्रह्माग्नौ यज्ञं यज्ञेन एव उपजुह्वति. ॥२५॥

जे यजनशील अहर्निशीं । जिहीं अविद्या हविली मनेंसीं । गुरुवाक्यहुताशीं । हवन केलें ॥२३॥ तिहीं योगाग्निकीं यजिजे । तो दैवयज्ञु म्हणिजे । जेणें आत्मसुख कामिजे । पंडुकुमरा ॥२४॥ आतां अवधारी सांगेन आणिक । जे ब्रह्माग्नी साग्निक । तयांतें यज्ञचि यज्ञु देख । उपासिजे ॥२५॥

**श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।**
**शब्दादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥**

अन्ये श्रोत्रादीनि इंद्रियाणि संयमाग्निषु जुह्वति. अन्ये शब्दादीन् विषयान् इंद्रियाग्निषु जुह्वति. ॥२६॥

एक संयमाग्निहोत्री । ते युक्तित्रयाच्या मंत्रीं । यजन करिती पवित्रीं । इंद्रियद्रव्यीं ॥२६॥ एकां वैराग्य रवि विवळे । तंव संयती विहार केले । तेथ अपावृत्त जाहले । इंद्रियानळ ॥२७॥ तिहीं विरक्तीचि उवाळा घेतली । तंव विकारांचीं इंधनें पलिपलीं । तेथ आशाधूमें सांडिलीं । पांचही कुंडें ॥२८॥ मग वाक्यविधीचिया निरवडीं । विषय आहुती उदंडीं । हवन केलें कुंडीं । इंद्रियाग्नीच्या ॥ २९ ॥

**सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।**
**आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥**

अपरे ज्ञानदीपिते आत्मसंयमयोगाग्नौ सर्वाणि इंद्रियकर्माणि प्राणकर्माणि च जुह्वति. ॥२७॥

एकीं ययापरी पार्था । दोषु क्षाळिले सर्वथा । आणिकीं हृदयारणी मंथा । विवेकु केला ॥१३०॥ तो उपशमें निर्हाटिला । धैर्यभारें दाटिला । गुरुवाक्यें काढिला । बळकटपणें ॥३१॥ ऐसें समरसें मथन केलें । तेथ झडकरी काजा आलें । जे उज्जीवन जहालें । ज्ञानाग्नीचें ॥ ३२ ॥ पहिला

शरिरानें जितके व्यापार करतो, ते सर्व आपणच बनतो; १११ हें असो; फार काय सांगावें—जगतांत पाहिलें असतां आत्मस्वरूपावांचून ज्याला दुसरें कांहीं दिसत नाहीं, त्याला कोणत्या कर्मापासून कसली बाधा होणार ? ११२ हा मत्सर ज्या द्वैताच्या ठिकाणीं उत्पन्न होतो, तितकें सुद्धां द्वैत ज्याला दिसत नाहीं तो निर्मत्सर आहे, हें काय शब्दानें सांगितलें पाहिजे ! ११३ तो सर्व प्रकारें मुक्त आहे, तो सर्व कर्म करीत असतांही कर्मरहित आहे, तो सगुण दिसतो, पण गुणातीत असतो यांत संशय नाहीं. १४

**जो सर्वसंगविवर्जित असून धर्माधर्मांच्या बंधांतून पार पडला आहे, आणि ज्याचें चित्त ज्ञानाचे ठिकाणीं स्थिर झालें आहे, तो जरी यज्ञ शेवटास नेण्याच्या उद्देशानें कर्म करीत असला, तरी त्याचें तें कर्म फलासहवर्तमान लय पावतें.२३**

तो देहधारी आहे तरी निर्गुणासारखा दिसतो, आणि ब्रह्माच्या कसाला लावून पाहिला तर त्याच्यासारखा शुद्ध दिसतो; १५ असा जरी तो केवळ मुक्त आहे, तरी एकादे वेळेस कौतुकानें यथाविधि यज्ञादिक कर्मांचें आरण करितो, तरी तीं संपूर्ण कर्में त्याच्याच ठिकाणीं लयाला जातात. १६ ज्याप्रमाणें आकाशांत अकालीं उत्पन्न झालेले पोकळ ढग वृष्टि केल्यावांचून आपोआप लयाला जातात, १७ त्याप्रमाणें, तो जरी वेदविहित कर्में यथाविधि आचरीत असला, तरी त्या कर्मांच्या ठिकाणीं त्याचा दुजाभाव नसल्यामुळें तीं त्याचेच ठायीं लय पावतात. १८

**[कां कीं,] होमसाधन, होमद्रव्य, अग्नि, होता आणि हवनक्रिया हीं त्या ब्रह्मवेत्त्याच्या दृष्टीनें ब्रह्मच आहेत, आणि ब्रह्मरूप कर्मांच्या ठिकाणीं लय लागून राहिलेल्या त्या ब्रह्मवेत्त्याला प्राप्त होणारें फलही ब्रह्मच आहे.॥२४॥**

हें एक हवन, त्याचा मी एक कर्ता, किंवा ह्या यज्ञाचा भोक्ता अमुक, अशा प्रकारें त्याच्या बुद्धीचा भिन्नभाव नाहीं; म्हणून, १९ जे जे इष्ट यज्ञ तो करतो, त्यांतील होमद्रव्यें व मंत्र हीं सर्व आत्मरूप म्हणजे ब्रह्मस्वरूपच आहेत असें तो समजतो. १२० म्हणून, अर्जुना, ब्रह्म तेंच कर्म अशी समबुद्धि ज्याच्या अंतःकरणांत बाणली त्यानें कर्म केलें तरी तें नैष्कर्म्यच होय. २१ ज्याची अविचाररूप बाल्यावस्था गेल्यावर विरक्तीशीं लग्न लागलें, (कारण लग्न झाल्यावांचून अग्निसेवा करितां येत नाहीं) मग जीव ब्रह्मैक्यरूप जो योगाग्नी त्याची उपासना ज्यांनीं आरंभिली, २२

**दुसरे कित्येक योगी दैवयज्ञच [इंद्रादिक देवतांकरितां केलेला यज्ञच] करितात; आणि दुसरे कित्येक, ब्रह्मरूप अग्नीचे ठिकाणीं [यज्ञसंज्ञक] स्वधर्मानेंच यज्ञाचें [आत्म्याचें] हवन करितात. ॥२५॥**

आणि रात्रंदिवस यज्ञ करणारे आहेत त्यांनीं गुरुवाक्यरूप अग्नींत मनासह अज्ञानाचें हवन केलें. २३ अर्जुना, ज्याला आत्मसुखाची इच्छा असेल त्यांनींच ह्या योगाग्नीचें यजन करावें, व ह्यालाच दैवयज्ञ असें म्हणतात. २४ आतां, जे ब्रह्माग्नीचे अग्नीहोत्री स्वकर्मानें ईश्वराराधन करतात, त्यांजविषयीं वर्णन करितों तें ऐक. २५

**कोणी श्रोत्रादि ज्ञानेंद्रियांचें हवन संयमरूपी अग्नींत करितात; आणि दुसरे कोणी शब्दादि पंचविषयांचें हवन इंद्रियरूपी अग्नींत करितात.२६**

कोणी आत्मसंयमरूप अग्नीमध्यें होम करणारे—ते कायिक, वाचिक व मानसिक या तीन युक्तिमंत्रांनीं पवित्र इंद्रियरूप द्रव्यानें हवन करतात; २६ कोणी वैराग्यरूपी सूर्य उगवल्यावर संयमाग्नीचें उद्धरण करून तो प्रज्वलित झाल्यावर इंद्रियरूप अग्नि ज्ञानानें पेटवितात; २७ त्या इंद्रियाग्नीनें वैराग्यरूप ज्वाला घेतली तेव्हां लागलीच विषयविकाररूप लांकडें पेटलीं; तेव्हां ज्ञानेंद्रियांच्या पांच विषयांच्या कुंडांचा आशारूप धुरानें त्याग केला. २८ मग वेदांत सांगितलेल्या विधीच्या योगानें इंद्रियरूप अग्नि पेटलेल्या कुंडांत विषयांच्या मोठ्या आहुति दिल्या. २९

**दुसरे कोणी ज्ञानानें प्रदीप्त झालेल्या मनोनिग्रहरूपी अग्नींत सर्व इंद्रियांचीं व प्राणांचीं कर्में हवन करितात. ॥२७॥**

पार्था, अशा प्रकारें कोणीं आपल्या सर्व दोषांचें क्षालन केलें; कोणीं हृदयरूप अरणीवर विचाररूप मंथा केला, व १३० तो धैर्यरूप भारानें दाबून आणि शांतिरूप रज्जूनें घुसळून, गुरुवाक्यरूप मंत्रानें मंथन केला. ३१ अशा प्रकारें सर्व वृत्तींचें ऐक्य करून मंथन केल्यानें तेथें तत्काल कार्य झालें. (तें कोणतें ?) तर ज्ञानाग्नि प्रज्वलित झाला! ३२ तेव्हां प्रथम ऋद्धिसिद्धींचा मोह हाच उत्पन्न झालेला

ऋद्धिसिद्धींचा संभ्रमु । तो निवर्तोनि गेला धूमु । मग प्रगटला सूक्ष्मु । विस्फुलिंगु ॥३३॥ तया मनाचें मोकळें । तेंचि पेटवण घातलें । जें यमदमीं हळुवारलें । आइतें होतें ॥३४॥ तेणें सादुकपणें ज्वाळा समृद्धा । मग वासनांतराचिया समिधा । स्नेहेंसीं नानाविधा । जाळिलिया ॥३५॥ तेथ सोहंमंत्रें दीक्षितीं । इंद्रियकर्मांचिया आहुती । तिये ज्ञानानळीं प्रदीप्तीं । दिधलिया ॥३६॥ पाठीं प्राणक्रियेचिये स्रुवेनिशीं । पूर्णाहुती पडली हुताशीं । तेथ अवभृथ समरसीं । सहजें जहालें ॥३७॥ मग आत्मबोधींचें सुख । जें संयमाग्नीचें हुतशेष । तोचि पुरोडाशु देख । घेतला तिहीं ॥३८॥ एक ऐशिया इहीं यजनीं । मुक्त ते जाहले त्रिभुवनीं । या यज्ञक्रिया तरी आनानीं । परि प्राप्य तें एक ॥३९॥

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथाऽपरे ।**
**स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८॥**

अपरे संशितव्रताः द्रव्ययज्ञाः तपोयज्ञाः योगयज्ञाः तथा च स्वाध्यायज्ञानयज्ञाः यतयः ( सन्ति ). ॥२८॥

एक द्रव्ययज्ञु म्हणिपती । एक तपसामग्रिया निपजविती । एक योगयागुही आहाती । जे सांगितले ॥१४०॥ एकीं शब्दीं शब्दु यजिजे । तो वाग्यज्ञु म्हणिजे । ज्ञानें ज्ञेय गमिजे । तो ज्ञानयज्ञु ॥४१॥ हें अर्जुना सकळ कुवाडें । जे अनुष्ठितां अतिसांकडें । परी जितेंद्रियासीचि घडे । योग्यतावशें ॥४२॥ ते प्रवीण तेथ भले । आणि योग्यसमृद्ध आथिले । म्हणोनि आपणपां तिहीं केलें । आत्महवन ॥४३॥

**अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथाऽपरे ।**
**प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥**

तथा, अपरे अपाने प्राणं जुह्वति, प्राणे च अपानं (जुह्वति; तथा अपरे ) प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ( सन्ति ). ॥२९॥

मग अपानाग्नीचेनि मुखीं । प्राणद्रव्यें देखीं । हवन केलें एकीं । अभ्यासयोगें ॥४४॥ एक अपानु प्राणीं अर्पिती । एक दोहींतेंही निरुंधिती । ते प्राणायामी म्हणिपती । पंडुकुमरा ॥४५॥

**अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।**
**सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥**

अपरे नियताहाराः ( सन्तः ) प्राणान् प्राणेषु जुह्वति. एते सर्वे अपि यज्ञविदः यज्ञक्षपितकल्मषाः ( सन्ति ). ॥३०॥

एक वज्रयोगक्रमें । सर्वाहारसंयमें । प्राणीं प्राणु संभ्रमें । हवन करिती ॥४६॥ ऐसे मोक्षकाम सकळ । समस्त हे यजनशीळ । जिहीं यज्ञद्वारा मनोमळ । क्षाळण केले ॥४७॥ जया अविद्याजात जाळितां । जें उरलें निजस्वभावता । जेथ अग्नि आणि होता । उरेचिना ॥४८॥ जेथ यजितयाचा कामु पुरे । यज्ञींचें विधान सरे । मागुतें जेथूनि वोसरे । क्रियाजात ॥४९॥ विचार जेथ न रिगे । हेतु जेथ न निगे । जें द्वैतदोषसंगें । सिंपेचिना ॥१५०॥

**यज्ञशिष्टामृतभुजो यांति ब्रह्म सनातनम् ।**
**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ३१**

कुरुसत्तम, यज्ञशिष्टामृतभुजः सनातनं ब्रह्म यान्ति. अयज्ञस्य अयं लोकः न अस्ति; कुतः अन्यः ? ॥३१॥

ऐसें अनादिसिद्ध चोखट । जें ज्ञान यज्ञावशिष्ट । तें सेविती ब्रह्मनिष्ठ । ब्रह्माहंमंत्रें ॥५१॥ ऐसे शेषामृतें धाले । कीं अमर्त्यभावा आले । म्हणोनि ब्रह्म ते जहाले । अनायासें ॥५२॥ येरां विरक्ति माळ न घालिचि । जयां संयमाग्नीची सेवा न घडेचि । जे योगयागु न करितीचि । जन्मले साते ॥५३॥ जयां ऐहिक धड नाहीं । तयांचें परत्र पुससी काई । म्हणोनि असो हे गोठी पाहीं । पंडुकुमरा ॥५४॥

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।**
**कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ३२**

एवं बहुविधाः यज्ञाः ब्रह्मणः मुखे विततः ( सन्ति; त्वं ) तान् सर्वान् कर्मजान् विद्धि; एवं ज्ञात्वा (त्वं) विमोक्ष्यसे. ३२

धूर नाहींसा होऊन मग सूक्ष्म अशी अग्नीची ठिणगी उत्पन्न झाली. ३३ यमदमांनीं शुष्क ( वाळलेलें ) झालेले जें निर्दोष मन, त्याचें अग्नीला पेटवण घातलें. ३४ त्याच्या साहाय्यानें मोठी ज्वाला उत्पन्न झाली. नंतर वासनारूप समिधांना अनेक प्रकारचा मोह हे घृत लावून त्या जाळल्या, ३५ नंतर जीवरूप दीक्षितानें ज्ञानरूपी प्रदीप्त केलेल्या अग्नींत इंद्रियकर्मांची आहुति दिली. ३६ शेवटीं, प्राणकर्म ह्याच स्रुवा नांवाच्या यज्ञपात्रासह अग्नीमध्यें पूर्ण आहुति दिल्यावर, ऐक्यबोध हें [ यज्ञाच्या शेवटचें ] अवभृथ-स्नान सहज घडलें, ३७ आणि संयमाग्नींत इंद्रियादिक होमद्रव्यांचें हवन करून बाकी राहिलेलें जें आत्मसुख, तेंच पुरोडाश म्हणून घेतलें. ३८ कोणी अशा रीतीनें यज्ञ करून त्रिभुवनांत मुक्त झाले; म्हणून, या यज्ञक्रिया जरी नानाप्रकारच्या आहेत, तरी त्यांची अखेर फलप्राप्ति एकच आहे. ३९

**दुसरे कोणी आरंभिलेलें कर्म निश्चयानें कडेला नेणारे यति असून द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ, योगयज्ञ स्वाध्याय [ वेदाध्ययन ] नामक यज्ञ व ज्ञानयज्ञ असे मोक्षप्राप्तिकरितां नानाप्रकारचे यज्ञ करितात.**

हे जे योग सांगितले, त्यांपैकीं एकाला ‘ द्रव्ययज्ञ ’ म्हणतात, एकाला ( तपःसामर्थ्यानें केलेला ) ‘ तपोयज्ञ ’ म्हणतात. एकाला ( अष्टांगसाधनानें साधलेला ) ‘ योग-यज्ञ ’ म्हणतात. १४० ज्यामध्यें शब्दानें शब्दाचा होम केला जातो, त्याला ‘ वाग्यज्ञ ’ म्हणतात; आणि ज्या यज्ञांत ज्ञानानें ब्रह्म मिळतें, त्याला ‘ ज्ञानयज्ञ’ म्हणतात. ४१ अर्जुना, हे सर्व यज्ञ फार बिकट असून यांचें आच-रण करणें फार दुर्घट आहे; परंतु ज्यानें इंद्रियें जिंकलीं आहेत, त्यास मात्र ते अधिकारपरत्वें करितां येतील. ४२ योगसमृद्धीनें सुसंपन्न असलेले पुरुषच हे यज्ञ करूं शकतात; कारण त्यांनीं आपल्या जीवाचें आत्म्याचे ठिकाणीं हवन केलेलें असतें. ४३

**त्याचप्रमाणें, कोणी अपानवायूच्या ठिकाणीं प्राणवायूचा प्रक्षेप [ पूरक ] करितात ;कोणी प्राणवा-यूच्या ठिकाणीं अपानवायूचा प्रक्षेप [रेचक] करितात; आणि कोणी प्राण व अपान ह्या दोन वायूंचा निरोध [ कुंभक ] करितात; ह्यांना प्राणायामपरायण योगी म्हणतात. ॥२९॥**

कोणी अभ्यासाचे योगानें अपानवायुरूप अग्नींत प्राण-वायुरूप द्रव्याचें हवन करितात; ४४ हे पंडुकुमरा, कोणी अपानवायु प्राणवायूंत मिळवितात; आणि कोणी दोन्ही वायूंचा निरोध करितात; त्यांना ‘ प्राणायामी ’ यज्ञ करणारे असें म्हणतात. ४५

**दुसरे, आहार नियमित करून प्राणांतच प्राणांचें हवन करितात. हे सर्व यज्ञ जाणणारे योगी यज्ञानें पापांचा नाश करितात. ॥३०॥**

कोणी हठयोगाच्या क्रमानें सर्व आहार जिंकून प्राणवा-युरूपी अग्नींत त्वरेनें प्राणांचें हवन करतात. ४६ अशा प्रकारें मोक्षप्राप्तीचीच इच्छा करणारे हे सर्व सांगितलेले यज्ञकर्ते असून, त्यांनीं त्या यज्ञांच्या द्वारें आपले कामक्रोधादिक विकार नाहींतसे केलेले असतात. ४७ अशा प्रकारें सर्व अविद्या—अज्ञान—जाळून टाकल्यामुळें त्याला स्वाभाविक-पणेंच शुद्ध स्वरूप उरतें, व अग्नि आणि यज्ञ करणारा असा द्वैतभाव रहात नाहीं; ४८ ज्या ठिकाणीं यज्ञ करणा-राची इच्छा पूर्ण होऊन यज्ञक्रिया संपतात, आणि अर्थात शेवटीं सर्व कर्मे नाहींतशीं होतात; ४९ ज्या ठिकाणीं विचाराचा शिरकाव होत नाहीं, कामनेचा स्पर्श होत नाहीं, व द्वैतदोषांचा स्पर्श होत नाहीं; १५०

**हे कुरुकुलश्रेष्ठा, यज्ञाचा अवशिष्ट प्रसाद घेणारे लोक सनातन ब्रह्मामृत प्राप्त होतात. यज्ञ न करणाराला इहलोक देखील नाहीं, मग पर-लोक कोठून मिळणार ? ॥३१॥**

असें जें अनादिसिद्ध व शुद्धयज्ञावशिष्ट ब्रह्म, त्या ब्रह्माचें, ब्रह्मनिष्ठ लोक हे **अहं ब्रह्मास्मि**—मी ब्रह्म आहें—या मंत्रानें सेवन करितात. ( ब्रह्मरूप होतात. ) ५१ ह्या-प्रमाणें यज्ञाचें शिलक राहिलेलें ज्ञानरूप अमृत पिऊन जे तृप्त होऊन अमर होतात, ते सहज ब्रह्मत्व पावतात. ५२ ज्यांच्या हातून या यज्ञाचें आचरण घडत नाहीं, ज्यांना विरक्ति माळ घालीत नाहीं, ज्यांना आत्मसंयमन करतां येत नाहीं, व जे जन्मास आले असतां योगयागही करीत नाहींत; ५३ अर्जुना, ज्यांची इहलोकीं धडगत नाहीं, त्यांची परलोकची हालहवाल कशाला पुसतोस ? त्यांच्या-विषयीं गोष्टच बोलणें नको ५४

**ह्याप्रमाणें, जे अनेक प्रकारचे यज्ञ वेदांनीं सांगितले आहेत, ते सर्व कर्मापासून उत्पन्न हो-णारे आहेत असें समज. असे तूं जाणलेस म्हणजे तूं मोक्ष पावशील. ॥३२॥**

ऐसें बहुतीं परी अनेग । जे सांगितले तुज कां याग । ते विस्तारूनि वेदेंचि चांग । म्हणितले आहाती ॥५५॥ परि तेणें विस्तारें काय करावें । हेंचि कर्मसिद्ध जाणावें । येतुलेनि कर्मबंधु स्वभावें । पावेल ना ॥५६॥

**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।**
**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥**

परंतप, द्रव्यमयात् यज्ञात् ज्ञानयज्ञः श्रेयान्; पार्थ, सर्वं अखिलं कर्म ज्ञाने परिसमाप्यते. ॥३३॥

अर्जुना वेदु जयांचें मूळ । जे क्रियाविशेषें स्थूळ । जया नव्हाळियेचें फळ । स्वर्गसुख ५७ ते द्रव्यादियागु कीर होती । परी ज्ञानयज्ञाची सरी न पवती । जैसी तारातेजसंपत्ती । दिनकरापाशीं ॥५८॥ देखें परमात्म सुखनिधान । साधावया योगीजन । जें न विसंबिती अंजन । उन्मेषनेत्रीं ॥५९॥ जें धांवतया कर्माची लाणी । नैष्कर्म्यबोधाची खाणी । जें भुकेलिया धणी । साधनाची ॥१६०॥ जेथ प्रवृत्ति पांगुळ जाहली । तर्काचि दिठी गेली । जेणें इंद्रियें विसरलीं । विषयसंगु ॥६१॥ मनाचें मनपण गेलें । जेथ बोलाचें बोलकेपण ठेलें । जयामाजि सांपडलें । ज्ञेय दिसे ॥६२॥ जेथ वैराग्याचा पांगु फिटे । विवेकाचाही सोसु तुटे । जेथ न पाहतां सहज भेटे । आपणपें ॥६३॥

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥**

तत्त्वदर्शिनः ज्ञानिनः तत् ज्ञानं प्रणिपातेन, परिप्रश्नेन, सेवया उपदेक्ष्यंति इति ( त्वं ) विद्धि. ॥३४॥

तें ज्ञान पैं बरवें । जरी मनीं आथि आणावें । तरी संतां यां भजावें । सर्वस्वेंशीं ॥६४॥ जे ज्ञानाचा कुरुठा । तेथ सेवा हा दारंवठा । तो स्वाधीन करी सुभटा । वोळगोनी ॥६५॥ तरी तनुमनुजीवें । चरणासीं लागावें । आणि अगर्वता करावें । दास्य सकळ ॥६६॥ मग अपेक्षित जें आपुलें । तेंही सांगतील पुसिलें । जेणें अंतःकरण बोधलें । संकल्पा नये ॥६७॥

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ।**
**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥३५॥**

पांडव, यत् ज्ञात्वा पुनः एवं मोहं न यास्यसि, येन सर्वाणि भूतानि अशेषेण आत्मनि अथो मयि द्रक्ष्यसि. ॥३५॥

जयाचेनि वाक्य उजिवडें । जाहलें चित्त निधडें । ब्रह्माचेनि पाडें । निःशंकु होय ॥६८॥ ते वेळीं आपणपेंयां सहितें । इयें अशेषेंही भूतें । माझ्या स्वरूपीं अखंडितें । देखसी तूं ॥६९॥ ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल । तैं मोहांधकार जाईल । जैं श्रीगुरुकृपा होईल । पार्था गा ॥१७०॥

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।**
**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥**

( त्वं , सर्वेभ्यः पापेभ्यः अपि पापकृत्तमः असि चेत् सर्वं वृजिनं ज्ञानप्लवेनैव ( त्वं ) संतरिष्यसि. ॥३६॥

जरी कल्मषाचा आगरु । तूं भ्रांतीचा सागरु । व्यामोहाचा डोंगरु । होउनी अससी ॥७१॥ तऱ्ही ज्ञानशक्तिचेनि पाडें । हें आघवेंचि गा थोकडें । ऐसें सामर्थ्य असे चोखडें । ज्ञानीं इये ॥७२॥ देखें विश्वभ्रमाऐसा । जो अमूर्ताचा कडवसा । तो जयाचिया प्रकाशा । पुरेचिना ॥७३॥ तया कायसे हे मनोमळ । हें बोलतांचि अति किडाळ । नाहीं येणें पाडें ढिसाळ । दुजें जगीं ७४

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।**
**ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥३७॥**

अर्जुन, यथा समिद्धः अग्निः एधांसि भस्मसात् कुरुते, तथा ज्ञानाग्निः सर्व कर्माणि भस्मसात् कुरुते. ॥३७॥

सांगें भुवनत्रयाची काजळी । जे गगनामाजि उधवली । तिये प्रळयींचे वाहुटळी । काय अभ्र पुरे ॥७५॥ कीं पवनाचेनि कोपें । पाणियेंचि जो पाळिपे । तो प्रळयानळू दडपे । तृणें काष्ठें काई ७६

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।**
**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥३८॥**

ज्ञानेन हि सदृशं इह पवित्रं न विद्यते; योगसंसिद्धः (पुरुषः) स्वयं तत् ज्ञानं कालेन आत्मनि विन्दति. ॥३८॥

अशा प्रकारें जे तुला पुष्कळ प्रकारचे ( याग ) यज्ञ सांगितले, त्यांच्याबद्दल वेदांत पुष्कळ विस्तारानें चांगलें वर्णन केलें आहे. ५५ परंतु वेदांतील त्यांचें वर्णन ऐकून आपल्याला काय करावयाचें आहे ? त्यांतील सार हेंच कीं, हे सर्व यज्ञ कर्मापासून उत्पन्न झालेले आहेत, एवढें जाणलें असतां कर्माची बाधा होणार नाहीं. ५६

**हे शत्रुतापना, द्रव्यानें साध्य होणाऱ्या यज्ञापेक्षां ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे; कारण, पार्था, यच्चयावत् सर्व कर्मांचा ज्ञानामध्यें अंतर्भाव होतो. ॥३३॥**

अर्जुना, ज्या यज्ञाचें मूळ वेद आणि ज्यांत क्रियांचा खटाटोप फार आहे व ज्याचें प्रथम फल स्वर्ग आहे,५७ते कर्मयज्ञ आहेत खरे, परंतु सूर्यापुढें जसें नक्षत्रांचें तेज लोपतें, त्याप्रमाणें ते ज्ञानयज्ञाची बरोबरी पावत नाहींत. ५८ जें ज्ञानांजन डोळ्यांत घालून आत्मसुखरूप ठेवा मिळविण्याकरितां योगीजन रात्रंदिवस जागृत असतात, ५९ जें ज्ञान आरंभिलेल्या कर्माचें प्राप्यस्थान आहे, जें ब्रह्मावबोधाची खाण आहे, व आत्मप्राप्तीकरितां भुकेलेल्या साधकांच्या तृप्तीचें स्थान आहे, १६० ज्या ठिकाणीं कर्माची इच्छा राहिली व तर्क बंद राहिला, आणि ज्याच्या योगानें इंद्रियें विषय सेवन करणें विसरलीं, ६१ ज्या ठिकाणीं मनाचें मनपण गेलें, जेथें शब्दाची धांव खुंटली, आणि ज्या ठिकाणीं अंतर्गत जें ब्रह्म तें प्राप्त होतें, ६२ ज्या ठिकाणीं वैराग्याची कष्टप्रद स्थिति नाहींशी होते, विचाराची हाव नष्ट होते, आणि श्रमावांचून आत्मज्ञान होतें, ६३

**तत्त्वदर्शी ज्ञान्यांना नमस्कार करून नंतर प्रश्न करून त्यांची सेवा केली असतां ते त्या ज्ञानाचा तुला उपदेश करतील असें समज. ॥३४॥**

असें जें सर्वोत्कृष्ट ज्ञान, तें तुला मिळविण्याची इच्छा असेल तर तूं ब्रह्मज्ञानसंपन्न असे जे संत त्यांची सेवा कर. ६४ ते संत ज्ञानाचें घर असून सेवाधर्म हा त्या घराचा उंबरठा आहे; तर अर्जुना, तूं तिकडे वळून सेवाधर्मरूपी उंबरठा आपल्या स्वाधीन करून घे. ६५ म्हणजे संतांची सेवा कर–ती कशी म्हणशील तर–शरीरानें, मनानें व जीवानें सर्व प्रकारांनीं गर्वरहित होऊन चरणांची सेवा करावी. ६६ अशा प्रकारच्या सेवेनें प्रसन्न झाल्यानंतर त्या प्रसन्नस्थितींत त्यांना शिष्यांनीं जन्ममरण दुःखरूपसंसारनिवृत्तीविषयीं प्रश्न केला असतां तेही कृपेनें उपदेश करितात. त्या उपदेशापासून होणाऱ्या बोधाचें ऐश्वर्य असें आहे कीं, पुनश्च शिष्याचे अंतःकरणांत संसाराची कल्पनाही येत नाहीं. ६७

**हे पांडुपुत्रा, तें ज्ञान प्राप्त झालें असतां पुनः असा [ भेदरूपी ] मोह तुला होणार नाहीं; आणि त्या ज्ञानानें हीं सर्व भूतें तूं आपल्या स्वतांचे ठायीं आणि माझे ठायीं पाहशील. ॥३५॥**

ज्यांच्या उपदेशापासून ब्रह्मप्रमाणें निःसंशय व निर्धास्तअंतःकरण ज्या वेळेस होईल. ६८ त्या वेळीं आपणासहवर्तमान सर्व भूतें माझ्या अखंड स्वरूपाच्या ठिकाणीं तूं पाहशील. ६९ पार्था, अशा रीतीनें जेव्हां सत्पुरुषांची कृपा होईल, तेव्हां तुझे अंतःकरणांत ज्ञानाचा उदय होऊन मोहरूपी अंधकार नाहींसा होईल. १७०

**तूं जरी सर्व पाप्यांपेक्षां अतिपापी असलास, तरी ज्ञानरूप नौकेच्याच साधनानें सर्व पापरूप समुद्र अनायासें तरून जाशील. ॥३६॥**

तूं पातकाचें आगर, भ्रांतीचा सागर अथवा भ्रमाचा पर्वत जरी असलास, ७१ तरी ज्ञानाच्या शक्तीपुढें हें सर्व तुच्छ आहे; असें ह्या ज्ञानाच्या अंगीं उत्तम सामर्थ्य आहे. ७२ ज्या परमात्मज्ञानाचा उदय होतांच हें विश्व सत्य आहे अशा प्रकारचा भ्रम नष्ट होऊन जातो, ७३ त्या ज्ञानापुढें मनांतील अज्ञानाची काय कथा ? म्हणून तुझे मनांत ही शंका येणें हेंच बरोबर नाहीं; कारण ह्या जगांत ज्ञानाच्या तोडीची दुसरी वस्तूच नाहीं. ७४

**अर्जुना, प्रज्वलित झालेला अग्नि जसा काष्ठांचें भस्म करून टाकतो, तसा ज्ञानाग्नि सर्व कर्मांचें भस्म करून टाकतो. ॥३७॥**

त्रैलोक्य पेटल्यावर आकाशांत पसरलेल्या त्याच्या धुराला पार उडवून देणारी जी प्रळयकाळची वावटळ, तिला ढग नाहींतसे करणें अवघड आहे का ? ७५ किंवा वाऱ्याच्या सहाय्यानें भडकला असतां जो पाणीही जाळून टाकतो, तो प्रलयकाळचा अग्नि गवत आणि काष्ठें ह्यांनीं विझेल का ? ७६

**कारण, ज्ञानाच्या बरोबरीचें पवित्र असें दुसरें ह्या जगांत कांहीं नाहीं, आणि योगानें युक्त झालेला पुरुष कालेंकरून तें [ आत्मविषयक ] ज्ञान स्वतांच मिळवितो. ॥३८॥**

म्हणोनि असो हें न घडे । तें विचारितांचि असंगडें । पुढती ज्ञानाचेनि पाडें । पवित्र न दिसे ॥७७॥ एथ ज्ञान हें उत्तम होये । आणिकही एक तैसें कें आहे । जैसें चैतन्य कां नोहें । दुसरें गा ॥७८॥ या महातेजाचेनि कसें । जरी चोखाळु प्रतिबिंब दिसे । कां गिंवसिलें गिंवसे । आकाश हें ॥७९॥ नातरी पृथ्वीचेनि पाडें । कांटाळें जरी जोडे । तरी उपमा ज्ञानीं घडे । पंडुकुमरा ॥१८०॥ म्हणूनि बहुतीं परी पाहतां । पुढतीपुढती निर्धारितां । हे ज्ञानाची पवित्रता । ज्ञानींचि आथि ॥८१॥ जैसी अमृताची चवी निवडिजे । तरी अमृताचिसारिखी म्हणिजे । तैसें ज्ञान हें उपमिजे । ज्ञानेंसींचि ॥८२॥ आतां यावरी जे बोलणें । तें वायांचि वेळु फेडणें । तंव साचचि हें पार्थु म्हणे । जें बोलत असां ॥८३॥ परि तेंचि ज्ञान केविं जाणावें । ऐसें अर्जुनें जंव पुसावें । तंव तें मनोगत देवें । जाणितलें ॥८४॥ मग म्हणतसे किरीटी । आतां चित्त देयीं इये गोठी । सांगेन ज्ञानाचिये भेटी । उपावो तुज ८५

**श्रद्धावांल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९॥**

श्रद्धावान्, तत्परः, संयतेंद्रियः ( च ) ज्ञानं लभते; ज्ञानं लब्ध्वा अचिरेण परां शांन्ति अधिगच्छति. ॥३९॥

तरी आत्मसुखाचिया गोडिया । विटे जो कां सकळ विषयां । जयाच्या ठायीं इंद्रियां । मानु नाहीं ॥८६॥ जो मनासी चाड न सांगे । जो प्रकृतीचें केलें नेघे । जो श्रद्धेचेनि संभोगें । सुखिया जाहला ॥८७॥ तयातेंचि गिंवसित । तें ज्ञान पावे निश्चित । जयामाजि अचुंबित । शांति असे ॥८८॥ तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे । आणि शांतीचा अंकुर फुटे । मग विस्तार बहु प्रकटे । आत्मबोधाचा ॥८९॥ मग जेऊती वास पाहिजे । तेऊती शांतीचि देखिजे । तेथ आपपरु नेणिजे । निर्धारितां ॥१९०॥ ऐसा हा उत्तरोत्तरु । ज्ञानबीजाचा विस्तारु । सांगतां असे अपारु । परि असो आतां ॥९१॥

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ४०**

अज्ञः च अश्रद्दधानः च संशयात्मा(च)विनश्यति; संशयात्मनः अयं लोकः न अस्ति, परलोकः न ( अस्ति ), सुखं ( च न अस्ति ). ॥४०॥

ऐकें जया प्राणियाच्या ठायीं । इया ज्ञानाची आवडी नाहीं । तयाचें जियालें म्हणों काई । वरी मरण चांग ॥९२॥ शून्य जैसें गृह । कां चैतन्येंवीण देह । तैसें जीवित तें संमोह । ज्ञानहीन ॥९३॥ अथवा ज्ञान कीर आपु नोहे । परि ते चाड एकी जरी वाहे । तरी तेथ जिव्हाळा कांहीं आहे । प्राप्तीचा पैं ॥९४॥ वांचूनि ज्ञानाची गोठी कायसी । परि ते आस्थाही न धरी मानसीं तरी तो संशयरूप हुताशीं । पडिला जाण ॥९५॥ जे अमृतही परि नावडे । ऐसें सावियाचि अरोचकु जैं पडे । तैं मरण आलें असे फुडें । जाणों एवीं ॥९६॥ तैसा विषयसुखें रंजे । जो ज्ञानेंसींचि माजे । तो संशयें अंगिकारिजे । एथ भ्रांति नाहीं ॥९७॥ मग संशयीं जरी पडिला । तरी निभ्रांत जाणें नासला । तो ऐहिकपरत्रा मुकला । सुखासि गा ॥९८॥ जया काळज्वरु आंगीं बाणे । तो शीतोष्णें जैशीं नेणे । आगी आणि चांदिणें । सारिखेंचि मानी ॥९९॥ तैसें साच आणि लटिकें । विरुद्ध आणि निकें । संशयी तो नोळखे । हिताहित ॥२००॥ हा रात्रिदिवसु पाहीं । जैसा जात्यंधा ठाउवा नाहीं । तैसें संशयीं असतां कांहीं । मना नये ॥१॥

**योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।**
**आत्मवंतं न कर्माणि निबध्नन्ति धनंजय ॥ ४१ ॥**

धनंजय, योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयं आत्मवंतं कर्माणि न निबध्नंति. ॥४१॥

असो. ह्या गोष्टी कधीं घडून येणाऱ्या नाहींत, आणि त्यांचा विचार करणें हें असंगत दिसतें; म्हणून ज्ञानाचा जों जों विचार करावा, तों तों त्याच्या योग्यतेची पवित्र वस्तु दुसरीं कोणतीच दिसत नाहीं. ७७ ज्याप्रमाणें चैतन्याला दुसरा पडोसा नाहीं, त्याप्रमाणें ह्या लोकीं ज्ञान ही उत्तम वस्तु असून त्याच्या बरोबरीची दुसरी वस्तु कोठें मिळणार ? ७८ जर सूर्याचे कसोटीला त्याच्या प्रतिबिंबाचें तेज लागेल, किंवा आकाशाला आपल्या कवळ्यांत कवटाळतां येईल, ७९ किंवा पृथ्वीच्या बरोबरीची दुसरी वजनदार वस्तु सांपडेल, तरच, अर्जुना ज्ञानाच्या किमतीची दुसरी वस्तु मिळेल. १८० म्हणून, पुष्कळ प्रकारानें वारंवार विचार करून पाहतां, ह्या ज्ञानाचा पवित्रपणा ज्ञानालाच आहे. ८१ अमृताची चव कोणी विचारिली असतां ती जशी अमृतासारखीच असें म्हणावें लागतें, तशी ज्ञानाला ज्ञानाचीच उपमा ! ८२ आतां ह्या पेक्षां ज्ञानाविषयीं जास्त वाटावाट करणें म्हणजे वेळ व्यर्थ घालविणें होय. तेव्हां अर्जुन, म्हणाला, "तुम्हीं बोलतां तें खरें आहे" ८३ 'पण तें ज्ञान कोणत्या उपायानें प्राप्त करून घ्यावें' असें जों अर्जुन पुसणार, तोच त्याचे मनांतील हेतु देवांनीं जाणला; ८४ आणि मग अर्जुनास म्हटलें:—हे किरीटी ज्ञानप्राप्तीचा जो उपाय मी तुला आतां सांगणार आहें, त्या गोष्टीकडे लक्ष दे. ८५

**परम विश्वासू, ज्ञानप्राप्तीविषयीं तत्पर आणि इंद्रियें जिंकलेला, अशा पुरुषास ज्ञान प्राप्त होतें; व तें प्राप्त झाल्यावर लवकरच उत्तम शांति प्राप्त होते. ॥३९॥**

आत्मसुखाच्या गोडीनें ज्याचें मन सर्व विषयांविषयीं विटून जातें, आणि ज्याच्या ठिकाणीं इंद्रियांची मुळींच प्रतिष्ठा नाहीं, ८६ जो आपली इच्छा आपल्या मनाला कळूं देत नाहीं, जो प्राचीन कर्मसंस्कारानें उत्पन्न केलेल्या वासना विचारांत घेत नाहीं, दाबून टाकतो, आणि जो ज्ञानप्राप्तीच्या श्रद्धेनें संतोष पावतो, ८७ त्याच पुरुषास ज्या ज्ञानांत ओतप्रोत शांति भरलेली असते, असें ज्ञान शोधीत येऊन निश्चयानें प्राप्त होतें. ८८ तें ज्ञान मनाच्या ठिकाणीं स्थिर झालें म्हणजे, मग शांतीचा अंकूर फुटून पुढें आत्मबोधाचा विस्तार होतो. ८९ मग तो जिकडे पाहील, तिकडे त्याला शांतीच दिसते, आणि त्या शांतीचे ठिकाणीं खरोखर आपपरभाव नसतो १९० अशा रीतीनें ज्ञानाविषयीं जेवढें वर्णन करावें, तेवढें थोडेंच आहे; तर ती गोष्ट आतां राहूं दे. ९१

**अज्ञानी, अविश्वासी व संशययुक्त असा पुरुष नाशाप्रत पावतो; [ स्वार्थाला मुकतो; ] आणि त्या संशयी पुरुषास इहलोक, परलोक व मोक्षसुख हीं प्राप्त होत नाहींत. ॥४०॥**

हें पहा—ज्या मनुष्याचे ठिकाणीं अशा प्रकारच्या ज्ञानाची आवड नाहीं, त्याचें जिणें काय म्हणावयाचें ? त्यापेक्षां मरण चांगलें ! ९२ एकादें ओसाड घर किंवा प्राणावांचून जसें शरीर, त्याचप्रमाणें ज्ञानहीन मनुष्याचें जीवित मोहयुक्त होय. ९३ खरें ज्ञान प्राप्त झाले नसलें, परंतु तें प्राप्त होण्याबद्दल जो मनुष्य इच्छा बाळगतो, त्याला कांहीं ज्ञानप्राप्तीचा संभव आहे. ९४ ज्ञान असण्याविषयींची गोष्ट राहिली; परंतु तें प्राप्त व्हावें, अशी ज्यास कळकळही नाहीं, तो संशयरूप अग्नीत पडला असें समज. ९५ कां कीं, अमृतही आवडत नाहीं अशी अरुचि जेव्हां सहज उत्पन्न होते, तेव्हां त्या मनुष्याचें मरण ओढवलें आहे असें जाणावें. ९६ त्याचप्रमाणें, विषयसुखांतच जो आनंद मानतो, आणि ज्ञानप्राप्तीविषयीं बेपरवा असतो, त्याला संशयानें ग्रासलें ह्यांत संशय नाहीं. ९७ अशा रीतीनें जो संशयांत पडला, तो निःसंशय भ्रष्ट झाला; म्हणून तो इहलोकच्या व परलोकच्या सुखास आंचवला ! ९८ ज्याला सन्निपात ज्वर झाला आहे, त्याला ज्याप्रमाणें शीत, ऊष्ण कळत नाहीं, आणि तो ऊन व चांदणें सारखेंच मानतो, ९९ त्याचप्रमाणे खरें, खोटें, अनुकूल, प्रतिकूल, हित, अहित हीं संशयी पुरुषाला कळत नाहींत. २०० ज्याप्रमाणें जन्मांधास रात्र व दिवस ठाऊक नसतात, त्याचप्रमाणें संशयी पुरुषाला कशाचीच ओळख नसते. १

**अर्जुना, योगानें ज्यानें सर्व कर्मांचा संन्यास केला आहे, ज्ञानानें ज्याचे संशय नाहीसे झाले आहेत, व आत्मस्वरूप ज्याला प्राप्त झालें आहे, त्या पुरुषाला कर्मापासून बंधन प्राप्त होत नाहीं. ॥४१॥**

म्हणऊनि संशयाहूनि थोर । आणिक नाहीं
पाप घोर । हा विनाशाची वागुर । प्राणियासी २
येणें कारणें तुवां त्यजावा । आधीं हाचि एकु
जिणावा । जो ज्ञानाचिया अभावा- । माजि असे
॥३॥ जैं अज्ञानाचें गडद पडे । तैं हा बहुवस
मनीं वाढे । म्हणोनि सर्वथा मार्गु मोडे । विश्वासा-
चा ॥४॥ हृदयीं हाचि न समाये । बुद्धीतें गिंव-
सूनि ठाये । तेथ संशयात्मक होये । लोकत्रय ५

**तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।**
**छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥**

भारत, तस्मात् अज्ञानसंभूतं हृत्स्थं आत्मनः एनं संशयं ज्ञानासिना छित्वा योगम् आतिष्ठ युद्धाय ( च ) उत्तिष्ठ. ॥४२॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानकर्मसंन्यासयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥४॥

ऐसा जरी थोरावे । तरी उपायें एकें आंगवे ।
जरी हातीं होय बरवें । ज्ञानखड्ग ॥६॥ तरी तेणें
ज्ञानशस्त्रें तिखटें । निखलु हा निवटे । मग निः-
शेखता फिटे । मानसींचा ॥७॥ याकारणें पार्था ।
उठीं वेगीं वरौता । नाशु करोनि हृदयस्था । सं-
शयासी ॥८॥ ऐसें सर्वज्ञाचा बापु । जो श्रीकृष्णु
ज्ञानदीपु । तो म्हणतसे सकृपु । ऐकें राया ९
तंव या पूर्वापर बोलाचा । विचारूनि कुमरु पं-
डूचा । कैसा प्रश्नु अवसरींचा । करिता होईल
॥२१०॥ ते कथेची संगति । भावाची संपत्ति ।
रसाची उन्नति । म्हणिपेल पुढां ॥११॥ जया-
चिया बरवेपणीं । कीजे आठां रसांची वोवा-
ळणी । जो सज्जनाचिये आयणी । विसांवा जगीं
॥१२॥ तो शांतुचि अभिनवेल । ते परियेसा म-
ऱ्हाठे बोल । जे समुद्राहूनि सखोल । अर्थभरित
॥१३॥ जैसें बिंब तरी बचकेचि एवढें । परि
प्रकाशासि त्रैलोक्य थोकडें । शब्दाची व्याप्ति
तेणें पाडें । अनुभवावी ॥१४॥ नातरी कामित-
याचिया इच्छा । फळे कल्पवृक्षु जैसा । बोलु
व्यापकु होय तैसा । तरी अवधान द्यावें ॥१५॥
हें असो काय म्हणावें । सर्वज्ञु जाणती स्वभावें ।
तरी निकें चित्त द्यावें । हे विनंती माझी ॥१६॥
जेथ साहित्य आणि शांति । हे रेखा दिसे बो-
लती । जैसी लावण्यगुण कुळवती । आणि पति-
व्रता ॥१७॥ आधींचि साखर आवडे । तेचि जरी
ओखदा जोडे । तरी सेवावी ना कां कोडें । ना-
वानावा ॥१८॥ सहजें मलयानिळु मंदु सुगंधु ।
तया अमृताचा होय स्वादु । आणि तेथेंचि जोडे
नादु । जरी दैवगत्या ॥१९॥ तरी स्पर्शें सर्वांग
निववी । स्वादें जिव्हेतें नाचवी । तेवींचि कानां-
करवीं । म्हणवी बापु माझा ॥२२०॥ तैसें कथेचें
इये ऐकणें । एक श्रवणासि होय पारणें । आणि
संसारदुःख मूळवणें । विकृतीविणें ॥२१॥ जरी
मंत्रेंचि वैरी मरे । तरी वायां कां बांधावीं कटारें ।
रोग जाय दुधसाखरें । तरी निंब कां पियावा २२
तैसा मनाचा मारु न करितां । आणि इंद्रियां
दुःख न देतां । एथ मोक्षु असे आयता । श्रवणा-
चिमाजि ॥२३॥ म्हणोनि आथिलिया आराणुका ।
गीतार्थु हा निका । ज्ञानदेवो म्हणे आइका ।
निवृत्तिदासु ॥२२४॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥ श्लोक ४२, ओंव्या २२४.

म्हणून संशयापेक्षां दुसरें भयंकर पाप कोणतेंच नाहीं. प्राण्यांचा नाश करण्याचें हें एक जाळें आहे, २ ह्याकरितां तूं त्याचा संग सोडून आधीं ह्याला जिंक. ह्याचें वास्तव्य ज्ञानाच्या अभावीं असतें. ३ जेव्हां अज्ञानाचा निबिड काळोख असतो, तेव्हां हा संशय मनांत ज्यास्त वाढतो, म्हणून तो विश्वासाचें नांव देखील येऊं देत नाहीं. ४ हा अंतःकरणांतच भरून राहतो असें नाही, तर हा बुद्धीलाही ग्रासून टाकितो, आणि मग त्या मनुष्याला तिन्ही लोक संशयात्मकच दिसूं लागतात. ५

**म्हणून, अर्जुना, अज्ञानापासून उत्पन्न झालेला हा हृदयांतील संशय आपल्या ज्ञानरूप शस्त्रानें नाहींसा करून [ईश्वरार्पणरूप] कर्मयोगाचें अवलंबन कर, आणि युद्धास ऊठ. ॥४२॥**

पण इतका जरी तो वाढला, तरी त्याला स्वाधीन करून घेण्याला एक उपाय आहेः तीव्र ज्ञानखड्ग जर हातीं असेल, ६ तर त्या तिखट शस्त्राच्या योगानें हा सर्व नाहींसा होतो; आणि मग त्याचा मनांतून समूळ नाश होतो. ७ म्हणून, पार्था, आपल्या मनांतील संशय नाहींसा करून लवकर ऊठ. ८ संजय धृतराष्ट्र राजास म्हणतोः राजा, ऐकः ज्ञानीजनांचे जनक जे ज्ञानदीप भगवान् श्रीकृष्ण ते अशा रीतीनें मोठ्या कृपेनें अर्जुनास म्हणाले. ९ तेव्हां, ह्या सर्व पूर्वापर कथेचा विचार करून तो अर्जुन समयोचित असा प्रश्न करील. २१० त्या कथेची जुळणी, अभिप्रायाची शोभा व रसाची गोडी पुढें सांगण्यांत येईल. ११ ज्याच्या बोलाच्या चांगलेपणावरून आठही रस ओंवाळून टाकावे, आणि जो सज्जनांच्या बुद्धीला ह्या जगतामध्यें विश्रांतीचें स्थान होय. १२ ज्या मराठी बोलापासून शांतरसच प्रगटेल, व जो समुद्रापेक्षां गंभीर असून अर्थभरित आहे, तो बोल ऐका. १३ जसें सूर्यबिंब हें वचकेंत मावण्याएवढेंच दिसतें, परंतु त्याचे प्रकाशाला त्रिभुवनसुद्धां पुरत नाहीं, तशी या शब्दार्थाची व्याप्ति आहे असें अनुभवावें; १४ किंवा कल्पवृक्ष जसा कामीजनांच्या इच्छा पूर्ण करितो, तसे हे बोल सर्व इच्छा पूर्ण करणारे आहेत. म्हणून ह्यांच्याकडे लक्ष पुरवावें. १५ श्रोतेहो, तुम्हांला आणखी काय काय सांगावें? तुम्ही जाणतेच आहां, तेव्हां नीट लक्ष द्यावें एवढीच माझी विनंती आहे. १६ ज्याप्रमाणें एकादी स्त्री सुंदर, गुणी आणि कुलशीलवती असून प्रतिव्रता असते, त्याप्रमाणें, या बोलण्याचे पद्धतीवरून, या बोलामध्यें सर्व अलंकार व शांति हा स्पष्ट दिसतात. १७ अगोदर साखरेची आवड असून, ती जर औषधाच्या अनुपानांत दिली, तर ती आनंदानें वरचेवर कां न खावी? १८ साहजिकपणें मैलागिरी पर्वतावरील सुगंध व मंद असा वारा वहात असून त्याला जर अमृताची गोडी आली, आणि दैवयोगानें तेथें जर पंचमसुरासारखा नाद कानीं आला, १९ तर त्या वाऱ्याच्या स्पर्शानें जसें सर्व अंग गार होईल, आणि गोडीनें जिव्हेला समाधान होईल, तसेंच मधूर स्वर ऐकल्यावर कान वाहवा म्हणतील, २२० त्याचप्रमाणें, हीच कथा ऐकल्यानें कानांचें पारणें फिटेल, आणि संसारदुःखापासून कांहींएक विकार न होतां तें आपोआप नाहींसें होईल. २१ जर मंत्रानेंच शत्रूचा नाश होईल, तर मग कमरेला कट्यार कां बांधावी? तसें, दूधसाखरेनें जर रोग नाहींतसे होतील, तर कडुनिंबाचें सेवन कां करावें? २२ त्याचप्रमाणें मनाला न जिंकतां व इंद्रियांना दुःख न देतां या श्रवणामध्येंच प्रत्यक्ष मोक्ष आहे; २३ म्हणून, निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतात, "तुमच्या मनांत जितकी उत्कंठा असेल, तितक्या उत्कंठेनें हा गीतेचा अर्थ ऐका." २२४

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय पांचवा.

अर्जुन उवाच—

**संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।**
**यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥ १ ॥**

कृष्ण, कर्मणां संन्यासं पुनः योगं च शंससि; एतयोः यत्
एकं श्रेयः तत् मे सुनिश्चितं ब्रूहि. ॥१॥

मग पार्थु श्रीकृष्णातें म्हणे । हां हो हें कैसें
तुमचें बोलणें । एक होय तरी अंतःकरणें । वि-
चारूंये ॥१॥ मागां सकळ कर्मांचा संन्यासु ।
तुम्हींच निरोपिला होता बहुवसु । तरी कर्मयोगीं
केविं अतिरसु । पोखीतसां पुढती ॥२॥ ऐसें
व्यर्थ हें बोलतां । आम्हां नेणतयांच्या चित्ता ।
आपुलिये चाडे श्रीअनंता । उमजु नोहे ॥३॥
ऐकें एकसारातें बोधिजे । तरी एकनिष्ठचि बोलि-
जे । हें आणिकीं काय सांगिजे । तुम्हांप्रति ॥४॥
तरी याचिलागीं तुमतें । म्यां राउळासि विनविलें
होतें । जे हा परमार्थु ध्वनितें । न बोलावा ॥५॥
परी मागील असो देवा । आतां प्रस्तुतीं उकलु
देखावा । सांगें दोहींमाजि बरवा । मार्गु कवण
॥६॥ जो परिणामींचा निर्वाळा । अचुंबितु ये
फळा । आणि अनुष्ठितां प्रांजळा । सावियाचि ७
जैसें निद्रेचें सुख न मोडे । आणि मार्गु तरी बहु-
साळ सांडे । तैसें सोहोकासन सांगडें । सोहपें
होय ॥८॥ येणें अर्जुनाचेनि बोलें । देवो मनीं
रिझले । मग होईल ऐकें म्हणितलें । संतोषोनियां
॥९॥ देखा कामधेनुऐसी माये । सदैवा जया
होये । तो चंद्रुही परी लाहे । खेळावया ॥१०॥
पाहें पां श्रीशंभूची प्रसन्नता । तया उपमन्यूचिया
आर्ता । काय क्षीराब्धि दूधभाता । देइजेचिना
॥११॥ तैसा औदार्याचा कुरुठा । श्रीकृष्ण आपु
जाहलिया सुभटा । कां सर्व सुखांचा वसौटा । तो-
चि नोहावा ॥१२॥ एथ चमत्कारु कायसा ।
गोसावी श्रीलक्ष्मीकांताऐसा । आतां आपुलिया स-
वेसा । मागावा कीं ॥१३॥ म्हणोनि अर्जुनें म्ह-
णितलें । तें हांसोनि येरें दिधलें । तेंचि सांगेन
बोलिलें । काय कृष्णें ॥१४॥

श्रीभगवानुवाच—

**संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।**
**तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥**

संन्यासः कर्मयोगः च उभौ निःश्रेयसकरौ ( स्तः ); तयोः
तु कर्मसंन्यासात् कर्मयोगः विशिष्यते. ॥२॥

तो म्हणे गा कुंतीसुता । हे संन्यासयोगु वि-
चारितां । मोक्षकरु तत्त्वता । दोनीही होती १५
तरी जाणानेणा सकळां । हा कर्मयोगु कीर प्रांज-
ळा । जैसी नाव स्त्रियां बाळां । तोयतरणीं ॥१६॥
तैसें सारासार पाहिजे । तरी सोहपा हाचि देखि-
जे । येणें संन्यासफळ लाहिजे । अनायासें ॥१७॥
आतां याचिलागीं सांगेन । तुज संन्यासियाचें
चिन्ह । मग सहजें हें अभिन्न । जाणसी तूं ॥१८॥

**ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न काङ्क्षति ।**
**निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥ ३ ॥**

यः न द्वेष्टि न काङ्क्षति, सः नित्यसंन्यासी ज्ञेयः. महा-
बाहो,(सः)हि निर्द्वंद्वः ( सन् ) बंधात् सुखं प्रमुच्यते. ॥३॥

तरी गेलियाची से न करी । न पवतां चाड
न धरी । जो सुनिश्चळु अंतरीं । मेरु जैसा १९
आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें
अंतःकरण । पार्था तो संन्यासी जाण । निरंतर २०

आहेत ७१ किंवा गीतारूप शहराला भोंवताली सातशें श्लोकांचा कोटच आहे, ह्मणून सर्व शास्त्रें गीतापुरांत वास करण्यास आलीं आहेत ७२ किंवा, आपला पति जो आत्मा, त्याला प्रेमानें आलिंगन देण्याकरितां गीता ही श्लोकरूपी बाहु पसरून आली आहे असें वाटतें. ७३ किंवा, गीतारूप कमळाचा गंध घेणारे हे श्लोक नसून भ्रमरच आहेत, अथवा हे श्लोक गीतारूप सागराच्या लाटाच आहेत, किंवा श्रीहरीचा गीतारूप रथ ओढणारे हे घोडेच आहेत ७४ किंवा गीता ही गंगा असून हिचे ठायीं सर्व श्लोकरूपी तीर्थें नरावतार अर्जुनरूपी सिंहस्थ पर्वणी आल्यामुळें मिळावयास आलीं आहेत ७५ किंवा हे श्लोक पंक्ति नसून, चित्ताला अचिंत्य जें ब्रह्म, त्याची प्राप्ति करून देणारे चिंतामणिच आहेत अथवा, कल्पनातीत जें ब्रह्म, तें प्राप्त करून देणारे हे कल्पतरूच आहेत ७६ असे हे सातशें श्लोक एकापेक्षा एक वरचढ आहेत तर यांत लहान मोठे अशा वेगळेपणानें कोणत्या श्लोकाचें वर्णन करावें? ७७ कामधेनूकडे बघितलें ह्मणजे जशी ती दुभती व आटलेली या गोष्टी संभवत नाहींत, ७८ दिव्यामध्यें अगोदरचा व मागचा कोणता, व सूर्याकडे पाहिलें ह्मणजे धाकटा किंवा मोठा हें समजत नाहीं, आणि अमृतसमुद्राला खोल किंवा उथळ हें ह्मणतां येईल काय? कारण, सर्वांचीं फळें एकच आहेत ७९ त्याप्रमाणें, गीतेच्या सातशें श्लोकांत पहिला व शेवटला हें म्हणतां येत नाहीं पहा कीं, सुवर्णपारिजातकाच्या पुष्पांत ताजीं व शिळीं असा भेद करतां येईल काय? १६८० आणि श्लोकांत कमजास्तपणा नाहीं याविषयीं काय सिद्ध करूं? परंतु या गीताशास्त्रामध्यें सांगणारा व ऐकणारा या दोघांत भेद नसून ते एकस्वरूपच आहेत ८१ कारण, या गीताशास्त्रांत श्रीकृष्ण सांगणारे व अर्जुन हा श्रीकृष्णरूपच ऐकणारा या गोष्टी सर्वांना ठाऊक आहेत ८२ या गीतेंत अर्थानें जें फल, तेंच पाठ करण्यानें घट लावून मिळतें, ह्मणून वाच्य व वाचक या दोघांनाही सारखीच योग्यता देणारें हें शास्त्र आहे ८३ म्हणून, त्या गीतेविषयीं जास्त सिद्ध करण्याचें राहिलें नाहीं कारण, गीता ही भगवंताची शब्दमय मूर्तिच आहे ८४ इतर शास्त्रांचें वाचन करून अर्थ समजल्यावर फलप्राप्ति झाली ह्मणजे तें शास्त्र नाहींसें होतें, तसें हें गीताशास्त्र नसून हें ओतप्रोत परब्रह्मस्वरूपच आहे. ८५ काय सांगावें! अर्जुनाचें निमित्त करून सर्व जगावर कृपा करण्याकरितां श्रीकृष्णांनीं दुर्लभ असा ब्रह्मानंद सुलभ करून ठेवला आहे ८६ जसा पूर्णकलायुक्त चंद्र चकोराच्या निमित्तानें प्रकाशित होऊन तिन्ही लोकांच्या तापाची निवृत्ति करितो, ८७ अथवा गौतमाच्या निमित्तानें, कलिकाळरूपी ज्वरानें पीडित झालेल्या जीवांच्या दोषाचा निवृत्ति होण्याकरितां श्रीभगवंतांनीं गंगा या मृत्युलोकीं पाठवून दिली, ८८ त्याप्रमाणें, पार्थरूपी वत्साचें निमित्त करून श्रीकृष्णरूपी गाईनें हें गीतारूप दूध देऊन सर्व जगाला संतोषित केलें ८९ या गीताशास्त्राचे ठिकाणीं जिवाभावानें बुडी घ्याल, तर गीतारूपच व्हाल, अथवा पाठरूपानें जिभेला जर रस घ्याल, तर गीतारूपच व्हाल १६९० परिसाचें सामर्थ्य असें आहे कां, तो लोखंडाचे एके बाजूस लागला असतां सर्व लोखंड आपोआप सुवर्णमय होतें, ९१ तशी गीतापाठरूपी वाटींतील एक श्लोकाचें पद मुखाला लावाल न लावाल, तोंच ब्रह्मत्वाची पुष्टि अंगांत येईल ९२ अथवा, गीता पाठ करण्याविषयीं तोंड वाकडें करून जर कुशीवर वळाल, तर तीं अक्षरें कानांत जरी पडलीं, तरी त्याचेंही फल तेंच येईल. ९३ गीतेचें औदार्य काय सांगावें, कारण जी आपल्या श्रवणानें, पाठानें व अर्थानें मोक्षाशिवाय दुसरें फळच देत नाहीं जसा समर्थ दाता कोणालाही विमुख लावीत नाहीं तशी ९४ म्हणून, जितके शहाणे आहेत, त्यांनीं एक गीतेच सेवन करावें. यावाचून इतर शास्त्रांचें सेवन करून काय प्राप्त होणार आहे? ९५ आणि श्रीकृष्ण व अर्जुन यांनीं जें गुप्ततें संभाषण केलें, तें श्रीव्यासांनीं हातांत घेतां येईल, तितकें सुलभ केलें. ९६ मुलाला आई प्रेमानें जेऊं घालण्यास बसली म्हणजे त्याला जसे गिळतां येतील तसेच लहान घास करिते, ९७ किंवा अफाट जो वायु तो आपल्या हातांत यावा, म्हणून शहाण्यांनीं जशी पंख्याची योजना केली, ९८ तसें शब्दानें जें कळावयाचें नाहीं, त्याचें अनुष्टुभ छंद करून, स्त्री, शूद्र आदिकरून सर्वांच्या बुद्धीला तें सुलभ करून ठेवलें ९९ स्वाती नक्षत्राच्या पाण्यापासून जर मोतीं उत्पन्न झालीं नसतीं, तर स्त्रियांचीं अंगें कशानें शोभिवंत झालीं असतीं? १७०० नादब्रह्म जर वाद्यांत आलें नसतें, तर नाद आपल्यास कसा कळला असता? फुलें जर नसतीं, तर वास कसा घेतां आला असता? १ पक्वान्नांत जर गोडी नसती, तर ती जिभेला कशी प्राप्त झाली असती? आरसा जर नसता, तर डोळ्याला आपलें रूप कसें पहातां आलें असतें? २ निराकार श्रीगुरु जर आकारास आले नसते, तर उपासकांना कशी सेवा करतां आली असती? ३ तसें अगणित जें ब्रह्म, तें गीतेच्या सातशें श्लोकांच्या रूपानें जर प्रकट झालें नसतें, तर कोणालाही जाणतां आलें असतें काय? ४ मेघ समुद्रांचेंच पाणी वर घेऊन वृष्टि करून सर्वांचा उपयोग करतो, तरी लोक मेघांचीच आशा करतात कारण, अमर्याद जो समुद्र, त्यापासून कोणाचाच उपयोग होत नाहीं ५ म्हणून, जें वाणीला देखील प्राप्त होत नाहीं, तें व्यासांनीं जर हे उत्तम श्लोक

हे श्लोक न होते बरवे । तरी कानें मुखें फावे ।
ऐसे का होतें ॥६॥ ह्मणोनि श्रीव्यासाचा हा थोरु ।
विश्वा जाला उपकारु । जे श्रीकृष्ण उक्ती आकारु ।
ग्रथाचा केला ॥७॥ आणि तोचि हा मी आतां ।
श्रीव्यासाचीं पदे पाहात पाहातां । आणिला
श्रवणपथा । मऱ्हाठिया ॥८॥ व्यासादिकाचे उ-
न्मेख । राहाटती जेथ साशक । तेथ मीही रंक
येक । चावळी करी ॥ ९ ॥ परी गीता ईश्वरु
भोळा । ले व्यासोक्तिकुसुममाळा । तरी माझिया
दूर्वादळा । ना न ह्मणे की ॥१७१०॥ आणि
क्षीरसिंधूचिया तटा । पाणिया येती गजघटा ।
तेथ काय मुरकुटा । वारिजत असे ॥११॥ पा-
खफुटें पाखिरू । नुडे तरी नभीच थिरु । गगन
आक्रमी सत्वरु । तो गरुडही तेथ १२ राजहंसाचे
चालणें । भूतळी जालिया शहाणें । आणिकें
काय कोणें । चालावेंचि ना ॥१३॥ जी आपु-
लेनि अवकाशें । अगाध जळ घेपे कलशें । चुळी
चूळपणाऐसें । भरूनि न निघे ॥१४॥ दिवटीच्या
आंगी थोरी । तरी ते बहु तेज धरी । वाती आपु-
लियापरी । आणीच की ना १५ जी समुद्राचेनि पैसें ।
समुद्री आकाश आभासे । थिल्लरी थिल्लराऐसें ।
बिंबेचि पै १६ तेवि व्यासादिक महामती । वावरों
येती इये ग्रंथी । मा आम्ही ठाकों हे युक्ती । न
मिळे कीर ॥१७॥ जिये सागरी जळचरें । संच-
रती मंदराकारें । तेथ देखोनि शफरें येरें । पोहों
न लाहती ॥१८॥ अरुण आंगाजवळिके । म्ह-
णोनि सूर्यातें देखे । मा भूतळीची न देखे । मुंगी
काई ॥१९॥ यालागी आम्हां प्राकृतां । देशि-
कारें बंधे गीता । म्हणणें हें अनुचिता । कारण
नोहे ॥१७२०॥ आणि बापु पुढां जाये । ते घेत
पाउलाची सोये । बाळ ये तरी न लाहे । पावों
काथी ॥२१॥ तैसा व्यासाचा मागोवा घेतु । भा-
ष्यकारातें वाट पुसतु । अयोग्यही मी न पवतु ।
कें जाईन ॥२२॥ आणि पृथ्वी जयाचिया क्षमा ।
नुबगे स्थावरजंगमा । जयाचेनि अमृतें चंद्रमा ।
निववी जग ॥२३॥ जयाचें आंगिक असिकें ।
तेज लाहोनि अर्कें । आंधाराचें साबाइकें । लोटि-
जत आहे ॥२४॥ समुद्रा जयाचें तोय । तोया
जयाचें माधुर्य । माधुर्या सौंदर्य । जयाचेनि २५
पवना जयाचें बळ । आकाश जेणें पघळ । ज्ञान
जेणें उज्वळ । चक्रवर्ती ॥२६॥ वेद जेणें सुभास ।
सुख जेणें सोल्लास । हें असो रूपस । विश्व जेणें
॥२७॥ जो सर्वोपकारी समर्थु । सद्गुरु श्रीनि-
वृत्तिनाथु । राहटत असे मजहीआंतु । रिघोनियां
॥२८॥ आतां आयती गीता जगी । मी सांगें
मऱ्हाटिया भगी । येथ के विस्मयालागी । ठावो
आहे ॥२९॥ श्रीगुरूचेनि नावें माती । डोंगरी
जयापासीं होती । तेणें कोळियें त्रिजगतीं । येक-
वद केली १७३० चंदनें वेधली झाडें । जाली
चदनाचेनि पाडें । वसिष्ठें मांडली की भांडे ।
भानूसी शाटी ॥३१॥ मा मी तंव चित्ताथिला ।
आणि श्रीगुरु ऐसा दादुला । जो दिठीवेनि आपु-
ळा । बैसवी पदी ॥३२॥ आधीचि देखणी दिठी ।
वरी सूर्य पुरवी पाठी । तै न दिसे ऐसी गोठी ।
कैंही आहे ॥३३॥ म्हणोनि माझे नित्य नवे ।
श्वासोश्वासही प्रबंध होआवे । श्रीगुरुकृपा काय
नोहे । ज्ञानदेवो म्हणे ॥३४॥ याकारणें मिया ।
श्रीगीतार्थ मऱ्हाठिया । केला लोकां यया । दि-
ठीचा विषो ॥३५॥ परी मऱ्हाटे बोलरंगें । कव-
ळिता पै गीतांगें । तै गातयाचेनि पागें । हेका-
डता नोहे ॥३६॥ म्हणौनि गीता गावों म्हणे ।
तै गाणिवे होती लेणें । ना मोकळे तरि उणें ।
गीताही आणित ॥३७॥ सुंदर आंगी लेणें न
सूये । तै तो मोकळा शृंगारु होये । ना लेइलें तरि
आहे । तैसें कें उचित ॥३८॥ कां मोतियांची
जैसी जाती । सोनयाही मान देती । नातरी मा-
नविली । अगेंचि सडी ॥३९॥ ना ना गुंफिली
कां मोकळी । उणी न होती परिमळीं । वसंता-

केले नसते, तर ऐकावयाला किंवा मुखानें तरी गणन करावयाला कसें आलें असतें ? ६ याकरिता, श्रीकृष्णाचा जी उक्ति ( संभाषण ), तिची गीतेच्या रूपानें व्यासांनी रचना केली, म्हणून सर्व जगतावर त्याचा मोठा उपकार झाला आहे-त्याच व्यासाच्या गीतेवर व्याख्यान केल्याबद्दल महाराज परिहार देतात -७आणि आता त्याच गीतार्थ मी व्यासाची पदें पाहून पाहून शुद्ध मराठी भाषेंत एकवाक्यता केली ८ ज्या गीतार्थाचें यथार्थ वर्णन करण्याविषयीं व्यासादिकाचें देखील ज्ञान साशंक होतें, त्या गीतेचें मी हें गरीबानें व्याख्यान केलें आहे. ९ परंतु गीतारूप ईश्वर हा अत्यंत भोळा आहे, म्हणून व्यासाच्या भाषणरूपी पुष्पमाला धारण करितो, व आमचे गरीबाचे दुर्वांकुरासही नाहीं म्हणत नाहीं, १७१० आणि क्षीरसमुद्राचे काठाला हत्तींचे समुदाय पाणी पिण्यास येतात, तेथें त्यांना तेवढी परवानगी असून, मुरकुटाला तो माघारी लावतो काय ? ११ पंख फुटतात न फुटतात अशा पाखराला जरी उडतां आलें नाहीं, तरी तें आकाशातच रहातें, व सर्व गगनाचें आक्रमण करणारा गरुडही त्या आकाशातच रहातो १२ राजहंसाची मंद गति सर्व जगतांत उत्तम असली, म्हणून दुसऱ्या कोणी चालू नये कीं काय ? १३ कलशांत पुष्कळ साठवण असल्यामुळें पुष्कळ पाणी मावतें, पण चूळ लहान असली तरी तिच्या मानानें तींत पाणी येत नाहीं काय ? १४ मशाल मोठी असल्यामुळें तिचें तेज मोठें पडतें, पण वात जरी लहान असली,तरी तिच्या मानानें तिचें तेज पडतें कीं नाहीं ? १५ समुद्राच्या विस्ताराप्रमाणें त्यात आकाशाचें प्रतिबिंब मोठें दिसतें, पण तें डबक्यातही डबक्याचे मानानें दिसतेंच, १६ त्याप्रमाणें, व्यासादिकाच्या महामतींनीं या ग्रंथाविषयीं विचार करावा, व आम्ही स्वस्थ बसावें, ही गोष्ट युक्तीला जुळत नाहीं १७ ज्या समुद्रामध्यें मंदराचलासारखे महान् महान् जलचर वास करतात, त्यांचे वैभव पाहून लहान माशानीं तेथें राहूंच नये की काय ? १८ अरुण हा सूर्याचे सन्निध आहे, म्हणून तो सूर्यास पहातो, आणि पृथ्वीवर जी लहान मुंगी आहे, ती त्याकडे पहात नाहीं कीं काय ? १९ यास्तव, आम्हीं प्राकृत जनानीं गीतेचें देशभाषेंत वर्णन केलें, ही गोष्ट अयोग्य आहे, असें म्हणण्याचें कारण नाहीं १७२० आणि बापाच्या मार्गानें लहान मूल जर चालूं लागलें, तर ज्या स्थानाला बाप गेला त्या स्थानाला तें पोहोंचू शकणार नाहीं काय ? २१ तसा मी व्यासाचा माग घेत आणि भाष्यकाराला वाट विचारीत चाललों असता, मी जरी अयोग्य आहें, तरी व्यास ज्या ठिकाणी गेले, त्या ठिकाणाला पावणार नाहीं तर कोठें जाईन ? २२ आणि ज्या परमेश्वराच्या क्षमेनें पृथ्वी स्थावरजंगम विश्वाचा उपद्रव सहन करते, व ज्या परमेश्वराच्या अमृतानें चंद्र सर्व जगाच्या तापाची निवृत्ति करून शांत करितो,२३ ज्या परमेश्वराच्या अंगच्या तेजानें सूर्याला तेज प्राप्त झालें आहे, म्हणून तो सर्व जगाला अंधारापासून प्राप्त होणार संकट दूर करतो, २४ ज्या परमेश्वराच्या सत्तेनें समुद्राला उदक मिळालें आहे, २५ व पाण्याला माधुर्य व माधुर्याला सौंदर्य प्राप्त झालें आहे, ज्या परमेश्वराच्या सत्तेनें वाऱ्याला गतिरूप बल, आकाशाला विस्तार, व ज्ञानाला उज्ज्वल सार्वभौमत्व प्राप्त झालें आहे, २६ ज्याच्या सत्तेनें वेदाला बोलण्याची शक्ति, सुखाला आनंदितपणा, हे असो; परंतु ज्याच्या योगानें सर्व विश्वाला रूप प्राप्त झालें आहे, २७ तो वस्तुमात्रावर उपकार करणारा समर्थ सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथ माझे अंतःकरणांत शिरून वास करीत आहे २८ तेव्हा आतां आयती तयार जी गीता, ती मी जगताला मराठी भाषेनें सांगण्यास समर्थ झालों आहें, यांत आश्चर्य तें काय ? २९ श्रीगुरूच्या नांवानें डोंगरावर मातीची द्रोणाचार्याची मूर्ति स्थापून त्याची सेवा करून एकलव्य कोळ्यानें आपले विद्येची कीर्ति त्रिजगतांत सर्वमान्य करून घेतली, १७३० चंदनाचे आसपास असलेले वृक्ष त्याच्या अंगच्या सुगंधानें सर्व चंदन होतात, व वसिष्ठानीं स्वीकारिलेली छाटी आपले तेजानें सूर्याबरोबर भांडूं लागली, ३१ मग मी तर गीताव्याख्यान करण्याविषयीं उत्सुक, त्यावर सद्गुरु साह्य करणारा, जो दृष्टीनें अवलोकन केल्याबरोबर आपलें स्वरूप देतो असा आहे, ३२ अगोदरच उत्तम दृष्टि असून त्यांत सूर्याचे तेजाची मदत मिळाल्यावर, मग दिसणार नाहीं अशी कोणती गोष्ट आहे ? ३३ म्हणून, श्रीज्ञानदेवमहाराज म्हणतात कीं, माझे तोंडातून निघणारे नवे श्वासोच्छ्वास देखील प्रबंध होतील, कारण श्रीगुरूच्या कृपेनें काय एक होणार नाहीं ? ३४ याकरिता मी गीतेचा अर्थ मराठींत अशा रीतीनें सोपा केला कीं, तो लोकांच्या नजरेनें पहाण्यास योग्य होईल ३५ परंतु मराठी भाषेंत गीतेचा अर्थ स्पष्ट केला आहे, तो जरी कोणी वक्ता नसला तरी नुसतीं वाचीलच वाचलीं असतां उदासीन न दिसता स्पष्टपणें समजतो. ३६ म्हणून, गीतेचें वक्तृत्व करणाराच्या बोलण्याला माझा अर्थ भूषणच होतात, व गाणारा नसला तरी नुसती वाचली असता, वक्ता जरी नसला तरी उणेपणा दिसत नाहीं ३७ दागिने सुंदर अंगावर न घालता नुसते जरी ठेविले, तरी ते जसे शोभिवंत दिसतात, अथवा ते जरी अंगावर घातले तरी शोभा देतातच, परंतु या दोन गोष्टी एके ठिकाणीं कधीं मिळतात ? ३८ किंवा मोत्याची जात अशी आहे कीं, तीं सोन्याला अनुकूल होऊन शोभा देतात, कदाचित् सोनें नसलें तरी तीं नुसतीं सडींच अंगानें शोभा देतात, ३९ अथवा वसंतऋतूंतील वाटोळीं मोगऱ्याचीं फुलें जशीं गुंफून गजरा केला अथवा मोकळीं घेतलीं,

गमीची वाटोळी । मोगरी जैसी ॥१७४०॥ तैसा गाणिवेतें मिरवी । गीतेवांणही रगु दावी । तो लाभाचा प्रबधु ओवी । केला मिय ॥४१॥ तेणें आबालसुबोधें । वोवीयेचेनि प्रबधें । ब्रह्मरससुस्वादें । अक्षरें गुथिली ॥४२॥ आता चदनाच्या तरुवरीं । परिमळालागी फुलवरी । पारुखणें जियापरी । लागेना की ॥४३॥ तैसा प्रबधु हा श्रवणी । लागतखेवो समाधि आणी । ऐकिलियाही वाखाणी । काय व्यसन न लवी ॥४४॥ पाठ करिता व्याजें । पाडिल्यें येती वेपजें । ते अमृतातें नेणिजे । फावलिया ॥४५॥ तैसेनि आइतेपणें । कवित्व जालें हें उपेणे । मनन निदिध्यास श्रवणें । जिंतिलें आतां ॥४६॥ हे स्वानंदभोगाची सेल । भलतयासीवि देईल । सर्वेंद्रियां पोषवील । श्रवणा करवी ॥४७॥ चंद्रातें आंगवणें । भोगूनि चकोर शाहाणे । परी फावे जैसें चांदिणें । भलतयाही ॥ ४८ ॥ तैसें अध्यात्मशास्त्री यियें । अतरंगचि अधिकारियें । परी लोकु वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥४९॥ ऐसें श्रीनिवृत्तिनाथाचें । गौरव आहे जी साचें । ग्रथु नोहे हें कृपेचें । वैभव तिये ॥१७५०॥ क्षीरसिधुपरिसरीं । शक्तीच्या कर्णकुहरीं । नेणों कै श्रीत्रिपुरारी । सागितलें जें ॥५१॥ तें क्षीरकल्लोळाआंतु । मकरोदरी गुप्तु । होता तयाचा हातु । पैठे जालें ॥ ५२ ॥ तो मत्स्येंद्र सप्तशृगी । भग्नावयव चौरगी । भेटला की तो सर्वांगी । संपूर्ण जाला ॥५३॥ मग समाधि अव्युत्थया । भोगावी वासना यया । ते मुद्रा श्रीगोरक्षराया । दिधली मीनी ॥५४॥ तेणें योगाब्जिनीसरोवरु । विषयविध्वंसैकवीरु । तिये पदीं कां सर्वेश्वरु । अभिषेकिली ॥५५॥ मग तिहीं तें शांभव । अद्वयानंदवैभव । संपादिलें सप्रभव । श्रीगहिनीनाथा ॥५६॥ तेणें कळिकळित भूतां । आला देखोनि निरुता । ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ॥ ५७ ॥ ना आदिगुरु शकरा-। लागोनि शिष्यपरंपरा । बोधाचा हा ससरा । जाला जो आमुतें ॥५८॥ तो हा तूं घेऊनि आघवा । कळी गिळितया जीवां । सर्व प्रकारी धावा । करी पां वेगीं ॥५९॥ आधींच तव तो कृपाळु । वरी गुरुआज्ञेचा बोलु । जाला जैसा वर्षाकाळु । खवळणें मेघा ॥१७६०॥ मग आर्तांचेनि वोरसें । गीतार्थग्रथनमिसें । वर्षला शातरसें । तो हा ग्रथु ॥६१॥ तेथ पुढा मी बापिया । माडला आर्ती आपुलिया । की यासाठीं येवढिया । आणिलों यशा ॥ ६२ ॥ एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें । तें ग्रथें बोधोनि दिधलें । गोसावी मज ॥ ६३ ॥ वांचूनि पढे ना वाची । ना सेवाही जाणे स्वामीची । ऐशिया मज ग्रथाची । योग्यता कें असे ॥६४॥ परी साचचि गुरुनाथें । निमित्त करूनि मातें । प्रबंधव्याजें जगातें । रक्षिलें जाणा ॥६५॥ तऱ्ही पुरोहितगुणें । मी बोलिलों पुरें उणें । तें तुम्ही माउलीपणें । उपसाहिजो जी ॥ ६६ ॥ शब्द कैसा वडिजे । प्रमेयी कैसें पां चढिजे । अळकारु म्हणिजे । काय तें नेणें ॥६७॥ सायिखडेयाचें बाहुलें । चालवित्या सूत्राचेनि चालें । तैसा मातें दावीत बोलें । स्वामी तो माझा ॥६८॥ यालागी मी गुणदोष- । त्रिषा क्षमाविना विशेष । जे मी सजात ग्रथलों देख । आचार्यें की ॥६९॥ आणि तुम्हां सतांचिये सभे । जें उणिवेंरीं ठाके उभें । ते पूर्ण नोहे तै लोभें । तुम्हांसीचि कोपे १७७० सिवतलियाही परिसें । लोहत्वाचिये अवदसे । न मुकिजे अनायासें । तै कवणा बोलु ॥ ७१ ॥ वोहळें हेंचि करावें । जे गंगेचें आंग ठाकावें । मगही गंगा जरी नोहावें । तै तो काय करी ॥ ७२ ॥ म्हणौनि भाग्ययोगें बहुवें । तुम्हां संतांचे मी पाये । पातलों आतां कें आहे । उणें जगीं ॥ ७३ ॥ अहो जी माझेनि स्वामी । मज सत जोडूनि तुम्ही । दिधलेति तेणें सर्वकामीं । परिपूर्ण जालों ॥ ७४ ॥ पाहा पां मातें तुम्हां सांगडें । माहेर तेणें सुरवाडें । ग्रंथाचें आ-

तरी त्याचें वासांत कमीपणा नसतो, १७४० तसा गाणारा भेटला तरी त्याला शोभा देतो, व गाणारा नसला तरी त्याचें तेज पडतें, असा सर्वलाभदायक मी हा ज्ञान-प्रबंधानें ग्रंथ केला आहे ४१ या ग्रंथांत आबालवृद्धांस समजण्याजोग्या ओंवीच्या प्रबंधानें सर्व ब्रह्मरसानें भरलेल्या अशा अक्षरांची योजना केली आहे ४२ चंदनाच्या झाडाजवळ गेल्यावर वास घेण्यास त्याला फुलें नाहींत म्हणून खिन्न होण्याचें कारण नाहीं, का कीं, त्याचें सर्वांग सुगंधमयच आहे. ४३ तसा हा माझा ग्रंथ श्रवणांत (कानांत) पडताक्षणींच समाधि आणितो, मग त्याचें व्याख्यान ऐकल्यावर तो पुन ऐकण्याविषयीं नाद लावणार नाहीं काय ? ४४ या माझ्या ग्रंथाचा पाठ करीत असतां जर वक्तृत्व केलें, तर त्यापासून उत्पन्न होणारी गोडी अमृतालाही मागें टाकते ४५ तसें हें अमृताहून सुरस आयतें कवित्व श्रीगुरुप्रसादानें उत्पन्न झालेलें, याच्या श्रवणानें मनन व निदिध्यास यांस जिंकिलें आहे ४६ हें वाटेल त्यास आत्मरूपाच्या आनंदाचा शेलका वांटा घेववील, व श्रवणाकडून सर्व इंद्रियांची तृप्ति करवील. ४७ आपल्या शक्तीनें चतुर चकोर पक्षी चंद्राचें अमृताचा जसा उपभोग घेतात, तसा मग ज्यांना उपभोग घेतां येत नाहीं, तरी चांदण्याचा उपभोग सर्वांस होतो. ४८ तसा या अध्यात्मशास्त्रापासून जितेंद्रिय पुरुष जे अधिकारी आहेत त्यांनाच त्यांत आनंद प्राप्त होतो, परंतु इतर लोकांना वाणीच्या सौंदर्यापासून सुख होतें ४९ अशा प्रकारचें श्रीगुरु निवृत्तिनाथांचें खरें ऐश्वर्य आहे, म्हणून हा माझा ग्रंथ नसून त्यांच्या कृपेचें वैभवच होय. १७५० क्षीरसिंधूच्या पलीकडे पार्वतीचे कानांत श्रीशंकरानीं जें ज्ञान सांगितलें,–केव्हां सांगितलें तें माहीत नाहीं.–५१ तें ज्ञान, क्षीरसमुद्रामध्यें माशाचे पोटांत जे मत्स्येंद्रनाथ गुप्तरूपानें होते त्यांना प्राप्त झालें. ५२ ते मत्स्येंद्रनाथ सहज संचार करितां करितां सप्तशृंगावर आले तेथें ज्याचे अवयव भंगलेले होते, असे चौरंगीनाथ, हे मत्स्येंद्रनाथांचें दर्शन होण्याबरोबर सर्व अवयवांनी परिपूर्ण झाले. ५३ मग, त्या अचळ समाधीचा उपभोग घ्यावा या इच्छेनें ते आपलें ऐश्वर्य मत्स्येंद्रनाथांनीं गोरक्षनाथास दिलें. ५४ त्या मत्स्येंद्रनाथांनीं योगरूप कमलिणी धारण करणारें सरोवर व विषयविध्वंस करण्याविषयीं महाशूर असे जे गोरक्षनाथ, त्यांजला आपले योगैश्वर्याचे पदावर बसवून राज्याभिषेक केला ५५ त्यानंतर, शंकरापासून परंपरेनें आलेलें जें अद्वयानंदसुख, तें गहिनीनाथ यांनी गोरक्षनाथापासून संपूर्ण संपादन केलें. ५६ मग, कलीनें सर्व भूतांचा ग्रास केलेला आहे असें पाहून गहिनीनाथांनीं श्रीनिवृत्तिनाथांना अशी आज्ञा केली ५७ कीं, आदिगुरु शंकरापासून शिष्यपरंपरेनें जें हें योगाचें ऐश्वर्य आमचे कुळांत प्राप्त झालें आहे, ५८ तें तूं घेऊन कलीनें ग्रस्त केलेले जिवांना दुःखापासून सर्व प्रकारें मुक्त कर ५९ अगोदर श्रीनिवृत्तिनाथ हे दयाळ असून त्यांत श्रीगुरूंची आज्ञा झाल्यावर परमानंद झाला. जसा मेघ वृष्टि करण्याविषयीं स्वतः उत्सुक असून त्यांतच वर्षाकाल आल्यावर तो अलोट खवळतो तसा १७६० मग, पीडित झालेल्या जनाला दुःखापासून सोडवावें या कळकळीने गीतेचा अर्थ करण्याचे मिषानें ब्रह्मरसाचा जो त्यांनी वर्षाव केला, तो हा ग्रंथ होय ६१ तेथें मी चातकासारखा गुरूचा प्रसाद प्राप्त व्हावा, अशी इच्छा करून बसलेला अनन्य शिष्य पाहून मजवर त्यांनीं कृपा केली, म्हणून मी या यशास प्राप्त झालों. ६२ अशा प्रकारेंकरून गुरुपरंपरेनें प्राप्त झालेलें समाधिधन एके ठिकाणीं बांधून श्रीनिवृत्तिनाथांनीं मजला दिलें ६३ एऱ्हवीं, मी अध्ययन केलें नाहीं व कांहीं ऐकलेंही नाहीं, व तसेंच स्वामींची सेवा करण्याचेंही मला ज्ञान नाहीं, मग ग्रंथ करण्याची योग्यता कोठून येणार ? ६४ परंतु वास्तविक पाहिलें असतां, श्रीगुरूंनीं माझें निमित्त करून जो ग्रंथ केला, त्या योगानें सर्व जगाचें संरक्षण झालें आहे ६५ याजकरितां, मी पुरोहिताप्रमाणें जें कांहीं न्यूनाधिक बोललों असेन, तें तुम्ही आईप्रमाणें सहन करा ६६ शब्दाची रचना कशी करावी व त्याचा अर्थ कसा चढता असावा, व अलंकार कशाला म्हणतात, हें मला माहीतही नाहीं ६७ कळसूत्री बाहुलें जसें सूत्रधारानें हालविल्याप्रमाणें हालतें, तसें माझ्या गुरूंनी जें जें अंतःकरणांत प्रकाशित केलें तें मी बोलला, ६८ म्हणून, माझ्या ग्रंथांतील गुणदोष सहन करा, असें मी म्हणत नाहीं, कारण माझ्या गुरूंनीं मजजवळ ठेविलेला जागड ग्रंथ मी आपल्यापुढें मांडला आहे ६९ आणि तुम्हां संतजनांच्या सभेंत एखाद्या गोष्टीचा उणेपणा नाहींसा न होईल, तर लडिवाळपणें मी तुमच्यावर रागावेन १७७० लोखंडाचा कमीपणा परिसाच्या स्पर्शानें जर सहज नाहींसा होणार नाहीं, तर त्याचा दोष कोणाकडे येईल ? ७१ ओहोळानें इतकेंच करावें कीं, गंगेस जाऊन मिळावें, मग जर त्याला ती आपल्यांत स्वीकार करून न घेईल (पवित्र न करील), तर त्याच्याकडे काय दोष आहे ? ७२ म्हणून महद्भाग्याच्या योगानें मी तुम्हां संतजनांच्या पायांजवळ आलों आहें, तर आतां या जगतांत मला काय कमी आहे ? ७३ अहो, काय सांगावें ! माझ्या गुरूंनीं तुम्हां संतजनांची भेट करून दिली, त्या योगानें माझ्या सर्व इच्छा परिपूर्ण झाल्या आहेत ७४ पहा कीं, तुमचेसारखें अनुकूल माहेरघर मला मिळालें, म्हणून हा ग्रंथ करण्याचा

ळियाडें । सिद्धी गेलें ॥७५॥ जी कनकाचें नि-
खळ । वोतू येईल भूमंडळ । चिंतारत्नीं कुळाचळ ।
निर्मू येती ॥७६॥ सातांही हो सागरांतें । सोंपे
भरितां अमृतें । दुवाड नोहे तारांतें । चंद्र करितां
॥७७॥ कल्पतरूचे आराम । लावितां नाहीं वि-
षम । परी गीतार्थाचें वर्म । निवडूं नये ॥७८॥
तो मी येकु सर्व मुका । बोलोनि मऱ्हाटिया
भाषा । करीं डोळेवरी लोकां । घेवों ये ऐसें ७९
हा ग्रंथसागरु येव्हडा । उतरोनि पैलीकडा । की-
र्तिविजयाचा धेंडा । नाचे जो का ॥१७८०॥
गीतार्थाचा आवारु । कलशेंसी महामेरु । रचूनि
माजीं श्रीगुरु- । लिंग जें पूजी ॥८१॥ गीता
निष्कपट माय । चुकोनि तान्हें हिंडे जें वाय । ते
मायपूता भेटी होय । हा धर्म तुमचा ॥८२॥
तुम्हां सज्जनांचें केलें । आकळुनी जी मी बोलें ।
ज्ञानदेव म्हणे थेंकुलें । तैसें नोहे ॥८३॥ काय
बहु बोलों सकळा । मेळविलों जन्मफळा । ग्रंथ-
सिद्धीचा सोहळा । दाविला जो हा ॥८४॥ मियां
जैसजैसिया आशा । केला तुमचा भरंवसा । ते
पुरवूनि जी बहुवसा । आणिलों सुखा ॥८५॥
मजलागीं ग्रंथाची स्वामी । दुजी सृष्टी जे हे केली
तुम्हीं । ते पाहोनि हासों आम्हीं । विश्वामित्रा-
तेंही ॥८६॥ जे असोनि त्रिशंकुदोषें । धातयाही
आणावें वोसें । तें नासतें कीजे की ऐसें । नि-
र्मावें नाहीं ॥८७॥ शंभू उपमन्यूचेनि मोहें ।
क्षीरसागरुही केला आहे । येथ तोही उपमेसरी
नोहे । जे विषगर्भ कीं ॥८८॥ अंधकारु निशा-
चरां । गिळितां सूर्ये चराचरां । धांवा केला तरी
खरा । ताउनी कीं तो ॥८९॥ तातलिया जगा-
कारणें । चद्रें वेंचिलें चांदणें । तया सदोषा केवि
म्हणें । सारिखें हें ॥१७९०॥ म्हणोनि तुम्ही
मज संतीं । ग्रंथरूप जो हा त्रिजगती । उपयोग
केला तो पुढती । निरुपम जी ॥९१॥ किंबहुना
तुमचें केलें । धर्मकीर्तन हें सिद्धी नेलें । येथ माझें
जी उरलें । पाईकपण ॥९२॥ आतां विश्वात्मकें
देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें । तोषोनि मज द्यावें ।
पसायदान हें ॥९३॥ जे खळाची व्यकटी सांडो ।
तया सत्कर्मीं रती वाढो । भूतां परस्परें पडो ।
मैत्र जीवाचें ॥९४॥ दुरिताचें तिमिर जावो ।
विश्व स्वधर्मसूर्यें पाहो । जो जें वांछील तो तें
लाहो । प्राणिजात ॥९५॥ वर्षत सकळमंगळीं ।
ईश्वरनिष्ठांची मांदियाळी । अनवरत भूतळीं । भेटतु
यां भूतां ॥९६॥ चलां कल्पतरूंचे अरव । चे-
तना चिंतामणीचे गांव । बोलते जे अर्णव । पी-
यूषाचे ॥९७॥ चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे
तापहीन । ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु
॥९८॥ किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं
लोकीं । भजिजो आदिपुरुषीं । अखंडित ॥९९॥
आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें । दृष्टादृष्ट-
विजयें । होआवें जी ॥१८००॥ तेथ म्हणे श्री-
विश्वेशरावो । हा होईल दानपसावो । येणें वरें
ज्ञानदेवो । सुखिया झाला ॥१॥ ऐसें युगीं परी
कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं । श्रीगोदावरीच्या
कूलीं । दक्षिणलिंगीं २ त्रिभुवनैकपवित्र । अनादि पंच-
क्रोशक्षेत्र । जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे
३ तेथ यदुवंशविलासु । जो सकळकळानिवासु न्या-
यातें पोषी क्षितीशु । श्रीरामचंद्र ४ तेथ महेशान्व-
यसंभूतें । श्रीनिवृत्तिनाथसुतें । केलें ज्ञानदेवें गीते ।
देशीकार लेणें ॥५॥ एवं भारताच्या गांवीं ।
भीष्मनाम प्रसिद्ध पर्वीं । श्रीकृष्णार्जुनीं बरवी ।
गोठी जे केली ॥६॥ जें उपनिषदांचें सार । सर्व
शास्त्रांचें माहेर । परमहंसीं सरोवर । सेविजे जें
॥७॥ तिये गीतेचा कळसु । संपूर्ण हा अष्टादशु
म्हणे निवृत्तिदासु । ज्ञानदेवो ॥८॥ पुढती पुढती
पुढती । इया ग्रंथ पुण्यसंपत्ती । सर्वसुखीं सर्व-
भूतीं । संपूर्ण होइजे ॥९॥ शके बाराशतें बारो-
त्तरें । तै टीका केली ज्ञानेश्वरें । सच्चिदानंदबाबा
आदरें । लेखकु जाहला ॥१८१०॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायांअष्टाद-
शोऽध्याय ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

माझा छंद सिद्धीस गेला ७५ एव्हां सर्व पृथ्वी निर्मळ सोन्याची करतां येईल, व कुळपर्वत चिंतामणीचे करितां येतील, ७६ सात समुद्र अमृतानेंही भरण्याचें सोपें आहे तारांना चंद्र करणें हेंही कठीण नाहीं, ७७ कल्पतरूंचे बाग लावण्यांत कांहीं कठिण नाहीं, या मागील लेख्या सर्व गोष्टी तपाच्या बळानें करतां येतील, परंतु गीतेच्या अर्थाचें वर्म गुरुप्रसादाशिवाय समजावयाचें नाहीं. ७८ तो मी सर्व प्रकारें मुका असून, गुरूच्या कृपेनें गीतेचा अर्थ मराठींत अशा रीतीनें केला आहे कीं, सर्व लोकांना प्रत्यक्ष डोळ्यांनीं दिसावा, ७९ व त्याच्याच कृपेनें एवढा ग्रंथरूपी सागर तरून पलीकडे कीर्तिरूप विजयाचा झेंडा नाचविला १७८० गीतेचें अर्थरूप देवालय अठरावे अध्यायरूपी कळसामुद्धां रचून त्यांत श्रीगुरूचें लिंग स्थापन करून त्याची पूजा केली ८१ गीता ही निष्कपट आई असून, मुमुक्षु हीं जीं तिचीं लहान पोरें, त्यांची व तिची चुकामुक पडून जीं तीं सैरावैरा हिंडतात, त्या मायलेकरांची गांठ पाडणें, हा तुम्हां संतजनांचा धर्म आहे ८२ महाराज म्हणतात कीं, तुम्हां संतजनांनीं जी कृपा केली, व त्यामुळें मी जें बोललों, तें अल्प नव्हे ८३ फार काय सांगूं ! हा ग्रंथ शेवटास गेल्यामुळें मला माझ्या सर्व पूर्वजन्मांचें फळ तुम्हीं प्राप्त करून दिलें आहे ८४ मी तुमच्यावर भरंवसा टेकून जी जी इच्छा केली ती सर्व तुम्हीं पुरवून मी सुखास पात्र झालों. ८५ हे गुरो, तुम्हीं माझ्याकरितां जी गीतार्थरूपी ग्रंथाची नवी सृष्टि केली, ती पाहून आम्ही विश्वामित्राच्या सृष्टीला हसतों ८६ कारण, ती नाशवंत सृष्टि त्रिशंकु राजाचे उद्देशानें ब्रह्मदेवास कमीपणा आणावा, या हेतूनें विश्वामित्रांनीं उत्पन्न केली, तशी ही आपण केलेली सृष्टि नाशवंत नसून शाश्वत आहे. ८७ शंकरांनीं आपला भक्त उपमन्यु याच्या ममतेनें त्याच्याकरितां क्षीरसागरही उत्पन्न केला, तो जर या ग्रंथाच्या बरोबर आहे म्हणावें, तर तो विषगर्भ आहे, ( समुद्रमंथनाचे वेळेस त्याच्यांतून हलाहल विष निघालें ) ८८ प्राणिमात्राला अंधकार व निशाचर यांची पीडा होऊं नये म्हणून त्यांनीं धावा केला असतां, सूर्यानें त्यांच्या दुःखाचा आपले तेजानें परिहार केला खरा, परंतु त्याच्या तेजाचे उष्णतेनें जीवमात्राला त्रास होतो, हा त्याच्यांत कमीपणा आहे. ८९ तप्त झालेल्या जगास चंद्रानें आपल्या चांदण्यानें शांत केलें, तो चंद्र कलंकानें युक्त आहे, म्हणून त्या दोषयुक्त चंद्रासारखा हा ग्रंथ आहे, असें कसें म्हणावें १७९० याकरितां, तुम्हीं संतजनांनीं माझ्याकडून त्रैलोक्याला उपयोग व्हावा म्हणून जो ग्रंथ करविला, तो अनुपम आहे ९१ फार काय मागावें ! तुमच्या कृपेनें सर्वांना ज्ञानानें जय प्राप्त झाले, तर माझें आतां इतकेंच काम राहिलें आहे कीं, आपली सेवा करावी ९२ आतां, यावर, विश्वरूप सद्गुरु यांना माझ्या वाग्यज्ञेंकरून संतुष्ट होऊन मजला हा प्रसाद द्यावा ९३ कीं, दुष्टांचा कुटिलपणा जाऊन त्यांना सत्कर्माची प्रीति उत्पन्न होवो, व जीवमात्रांचा एकमेकांवर मैत्री वाढो. ९४ या सर्व विश्वामधील पापरूपी अंधकार नाहींसा होऊन स्वधर्मरूपी सूर्य उगवून त्याचा प्रकाश होवो, आणि प्राणिमात्राच्या ज्या ज्या इच्छा असतील त्या त्या पूर्ण होवोत ९५ या भूतलावर अखिल मंगलाचा वर्षाव करणाऱ्या भगवद्भक्तांच्या समुदायाची सर्व भूतांना सद्भावेंकरून सदोदित भेट होवो ९६ ते भक्तजन कसे आहेत, तर चालतेबोलते कल्पतरूंचे बाग, जिवंत चिंतामणीचे गांव, किंवा अमृताचे चालतेबोलते समुद्रच होत ९७ जे कलंकरहित प्रतिचंद्र, संसाररूपी अंधकार दूर करून शांतिसुख देणारे प्रतिसूर्य असे भगवद्भक्त, ते सकल जीवांना प्रिय होवोत ९८ फार काय मागावें ! सर्व त्रैलोक्य सुखानें परिपूर्ण होऊन प्राणिमात्राला हरीचें अखंड भजन करण्याची इच्छा होवो ९९ आणि या ग्रंथावरच ज्यांचें उपजीवन आहे, त्यांना इहलोकचें व परलोकचें सुख प्राप्त होवो १८०० तेव्हां सद्गुरु प्रसन्न होऊन म्हणाले कीं, तुझ्या म्हणण्याप्रमाणें सर्व होईल असें वरप्रदान मिळाल्यानें महाराज फार संतोषित झाले १ याप्रमाणें कलियुगामध्यें, महाराष्ट्र देशांत, श्रीगोदावरीच्या दक्षिण तीरास, २ त्रैलोक्यांत पवित्र व अनादि पंचक्रोश क्षेत्र नेवासें, ज्या ठिकाणीं सर्व जगताचें जीवनसूत्र श्रीमोहनीराज आहेत, ३ त्या क्षेत्रांत, सकल कलांनीं संपूर्ण, व पृथ्वीचे धनी व न्यायानें प्रजेचें पालन करणारा यदुकुलास भूषण देणारा रामराजा राज्य करीत होता, ४ त्या वेळेस ज्या श्रीनिवृत्तिनाथ महाराजांची परंपरा श्रीशंकरापासून आहे, त्यांचे शिष्य ज्ञानदेव यांनीं श्रीमद्भगवद्गीतेस मराठी भाषेचें लेणें केलें ५ याप्रमाणें भारतांतील प्रसिद्ध भीष्मपर्वांत श्रीकृष्णार्जुनाचा जो उत्तम संवाद झाला, ६ जे उपनिषदांचें सार असून सर्व शास्त्रांचें माहेर व परमहंस साधूंचें क्रीडा करण्याचें सरोवरच होय, ७ त्या गीतेचा अठरावा अध्याय हा कळस आहे, असें श्रीनिवृत्ति महाराजांचे शिष्य ज्ञानदेव म्हणतात. ८ उत्तरोत्तर या ग्रंथाच्या पुण्यरूप संपत्तीनें जीवमात्राला सर्व सुखाचा पूर्ण लाभ होवो ९ शके १२१२ मध्यें ही टीका ज्ञानेश्वरमहाराजांनीं वरून सच्चिदानंदबाबांनीं अति आदरानें लिहिली. १८१०

**श्रीएकनाथ महाराजांनीं ज्ञानेश्वरी ग्रंथ संशोधन केल्यानंतर ज्ञानेश्वरीसंबंधानें केलेल्या ओंव्या.**

श्रीशके पंधराशें साहोत्तरीं । तारणनामसंवत्सरीं । येकाजनार्दन अत्यादरीं । गीता-ज्ञानेश्वरी प्रति शुद्ध केली ॥१॥ ग्रंथ पूर्वींच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध । तो शोधूनिया एवंविध । प्रतिशुद्ध सिद्धज्ञानेश्वरी ॥२॥ नमो ज्ञानेश्वरा निष्कळंका । जयाची गीतेची वाचितां टीका । ज्ञान होय लोकां । अतिभाविकां ग्रंथार्थियां ॥३॥ बहुकाळपर्वणी गोमटी । भाद्रपदमास कपिलाषष्ठी । प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेखनकामाठी संपूर्ण जाली ॥४॥ ज्ञानेश्वरीपाठीं । जो ओंवी करील मऱ्हाटी । तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥५॥

शके १५०६ तारण नाम संवत्सरांत जनार्दनमहाराजांचे शिष्य एकनाथ स्वामी यांनीं गीता-ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध केली. १ ग्रंथ मूळचाच अति शुद्ध होता, परंतु लोकांच्या पाठभेदानें कोठें कोठें अबद्ध झाला होता, तो पाहून ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध केली. २ ज्यांची गीतेवरील टीका वाचली असतां, भाविक वाचणाराला गीतेचें संपूर्ण ज्ञान होतें, त्या निष्कलंक ज्ञानेश्वरमहाराजांस नमस्कार असो. ३ पुष्कळ कालानें प्राप्त होणारा जो उत्तम कपिलाषष्ठीचा योग भाद्रपद वद्य षष्ठी, त्या दिवशीं गोदेच्या तीरीं पैठण क्षेत्रांत ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध करण्याचें काम समाप्त झालें. ४ ज्ञानेश्वरीचे पाठांत जो महाराष्ट्र भाषेत ओंवी करून घालील, त्यानें अमृताचे ताटांत नरोटी ठेवल्याप्रमाणें होईल, असें समजावें. ५



तुम्ही आहात, तुम्हांला असा परिहार देण्यास जागाच नाहीं. कारण, भगवान मुरारी जो कृष्ण, ह्यानी गीतेमध्यें जे काहीं अभिप्राय गुप्त ठेविले आहेत, ते प्रगट करण्याविषयी त्यानीच तुम्हास आज्ञा केली आहे. म्हणून ते देवाचे मनोगत जाणून मूढ लोकाना स्पष्ट समजण्या करताच तुम्हीं व्याख्यान वाढवीत आहात, त्यात दोष असा काहीच नाही. ही तुह्मास भगवन्मनोगताची आठवण दिली, तर तुम्हास भगवत्प्रसादाची आठवण होऊन कंठ दाटून येईल. असो. ह्या प्रथावरून आम्ही जें वर विधान केले आहे कीं, यथार्थ व्याख्यान ज्ञानेश्वरमहाराजानीं करावें असें देवाचे मनोगत होतें, त्याची सत्यता ह्यावरून पटते. ज्यानी उपनिषदें, ब्रह्मसूत्रे वाचिली आहेत त्यास असें समजून येईल की, त्या दोन्हींचेंही तात्पर्य गीतेत व्यासानी आणिलें आहे. सर्व वेदाचे तात्पर्य, जीवब्रह्म ह्याचे ऐक्य आहे, व तसे जीवब्रह्माचें ऐक्यज्ञान जीवास गुरुद्वारा जेव्हा प्रत्यक्ष होईल तेव्हा तो जन्ममरण व तदंतर्गत सर्व दुःखापासून मुक्त होईल हें आहे. वेदाचें हेच तात्पर्य आहे असे जर मानिलें, तर कर्म व उपासनाप्रतिपादक जो वेदभाग तो व्यर्थ होईल; अशी शंका शास्त्रसंस्कारी बहुत लोकानाही होईल, हे जाणूनच प्रथम अध्यायाच्या प्रथम पादाचे "तत्तु समन्वयात्" ह्या सूत्रात सर्व वेदवचनाचा सम्यक् अन्वय साक्षात् किंवा परंपरेनें ब्रह्मप्रतिपादनामध्येच होत आहे असें सांगितलें आहे. वेद प्रमाण मानणारे काही लोक असेही म्हणतात की, वेदच द्वैतप्रतिपादन करीत आहे, जीव, ईश्वर, जगत् हे सत्य आहेत. कारण, सत्य असल्यावाचून कर्मउपासनाप्रतिपादक वाक्यांची वाट काय ? त्याचे समाधान एवढेच कीं, परमात्म्याचे अज्ञानकालीं जीवजगदादि सत्य आहेत, ज्ञानकालीं नाहींत. वेद द्वैत प्रतिपादनही करीत नाहीं, किंतु प्रत्यक्ष प्रमाणानें जीवानी गृहित जे द्वैत, त्याचें अनुवादपूर्वक खंडन करून अद्वैतच प्रतिपादन करीत आहे. ह्याजविषयीं भगवान् शंकराचार्यांनीं एका ठिकाणी असे लिहिले आहे की—

**प्रत्यक्षाद्यनवगतं श्रुत्या प्रतिपादनीयमद्वैतं । द्वैतं न प्रतिपाद्यं तस्य स्वयमेव सिद्धत्वात् ॥**

भावार्थ असा आहे की, प्रत्यक्षादि प्रमाणेकरून कळत नाहीं असें जे अद्वैततत्त्व, तेंच श्रुतीला प्रतिपाद्य विषय आहे; द्वैत हे प्रतिपादनाला योग्य विषयच नाहीं. कारण, तें स्वतःसिद्ध आहेच, त्याची सिद्धी कशाला करावयाला पाहिजे ? सिद्ध पदार्थाची सिद्धी करून करावयाचे काय ? ऋग्वेदादि हेच मुख्य शास्त्र होय. शास्त्र शब्दाचा मुख्य अर्थ शासन करणें तें वेदामध्यें आहे. पहा की, ब्राह्मणांनी संध्यावंदन यज्ञयागादि करावेत, अशा आज्ञा आहेत, म्हणून ब्राह्मणाचीं संध्यावंदनादि कर्में चाललीं आहेत, किंवा निदान मागें चालत होतीं, कोणत्याही भूतांचा घात करू नये, केल्यास प्रायश्चित्त आहे, वगैरे गोष्टी त्यांत आहेत; म्हणून तें शास्त्र होय. शिवाय अज्ञातज्ञापकत्व शास्त्रास असतें. जी गोष्ट जीवाना दुसऱ्या कोणत्याही प्रमाणानें कळत नाही, ती त्यांनी कळवून द्यावयाची. द्वैत जर जीवाना प्रत्यक्ष प्रमाणानें ज्ञात आहे, तर त्याचे प्रतिपादन करणारी श्रुती पाहिजे कशाला; ह्मणून श्रुती जीवाना अज्ञात जें अद्वैततत्त्व तेंच प्रतिपादन करीत आहे व हाच अर्थ वरील "तत्तु समन्वयात्" ह्या सूत्रात असून त्याचाच सर्व सूत्रांमध्यें विस्तार आहे. आणि त्या ब्रह्मज्ञानानें जर सर्व दुःखाचा समूळ नाश होतो, तर ज्या वेळीं अर्जुन युद्ध करण्याकरिता आपण होऊन संग्रामात गेला आणि तेथें उभयपक्षांमध्यें एकगोत्रीच पा-

हून आपण जर गोत्रवध केला तर महापाप आपले हातून होईल, व अनंत जन्मपावेतों दुःख भोगण्याचा प्रसंग येईल. म्हणून युद्धापासून माघारी फिरावें, असें त्याचे मनांत आलें. आपला सल्लामसलतगार श्रीकृष्ण भगवान जवळच होता, त्यास त्यानें आपला हेतू कळविला, गोत्रजांचे मोहामुळें अर्जुनास अतिशय दुःख होत आहे, वगैरे सर्व गोष्टी देवाच्याही मनांत आल्या; आणि ह्या सर्व अनर्थांचें कारण जें आपल्या स्वरूपाचें अज्ञान तें नाश करणारें ब्रह्मात्मैक्यज्ञानच सांगितलें पाहिजे त्यावांचून समूळ दुःखनाश होणार नाहीं, असा विचार करून अध्यात्मविद्या सांगण्यास दुसऱ्या अध्यायाच्या " अशोच्यानन्वशोचस्त्व " ह्या ११ वे श्लोकापासून ब्रह्मविद्या सांगण्यास प्रारंभ केला. त्या विद्योपदेशामध्यें केवळ अर्जुनाचाच शोक निवृत्त करावा असा हेतु नव्हता, तर सर्व जीवाच्या संसारदुःखाचें बीजभूत जे शोकमोहादि दोष, त्यांनीं बहुतेक सर्व प्राण्यांची विवेकबुद्धि नष्ट झालेली असते आणि त्यामुळें स्वाभाविकच स्वधर्मत्याग व परधर्मस्वीकार करण्यास प्रवृत्त होऊन त्यापासून अनर्थपरंपरा ज्याचेवर ओढवते, अशा सर्व जीवांवर उपकार करण्याकरितां अर्जुनाचें निमित्त करून ह्या शास्त्रास आरंभ केलेला असून शेवटीं 'अज्ञानापासून उत्पन्न झालेला मोह नष्ट झाला काय ?' ह्मणून शेवटचा देवाचा अर्जुनास प्रश्न आहे, व 'आपल्या प्रसादानें माझा मोह नष्ट झाला' असें अर्जुनाचें उत्तर आहे. नाहींतर सर्व जगाच्या बुद्धीचा प्रेरक जो श्रीकृष्ण भगवान ह्याला अर्जुनास युद्धास प्रवृत्त करण्याची बुद्धी देण्याचें मोठेसें अवघड नव्हतें. परंतु तसें न करितां सर्व जगाचें नित्य व निरतिशय कल्याण करण्याचा मुख्य हेतु होता असेंच सिद्ध होतें. ह्यावरून मोह व त्याचें बीज अज्ञान नष्ट करण्यांतच गीताशास्त्राचें मुख्य तात्पर्य आहे. असा भगवान् शंकराचार्यांचा अभिप्राय आहे, व त्याप्रमाणेंच ज्ञानेश्वरमहाराजांचाही अभिप्राय आहे.

जे गीतार्थाचें चांगावें। मोक्षोपायपर आघवें। आन शास्त्रोपाय कीं नव्हे। प्रमाणसिद्ध १२३०

वारा आभाळाचें फेडी। वांचूनि सूर्यातें न घडी। का हातू बाबुळी धाडी। तोय न करी १२३१

तैसा आत्मदर्शनीं आडळु। असे अविवेकाचा जो मळु। तो शास्त्र नाशी येरु निर्मळु। मी प्रकाशें स्वयें॥

म्हणौनि आघवींचि शास्त्रें। अविद्याविनाशाचीं पात्रें। वांचोनि न होती स्वतंत्रें। आत्मबोधीं ३३

तया अध्यात्मशास्त्रासीं। जें साचपणाची ये पुसी। तें येइजे जया ठायासी। तें हे गीता ३४

भानु भूषिता प्राचिया। सतेजा दिशा आघविया। तैसी शास्त्रेश्वरा गीताया। सनाथें शास्त्रें ३५

हें असो येणें शास्त्रेश्वरें। मागां उपाय बहुवे विस्तारें। सांगितला जैसा करें। वेवो ये आत्मा ३६

परि प्रथमश्रवणासवें। अर्जुना विपायें हें फावे। हा भावो सकणवें। धरूनि श्रीहरी ॥३७॥

तेंचि प्रमेय एकवेळ। शिष्यीं होआवया अढळ। सांगतसे मुकुळ। मुद्रा आतां ॥ ३८ ॥

आणि प्रसंगें गीता। ठावोही हा सपता। म्हणौनि दावी आद्यंता। एकार्थत्व ॥ ३९ ॥

जे ग्रंथाच्या मध्यभागीं। नानाअधिकारप्रसंगीं। निरूपण अनेगीं। सिद्धांतीं केलें ॥ ४० ॥

तरी तेतुलेंहि सिद्धांत। इये शास्त्रीं प्रस्तुत। हे पूर्वापर नेणत। कोण्ही जैं मानी ॥ ४१ ॥

तैं महासिद्धांताचा आवांका। सिद्धांतकक्षा अनेका। भिडऊनि आरंभु देखा। संपवीतु असे ४२

**एथ अविद्यानाशु हें स्थळ। तेणें मोक्षोपादान फळ। या दोहीं केवळ। साधन ज्ञान ४३**

**हे इतुलेंचि नानापरी। निरूपिलें ग्रंथविस्तारीं।** ते आतां दोहीं अक्षरीं। अनुवादावें ॥४४॥

म्हणौनि उपेयही हातीं। जाळया उपाय स्थिती। देव प्रवर्तले ते पुढती। येणेंचि भावें १२४५

गीतार्थाचें सामर्थ्य मोक्षाचें साधन प्राप्त करून देण्याचें आहे, हा त्यात चांगुलपण आहे. दुसरीं शास्त्रें प्रमाणसिद्ध मोक्षोपाय नाहीत. वाऱ्याने सूर्याचे आड आलेले ढग दूर होतात, परतु त्याऱ्याने सूर्य उत्पन्न करवत नाही, किंवा हाताने पाण्यावरील गोंडा दूर करता येतें, पाणी करिता येत नाही, तें स्वतःसिद्धच आहे. त्याप्रमाणें, आत्म दर्शनाचे आड आलेला जो अज्ञानाचा मळ, तो इतर शास्त्रांनी नाहींसा होतो. त्यांच्या निर्मळ असें जें माझें आत्मस्वरूप ते करवत नाही, ते स्वतःसिद्धच आहे. म्हणून सर्व शास्त्रें अज्ञानाचा नाश करण्यास मात्र योग्य आहेत एऱ्हवी त्यांच्यानें स्वतःसिद्ध आत्मस्वरूपाचा बोध करवत नाही. त्या अध्यात्मशास्त्रांना त्याच्या सत्यत्वाविषयीं दरडावून विचारलें तर ते आपला खरेपणा दाखविण्याकरितां ज्याच्याकडे जातात, तें हें गीताशास्त्र होय. सूर्यानें पूर्व दिशा अलंकृत केली म्हणजे सर्व दिशा प्रकाशित होतात. त्याप्रमाणें, सर्व शास्त्रांना आधारभूत जी शास्त्रश्रेष्ठ गीता, तिच्यायोगानें सर्व शास्त्रें सनाथ झालीं आहेत. फार काय! परतु या गीतेनें मागील अध्यायात पुष्कळ उपाय सांगितले आहेत की ज्या योगानें आत्मा आपले हस्तगत होईल. परतु प्रथम एकदाच ऐकल्यानें अर्जुनाला कळेल किंवा नाही हा भाव कळकळीने श्रीहरींनी मनात धरून, तोच अर्थ शिष्याचे ठिकाणीं दृढ होण्याकरिता मोकळ्या मनाने एक वेळ पुनः सांगतात. आणखी, गीता समाप्त होण्याचा प्रसंग आलेला आहे, ह्मणून आरंभापासून शेवटपर्यंत एकच अर्थ प्रतिपादन केला आहे असे दाखवितात. किंवा ग्रंथाच्या मध्यंतरीं नानाअधिकार प्रसंगानें अनेक सिद्धांत सांगितलेले आहेत, तरी पूर्वापर संबंध मनात न आणून गीतेमध्ये अनेक सिद्धांत आहेत असें जर कोणी मानील, तर महासिद्धांताचे एकदर ऐक्य करून त्याच्या पोटांत अनेक सिद्धांत कक्षा ( युक्ति ) मिळून आरंभिलेली गीता संपवितात या गीताशास्त्रात **अविद्येचा नाश ही मुख्य भूमि व मोक्षाचा लाभ हें तिचें फल** या दोन गोष्टी होण्याला **ज्ञानच** हें केवळ **साधन** होय तेच ज्ञान नानाप्रकारें ग्रंथांत सांगून ग्रंथाचा विस्तार झाला आहे, तें ज्ञान आतां थोडक्यात सांगावें, म्हणून उपायानें मिळणारी वस्तु हातात आली असताही, केवळ अनुवाद करण्याकरितांच देव प्रवृत्त झाले.

महाराजांचे व्याख्यानावरून आत्मविषयक अज्ञान सर्व संसारदुःखाचे बीज आहे, त्याचा नाश आत्म्याचे यथार्थ ज्ञानावाचून कदापि होणे नाही, व तें अध्यात्मज्ञान सांगण्यातच गीताशास्त्राचें तात्पर्य आहे, असे उघड दिसतें.

आता, वरवर ज्ञानेश्वरी वाचणारास प्रसंगविशेषीं कोठें कर्म, उपासना, योग वगैरेसंबंधाने एकमेकांविरुद्ध अनेक वाक्यें दृष्टीस पडून ग्रंथाविषयी त्याची अपूज्यबुद्धि उत्पन्न होईल, म्हणून त्याविषयीं थोडा विचार करण्याची आवश्यकता आहे.

**१. कर्मप्रतिपादक वाक्यें:—**

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन। मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संङ्गोऽस्त्वकर्मणि ॥४७**

अर्जुना, तू कर्मांचाच अधिकारी आहेस; तू फळाचा अधिकारी कधींही होऊं नकोस, व कर्मांच्या फळाची इच्छा देखील धारण करू नकोस, आणि कर्म न करण्याविषयींही आग्रह धरू नकोस. ॥४७॥

भगवद्गीता. अध्याय २.

णोनि आइके पार्था । याचपरि पहातां । तुज उचित होय आता । स्वधर्मु हा ॥ २६४ ॥
म्हीं समस्तही विचारिलें । तंव ऐसेंचि हें मना आलें । जे न सांडिजे तुवां आपुलें । विहित कर्म ६५

म्हणून पार्था, ऐक ह्या सर्व गोष्टांचा विचार करून पहाता तुला स्वकर्मच उचित आहे २६४
म्ही सर्व गोष्टींचा विचार करून पाहिला, तो आमच्या मनास असें आलें की, आपलें कर्तव्यकर्म सोडू नये

ज्ञानेश्वरी, अध्याय २

नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः । शरीरयात्राऽपि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ।

अरे, तू विहित कर्माचें आचरण कर कर्म न करण्यापेक्षा कर्म करणें हेंच श्रेयस्कर आहे. कर्मे यावाचून तुझ्या शरीराचा निर्वाह देखील होणार नाही ॥ ८ ॥

भगवद्गीता, अध्याय ३.

म्हणोनि जें जें उचित । आणि अवसरेंकरूनि प्राप्त । तें कर्म हेतुरहित । आचर तूं ॥ ७८ ॥

म्हणून जें जें योग्य व समयानुसार प्राप्त झालेलें कर्म असेल, तें तें तू निष्कामबुद्धीनें कर ७८

ज्ञानेश्वरी, अध्याय ३.

तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर । असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः॥ १९॥

ह्या कारणास्तव, फलाची इच्छा टाकून तू नेहमी विहित कर्म कर कारण, फलाविषयीं निष्काम गारा पुरुष ( विहित ) कर्माच्या आचरणानें–चित्तशुद्धीमुळें–परमपद प्राप्त करून घेतो ॥ १९ ॥

भगवद्गीता, अध्याय ३.

म्हणऊनि तूं नियतु । सकळ कामरहितु । होऊनिया उचितु । स्वधर्म रहाटे ॥ १५० ॥
जे स्वधर्में निष्कामता । अनुसरले पार्था । ते कैवल्यपद तत्त्वतां । पावले जगीं ॥ १५१ ॥

म्हणून, नेहमी फलाची आशा सोडून देऊन तू उचित अशा आपल्या धर्माचें आचरण कर १५०
र्था, ह्या जगात खरोखर ज्यानी स्वधर्माचें आचरण निष्कामबुद्धीनें केलें, ते मोक्षपदास गेले १५१

ज्ञानेश्वरी, अध्याय ३.

कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥

पूर्वीच्या मुमुक्षूंनीं पूर्वीच्या काळीं जशीं कर्म केलीं होतीं तशीं कर्म मुमुक्षूंनीं केलीं; म्हणून तसें कर्मच कर ॥ १५ ॥

भगवद्गीता, अध्याय ४.

---

## २. योगप्रतिपादक वाक्यें —

तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।
कर्मिभ्यश्चाऽधिको योगी तस्माद्योगी भवाऽर्जुन ॥ ४६ ॥

तप करणाऱ्याहून ज्ञान्याहून व कर्म करणाऱ्याहून योगी अधिक श्रेष्ठ आहे. म्हणून, अर्जुना, तूं हो. ॥ ४६ ॥

भगवद्गीता, अध्याय ६.

नि याकारणें । तूतें मी सदा म्हणें । योगी होईं अंतःकरणें । पंडुकुमरा ॥ ४८१ ॥
योगी जो म्हणिजे । तो देवाचा देव जाणिजे । आणि सुख सर्वस्व माझें । चैतन्य तो ॥ ४८२ ॥

म्हणून, अर्जुना, याच कारणास्तव ' तू योगी हो ' असें मनापासून तुला मी नेहमीं सांगत असतों. अरे योगी म्हणजे देवांचा देव, माझें सर्व सुखाचें आगर, आणि केवळ माझा प्राण, असें समज. ८२

ज्ञानेश्वरी, अध्याय ६.

---

## ३. उपासनाप्रतिपादक वाक्यें :—

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु । मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायण ॥**

हे अर्जुना, तू माझे ठिकाणी आपले मन ठेव, माझा भक्त हो; माझे यजन कर, आणि मला नमस्कार कर. ह्याप्रमाणे माझे ठिकाणी चित्त स्थिर करून मत्परायण झालास, म्हणजे मज परमेश्वरास येऊन मिळशील ॥ ३४ ॥ भगवद्गीता, अध्याय ९

**अहा कटकटा हे वोखटें । इयें मृत्युलोकीचें उफराटें । एथ अर्जुना जरी अवचटें । जन्मलासी तूं ॥५१५॥**
**तरी झडझडोनि वाहिला निघ । इयें भक्तीचिये वाटे लाग । जिया पावसी अव्यंग । निजधाम माझें ५१**
**तूं मन हें मीचि करीं । माझिया भजनीं प्रेम धरीं । सर्वत्र नमस्कारीं । मज एकातें ॥ ५१७ ॥**
**माझेनि अनुसंधानें देख । संकल्पु जाळणें निःशेष । मद्याजी चोख । याचि नांव ॥ ५१८ ॥**
**ऐसा मिया आथिला होसी । तेथ माझियाचि स्वरूपा पावसी । हें अंतःकरणींचे तुजपासीं । बोलिजत असें ५१**
**अगा आघवियाचि चोरिया आपुलें । जें सर्वस्व आम्हीं असे ठेविलें । तें पावोनि सुख संचलें । होऊनि ठासी ५२**

अरे अरे, अंगावर काटा येतो ! ! ज्या मृत्युलोकचा व्यवहार अगदीं उलटा असून वाईट आहे म्हणून किती सांगावे ! अर्जुना, अशा मृत्युलोकांत तूं आकस्मित जन्मा पावला आहेस, किती ही वाईट गोष्ट या मृत्युलोकीं सर्वच गोष्टी उलट्या पडतात ! तर अर्जुना, तूं जरी येथें यदृच्छेनें जन्मला आहेस ५१५ तर झटकर अग झाडून वेगळा हो, आणि ज्या योगानें माझ्या अविनाशीपदाला प्राप्त होशील, त्या भक्तिमार्गाला लवकर लाग ५१६ तूं आपलें मन मद्रूपी करून माझें भजन करण्याविषयी प्रेम धर, आणि सर्व ठिकाणी मीच आहे असें समजून नमस्कार कर १७ हें पहा मनांतील सर्व संकल्प नाहींतसे करून जो माझ्याकडे लक्ष ठेवितो, तोच माझें यजन करणारा, असें नांव पावतो १८ असा माझ्या योगानें संपन्न होशील, त्या वेळेस माझ्या स्वरूपाला पावशील ही माझ्या अंतःकरणांतील गुप्त गोष्ट तुला मी सांगितली आहे. ५ अरे, सर्वांना चोरून ठेविलेली अशी आमची गुप्त गोष्ट ती प्राप्त करून घेऊन सुखरूप होऊन रहाशील. ५

ज्ञानेश्वरी, अध्याय ९

## ४. ज्ञानप्रतिपादक वाक्यें :—

**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ॥ १२ ॥**

जें ज्ञेय म्हणजे जाणण्यास योग्य, जें जाणल्यानें जीवाला मोक्ष मिळतो, तें तुला मी आतां सांगतों

भगवद्गीता, अध्याय १३

**आणि जाणितलेया वरौतें । कांहींच करणें नाहीं जेथें ॥ जाणणेंचि तन्मयातें । आणी जयाचें ८६**
**जें जाणितलेयासाठीं । संसार काळनिशा कांटी ॥ जिरोनि जाइजे पोटीं । नित्यानंदाच्या ८६७**

आणि तें समजल्यावर मुमुक्षूला कांहीं कर्तव्य उरत नाहीं कारण, त्याचें ज्ञानच मुमुक्षूला तद्रूपतेला आणतें. ( तें जाणल्यावरोबर तो तद्रूप होतो. ) ८६६ जें जाणलें असतां मुमुक्षूनीं संसाराचा त्याग करून नित्यानंदांत निमग्न व्हावें ८६७ ज्ञानेश्वरी, अध्याय १३.

**यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥ १ ॥**

ज्या ज्ञानाला जाणून सर्व मुनि या जन्मांतून मोक्षसिद्धि पावले ॥ १ ॥

भगवद्गीता, अध्याय १४

**जियें भवस्वर्गातें जाणती । यागचि चांग म्हणती ॥ पारखी फुडी आथि । ऐसी जयां ॥ ४४ ॥**
**तियें आघवींचि ज्ञानें । केली गेणें स्वप्नें ॥ जैसा वातोर्मी गगनें । गिळिजती अशीं ॥४५॥**
**अनादि जे मुक्तता । आपली असे पडुसुता ॥ तो मोक्षु हाता येता । होय जेणें ॥४८॥**

कारण, ज्या ज्ञानाची गजल संसार व स्वर्ग या सुखापलीकडे नसते, ज्याला यज्ञयागादि कर्मे चांगलीं वाटतात, व ज्याला द्वैताशिवाय दुसऱ्या कशाची ओळख नसते, ४४ ती सर्व ज्ञानें आत्मज्ञानापुढे स्वप्नवत् भासतात. ज्याप्रमाणें गगनांत उत्पन्न झालेला वायु कितीही मोठा असला तरी त्याचा गगनांत लय

शक्यच नाहीं त्याकरून अपुलेता ज्ञानाशिच मरो जीवब्रह्मैक्य ज्ञानापासून संसारनिवृ अन्य कोणत्याही उपायानें होत नाहीं, म्हणून अत्यंतसंसारनिवृत्तिकरितां योग किंवा प्रतिपादनाचे वेळी केलेली त्याची स्तुति अर्थवाद होय, अर्थवाद ह्मणजे वाक्यार्थाच्या रून उत्पन्न होणारे अर्थात तात्पर्य नसणें. जसा एकानें " हा मुलगा मोठा बृहस्पति अशा कुत्सित बुद्धीनें उच्चारण केलेल्या वाक्याचा शब्दोत्थित अर्थ, हा मुलगा अत्यंत बुद्धीम असा जरी होत असला, तरी त्या वाक्याचें तात्पर्य, 'मुलगा मूर्ख आहे' असे आहे. अ पुष्कळ भेद आहेत, विस्तारभयानें येथे दिले नाहीत असो. कर्माची, योगाची, उपासनेची स्तुती करतेवेळीं त्या वाक्याचें कर्म उपासनेचे स्तुतींत तात्पर्य नाहीं, स्तुतीमुळें आपापले अधिकाराप्रमाणें ज्ञानाधिकार प्राप्तीकरितां मुमुक्षूंनी यत्न येवढेच त्या स्तुतीचें तात्पर्य आहे; आणि शास्त्र निश्चयाला उपपत्ति ह्मणजे युक्ती मिळ अशी की, जर कर्मापासून किंवा योगापासून किंवा उपासनेपासून नित्य, निरतिशय प्राप्त होतो अशी कल्पना करावी, तर व्यवहारांत तसा अनुभव दिसत नाहीं, कार करून ह्मणजे व्यावहारिक कष्ट करून संपादन केलेले विषय नित्य रहात नाहीत. तेथें अ नियम दिसून येतो की, ज्याची उत्पत्ति आहे त्यास आज किंवा कालांतरानें नाश हा जसे व्यावहारिक प्रयत्नानें संपादन केलेले भोग नष्ट होतात, तसेंच वैदिक कर्मापासू होणारे स्वर्गादिक भोगही नष्ट झालेच पाहिजेत, ह्याजवर अशी शंका येते की, भगव ज्ञानेश्वरमहाराजांनीं तरी कर्मापासून अथवा उपासनेपासून मोक्ष होईल म्हणून कसें सांगि त्याचें तात्पर्य असे आहे की, कर्म उपासनेपासून साक्षात् मोक्ष प्राप्त होणार नाहीं, परं उपासनेपासून मुमुक्षूच्या अंतःकरणात शुद्धि व निश्चलता संपादनद्वारां ज्ञानाधिकार प्राप्त मग ज्ञानद्वारा मोक्ष होणार, ह्मणून जीवब्रह्मैक्यज्ञानानेंच मोक्ष होतो हा जो मुख्य व गीताशास्त्राचा मुख्य सिद्धांत आहे, त्याचे हे ( पोटकक्षा म्हणजे ) पोट सिद्धांत आहेत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं उपसंहारात सांगितलें आहे. शिवाय जीवब्रह्मैक्यज्ञानाची कर्म, उ हीं अंगें आहेत, त्याप्रमाणें उपासनेचें किंवा कर्माचें ब्रह्मज्ञान हें अंग नाहीं. उलट ब्र हें कर्म-उपासनेचें बाधक आहे, म्हणून ज्ञानेश्वरीत कोठें कोठें कर्म-उपासना प्रतिपादन आहेत, तीं जीवब्रह्मैक्यज्ञानाला साधनीभूत आहेत म्हणून केलीं आहेत. मुख्य तात्पर्य ब्रह्मैक्यज्ञानांतच आहे. त्या ठिकाणीं मुमुक्षूंनी सत्संगतीनें आपले बुद्धीची करावी, आणि या जन्मीं किंवा पूर्वजन्मीं कर्म उपासना न झा तशी स्थिती होत नसेल तर कर्म-उपासनेचें अनुष्ठानेंकरून अंतःकरण शुद्ध क विवेकवैराग्यादि भूमिका प्राप्त करून घेऊन श्रीगुरुद्वारा ज्ञान संपादन करून निरुपाधि व निरतिशय अशा जिवन्मुक्तिसुखाचा अखंड आनंद सर्व जीवांनीं भोगावा, ए श्रीज्ञानेश्वरमहाराज यांचा हा ग्रंथ लिहिण्याचा उद्देश आहे. असो. सर्व जीवांच्या पार कल्याणाची कळकळ वाळगणारे श्रीगुरु ज्ञानोबाराय यांना वारंवार वंदन करून ह्या उ राचा उपसंहार करतों.

**यदत्र सौष्ठवं किंचित्तद्गुरोरेव मे न हि । यदत्रासौष्ठवं किंचित्तन्ममैव गुरोर्न ।**

या ग्रथलेखनामध्यें जर कांहीं सौष्ठव असेल, तर तें श्रीगुरूचेंच आहे, माझें नव्हे, आणि जर असौष्ठव असेल, तर तें माझेंच, श्रीगुरूचें नव्हे

ओढ घेते, २८ जो कर्मकांड पूर्णपणे जाणतो, ज्याला पुराणे मुखोद्गत आहेत, आणि ज्योतिषात तर इतका निपुण आहे की, तो म्हणेल तसेच व्हावयाचे! २९ जो कलाकौशल्यशास्त्रात अति निष्णात आहे, पाकशास्त्रात प्रवीण आहे, आणि जारण, मारण, उच्चाटन व वशीकरण हा ह्मणजे केवळ ज्याचा हातचा मळ आहेत, ८३० कामशास्त्रात जो पक्का दर्दी आहे, एखादा गोष्ट ऐकली असता तिजविषयीं भारताप्रमाणे व्याख्यान करतो, व शास्त्रे ज्याचे-पुढे मूर्तिमंत उभी रहातात, ३१ जो नीतिजात उत्तम जाणतो, वैद्यशास्त्रात जो निपुण आहे, आणि काव्यनाटकात ज्याचा हात कोणी धरू शकत नाही, ३२ स्मृतींची जो चर्चा करितो, गारोड्याची मन्त्रविद्या जाणतो, वेदांतील शब्दाचा कोश तर जणू काय याचा सेवकच! ३३ आणखी जो व्याकरणात निपुण आहे, व न्यायशास्त्रात ज्याची मति गहन आहे, परंतु एक आत्मज्ञानाविषयीं जो जन्मांध आहे, ३४ तो त्या एका आत्मज्ञानाशिवाय इतर सर्व शास्त्रातील सिद्धांताना आधारभूत असेल, पण जळो ते त्याचे ज्ञान! ते ह्मणजे सर्व लक्षणांनी संपन्न असलेल्या पण मूळ नक्षत्रावर जन्मलेल्या मुलाप्रमाणे होय तू तिकडे मुळींच लक्ष देऊं नको ३५ ज्याप्रमाणे मोराच्या सर्वांगावरील पिसाऱ्यावर डोळे असतात, परंतु त्यास एक दृष्टि नाही, त्याप्रमाणे त्याची ती सर्वविद्यासंपन्नता होय ३६ मेलेल्या मनुष्यास जिवंत करणारी मुळी जर परमाणू एवढीही सापडली, तर मग इतर गाडाभर मुळ्या करावयाच्या आहेत काय? ३७ उत्तम लक्षणे असून अल्पायुष्य असणे, किंवा मस्तकाशिवाय अलंकार घालणें, अथवा वधूवर असल्यावाचून वरवावा काढणे ही विटंबना होय, ३८ त्याप्रमाणे, पार्था, एक अध्यात्मज्ञानावाचून इतर सर्व शास्त्रे अप्रमाण होत ३९ यास्तव, अर्जुना, तू हे ध्यानात धर कीं, ज्या पढतमूर्खाला आत्मज्ञानाचा निश्चयबोध नाहीं, ८४० त्या मनुष्याचे शरीर ह्मणजे अज्ञानाचें वाढलेलें बीजच होय, आणि त्याची व्युत्पन्नता म्हणजे अज्ञानाच्या वेली होत. ४१ तो जें बोलतो, ते अज्ञानाचे फूलच होय, व तो जें पुण्यमार्गाचें आचरण करितो, ते अज्ञानाचें फल होय, ४२ आणि ज्याची अध्यात्मज्ञानावर श्रद्धा नाहीं, त्याला ज्ञानार्थ (तत्त्वार्थ) प्राप्त होत नाहीं हे बोलूनच का दाखविलें पाहिजे? ४३ नदीच्या अलीकडील काठापर्यंतही न येता जो माघारी जातो, त्याला पलीकडच्या काठची बातमी कशी बरें कळेल? ४४ किंवा घरात शिरताना उंबऱ्यानच ज्याचे मस्तक कापून खाचेंत दडपलें, तो घरात काय ठेवले आहे हे कसे पाहील? ८४५ त्याप्रमाण, अर्जुना, अध्यात्मज्ञानाचा व ज्याचा ओळखहा नाहीं, त्याला ज्ञानार्थ (तत्त्वार्थ) पहावयास कसा विषय होईल? ४६ म्हणून, अशा मनुष्यास ज्ञानाचे तत्त्व कळत नाहीं, हे तुला विशेषेकरून खरे मांडून सांगण्याचे कारण नाही. ४७ गरोदर स्त्रीला वाटल तेव्हाच तिच्या उदरातील गर्भाची तृप्ति झाली, त्याप्रमाणे, पूर्वी जीं ज्ञानाची लक्षणे सांगितली, तद्विरुद्ध ज्या गोष्टी तेच अज्ञान होय ४८ आंधळ्यास जेवणाचे आमंत्रण दिल्यावर ज्याप्रमाणे त्याबरोबर दुसरा मनुष्य येतोच, त्याप्रमाणे, ज्ञानाची लक्षणें सांगितल्यावर अज्ञानाचेंही लक्षण आपोआप होतेच ४९ याप्रमाणे अमानित्वादिकांच्या उलट अज्ञानाची लक्षणे सांगितली, ८५० ती ज्ञानाचा अठरा लक्षणे उलटपक्षा लाविली असता सहज अज्ञानाची लक्षणे सिद्ध होतात ५१ मागे अखेरच्या श्लोकाच्या उत्तरार्धाच्या तिसऱ्या अर्धामध्ये श्रीमुकुंदानी सांगितले का, "ही ज्ञानाचा लक्षण, आणि याचे उलट जा लक्षणे, ते अज्ञान होय" ५२ म्हणूनच या प्रकाराने मी अज्ञान लक्षणाचा विस्तार केला एऱ्हवीं दुधात पाणी मिळवून दूध वाटवून काय करावयाचे? ५३ त्याचप्रमाणें, एक अक्षरही न सोडता आणि व्यर्थ बडबड न करिता, मुळात जो अर्थ होता, तोच मी विस्ताराने सांगितला. ५४ तेव्हा श्रोते ह्मणतात, "हे कविपोषका, तुला परिहार देण्यास तुझ्याकडून असा काय अन्याय झाला आहे? ५५ तुला श्रीमुरारीनींच सांगितले आहे का, 'आम्ही जे अभिप्राय गुप्तस्थळी झाकून ठेविले आहेत, ते तू प्रकट कर' ५६ ते देवाचें मनोगत आम्हाला तूं स्पष्ट करून सांगितलेंस असे जरी आम्ही ह्मटलें, तरी तुला त्यापासून राग येईल ५७ म्हणून आम्ही आता या सर्व गोष्टी सोडून देतों पण सत्य हे तूं श्रवणसुखाची ज्ञाननौका आम्हास प्राप्त करून दिलीस, त्या योगानें आम्हास फार संतोष झाला आहे. ५८ आता यापुढे "श्रीहरि काय बोलले तें आम्हास लवकर कथन कर" ५९ हे संताचे वाक्य ऐकल्यावरोबर निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणाले, तर ऐका. देव असें बोलले ८६० काय बोलले? तर ते म्हणाले, "अर्जुना, ही जीं तू सर्व लक्षणे ऐकलींस, तीं अज्ञानाचीं होत ६१ ह्या अज्ञानभागाकडे दुर्लक्ष करून तूं ज्ञानप्राप्तिविषयी आपला निश्चय दृढ कर. ६२ मग त्या शुद्ध ज्ञानाच्या योगें तुला ज्ञेयाची प्राप्ति होईल" हे ऐकताच अर्जुनाने तें जाणण्याविषयीं मन पूर्वक इच्छा केली ६३ तेव्हा सर्वज्ञाचा राजा श्रीकृष्ण यानें अर्जुनाच्या मनातील भाव जाणून त्यास म्हटले कीं, आता तुला ज्ञेय म्हणजे काय तें सांगतों, ऐक. ६४

**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ।**
**अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥१२॥**

यत् ज्ञेय यत ज्ञात्वा ( नावः ) अमृत अश्नुत तत् प्रव क्ष्यामि. तद् अनादिमत् पर ब्रह्म सत् न असत् न उच्यते ॥ १२॥

तरि ज्ञेय ऐसें म्हणणें । वस्तु ते येणेंचि का- रणें । जें ज्ञानेंवांचूनि कवणें । उपायें नये ६५ आणि जाणितलेयाबरौतें । कांहीच करणें नाही जेथें । जाणणेंचि तन्मयातें । आणी जयाचें ६६ जें जाणितलेयासाठीं । ससार काढूनिगा काठीं । जिरोनि जाइजे पोटीं । नित्यानंदाच्या ॥ ६७ ॥ ते ज्ञेय गा ऐसें । आदि जया नसे । परब्रह्म आ- पैसें । नाग जया ॥६८॥ जे नाही म्हणों जाइजे । तव विश्वाकारें देखिजे । आणि विश्वचि ऐसें म्ह- णिजे । तरि हे माया ॥६९॥ रूप वर्ण व्यक्ती । नाही दृश्य द्रष्टा स्थिती । तरि कोणे कैसें आथी । म्हणावें पां ॥८७०॥ आणि साचचि जरी नाही । तरि महदादि कोणे ठाईं । स्फुरत कैचे काईं । तेणेंवीण असे ॥७१॥ म्हणोनि आथी नाथी हे बोली । जें देखोनि मुकी जाहली । विचारेंसी मो- डली । वाट जेथें ॥७२॥ जैसी गाडघटशरावीं । तदाकारें असे पृथ्वी । तैसें सर्व होऊनियां सर्वीं । असे जे वस्तु ॥७३॥

**सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।**
**सर्वतःश्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥१३॥**

लोके तत् सर्वत पाणिपाद, सर्वत अक्षिशिरोमुख, सर्वतः- श्रुतिमत् ( अस्ति ), सर्व च आवृत्य तिष्ठति ॥ १३ ॥

आघवाचि देशीं काळीं । नव्हतां देशकाळा- वेगळी । जे क्रिया स्थूळास्थूळी । तेचि हात ज- याचे ॥७४॥ तयातें याकारणें । विश्वबाहु ऐसें म्हणणें । जे सर्वचि सर्वपणें । सर्वदा करी ७५ आणि समस्तांही ठायां । एके काळीं धनंजया । आलें असे म्हणोनि जया । विश्वांघ्रि नाम ॥७६॥ पैं सवितया आग डोळे । नाहींत वेगळे वेगळे । तैसें सर्वद्रष्टृ सकळें । स्वरूप जें ॥७७॥ म्हणोनि विश्वतश्चक्षु । हा अचक्षूच्या ठायीं पक्षु । बोला- वया दक्षु । जाहला वेदु ॥७८॥ जें सर्वांचे शि- रावरी । नित्य नांदे सर्वांपरी । म्हणोनि श्रुतीनगरी । विश्वमूर्धा म्हणिपे ॥७९॥ पैं गा मूर्ति तेंचि मुख । हुताशना जैसें देख । तैसें सर्वपणें अशेख । भोक्ते जे ॥८८०॥ यालागी तया पार्था । विश्वतोमुख हे व्यवस्था । आली वाक्पथा । श्रुतीचिया ॥८१॥ आणि वस्तुमात्रीं गगन । जैसें असे सघन । तैसें शब्दजातीं कान । सर्वत जया ॥८२॥ म्हणोनि आम्ही तयातें । म्हणों सर्वत आइकतें । एवं जें सर्वातें । आवरूनि असे ॥ ८३ ॥ एऱ्हवीं तरी महामती । विश्वतश्चक्षु इया श्रुती । तयाचिये व्याप्ती । रूप केलें ॥ ८४ ॥ वांचूनि हस्त नेत्र पाये । हे भाष तेथ कें आहे । सर्वशून्याचा न साहे । निष्कर्षु जें ॥८५॥ पैं कल्लोळातें कल्लोळें । ग्रासिजत असे ऐसें कळे । परि ग्रासितें ग्रासावेग- ळें । असे काई ॥८६॥ तैसें साचचि जें एक । तेथ कें व्याप्यव्यापक । परि बोलावया नावेक । करावे लागे ॥८७॥ पैं शून्य जैं दावावें जाहलें । तैं बिंदुलें एक केलें । तैसें अद्वैत सांगावें बोलें । तें द्वैत कीजे ॥८८॥ एऱ्हवीं तरी पार्था । गुरु- शिष्यसत्पथा । आडळु पडे सर्वथा । बोल खुंटे ॥८९॥ म्हणोनि गा श्रुती । द्वैतभावें अद्वैती । निरूपणाची वाहती । वाट केली ॥८९०॥ तेंचि आतां अवधारीं । इये नेत्रगोचरें आकारीं । ते ज्ञेय गा जयापरी । व्यापक असे ॥९१॥

**सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् ।**
**असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४ ॥**

( तत् ) सर्वेंद्रियगुणाभास, सर्वेंद्रियविवर्जित, असक्त सर्व- भृत् च एव निर्गुणं गुणभोक्तृ च ( अस्ति )

**जें ज्ञेय म्हणजे जाणण्यास योग्य, जें जाणल्यानें जीवाला मोक्ष मिळतो, तें तुला मी आता सांगतों ज्याला आदि नाही, तें सर्वोत्कृष्ट ब्रह्म, सत् म्हणता येत नाही व असतही म्हणतां येत नाही. ॥ १२ ॥**

हे पहा, ज्ञेय म्हणजे परमात्मवस्तु–त्याला ज्ञेय म्हणण्याचें कारण इतकेंच की, तें ज्ञानाशिवाय इतर कोणत्याही उपायानें प्राप्त होत नाही, ६५ आणि तें समजल्यावर मुमुक्षूंना काही कर्तव्य उरत नाही कारण, त्याचें ज्ञानच मुमुक्षूला तद्रूपतेला आणतें (तें जाणल्याबरोबर तो तद्रूप होतो) ६६ जें जाणलें असता मुमुक्षूंना संसाराचा त्याग करून नित्यानंदात निमग्न व्हावें, ६७ तें ज्ञेय असें आहे की, त्याला आदि नाही आणि त्याला साहजिकच परब्रह्म हें नांव आहे ६८ तें नाही म्हणावयास जावें तर विश्वरूपेंकरून दृष्टीस पडते, आणि विश्वच परब्रह्म असें म्हणावें, तर ही आहे माया! ६९ त्याला रूप, वर्ण, आकार हा नाहीत, तसेंच तें दृष्टीस पडणारें नाहीं, व तें कशास पहातही नाही, तेव्हा 'तें आहे' असें कोणी व कसें म्हणावें? ८७० बरें, तें नाहीं असें धरून चाललें, तर ही महत्तत्त्वादि कोठून स्फुरण पावली? आणि त्यावांचून दुसरें आहे तरी काय? ७१ म्हणून त्यासबधानें 'आहे' 'नाही' असें काहींच बोलता न येऊन वेदाचीही वाणी मुकी झाली, आणि त्याच्या ठिकाणी विचारासह वाट खुंटली! ७२ ज्याप्रमाणें मातीपासून तयार केलेले डेरे, घागरी, परळ इत्यादिकांच्या आकाराप्रमाणें पृथ्वी दिसते, [ परंतु त्यापासून निराळी आहे, ] त्याप्रमाणें ब्रह्म आपणच सर्व जग नटलेलें असून जगांत ओतप्रोत भरलेलें आहे, [ तथापि तें त्याहून भिन्न आहे. ] ७३.

**या जगांत त्याला सर्व बाजूंनी हात व पाय आहेत; सर्व बाजूंनी नेत्र, मस्तकें व मुखें आहेत, सर्व बाजूंनी कान आहेत, आणि तें सर्वाला व्यापून राहिलें आहे. ॥ १३ ॥**

सर्व देशांत सर्व काळीं स्थूल व सूक्ष्म वस्तूंपासून जी क्रिया होते ती त्याच्या सत्तेनें होते, कारण तें सर्वत्र व्यापक आहे, म्हणून क्रियेचे हात तेंच आहे ७४ त्या ब्रह्माला या कारणामुळेंच 'विश्वबाहु' असें म्हटलें आहे, का की, तें सर्वत्र सर्वप्रकारें सर्वदा क्रिया करवीत असतें, म्हणजे त्याच्या सत्तामात्रें करून क्रिया होतात. ७५ आणि अर्जुना, तें सर्व ठिकाणीं एकसमयावच्छेदेंकरून असतें, म्हणूनच त्याला 'विश्वाङ्घ्रि' हें नांव प्राप्त झालें आहे ७६ ज्याप्रमाणें सूर्याला अंग व डोळे हे अवयव वेगळे वेगळे नाहीत, त्याप्रमाणें तें सर्व आपल्या स्वप्रकाशानें पहातें म्हणजे भासवतें ७७ म्हणूनच त्यास डोळे नाहीत, तरी वेदानें त्याला सार्वत्रिक पहाणपणानें 'विश्वतश्चक्षु' असें म्हटलें आहे. ७८ जें सर्वांपेक्षा उंच व सर्व प्रकारें नित्य आहे, म्हणूनच ज्याला 'विश्वमूर्धा' असें म्हणतात. ७९ हे पहा–अग्नीचा जो मूर्ति तेंच त्याचें मुख होय, त्याचप्रमाणें, जें ब्रह्म सर्व वस्तूंचा उपभोग घेतें, ८८० पार्था, याच कारणास्तव श्रुतींनी ब्रह्माला 'विश्वतोमुख' असें म्हटलें आहे ८१ आणि आकाश ज्याप्रमाणें सर्व वस्तूंत ओतप्रोत भरलें आहे, त्याप्रमाणें शब्दमात्रावरोवर त्याचे श्रवण आहेत, ८२ म्हणूनच त्या ब्रह्माला आम्ही 'सर्वत्र ऐकणारें' असें म्हणतों कारण, तें या जगतांत सर्वाला व्यापून आहे ८३ हे महामते अर्जुना, वास्तविक विश्वतश्चक्षु इत्यादि श्रुतींनी परमात्म्याच्या नेत्रादि अवयवांचें वर्णन जें केलें आहे, तें परमात्म्याला अवयव आहेत असें सिद्ध करण्याकरिता नाहीं, तर परमात्म्याचें व्यापकत्व दाखविण्याचा त्याचा मुख्य अभिप्राय आहे. ८४ वास्तविक, सर्व पदार्थांच्या अभावालाही जो सहन करीत नाहीं, त्याच्या ठिकाणीं नेत्र, हात, पाय इत्यादि अवयवांची गोष्टच नको ८५ आता लोकदृष्ट्या एकादी मोठी लाट लहान लाटेचा नाश करते असें दिसतें, परंतु ती थोरली लाट त्या लहान लाटेपासून पाण्याच्या दृष्टीनें वेगळी आहे काय? ८६ त्याप्रमाणें, सर्वांशींच जर ब्रह्म सर्वत्र भरलेलें आहे, तर त्याचे ठिकाणीं व्याप्यव्यापकभाव कोठून येणार? मग शास्त्र व्याप्यव्यापकभावाचें प्रतिपादन कां करितें, असें म्हणशील तर, शिष्याला यथार्थ बोध होण्याकरिता तसें वर्णन करावें लागतें ८७ ज्याप्रमाणें दृशोब लिहिताना बाकी शून्य दाखविण्याची वेळ येते त्या वेळेस शून्याबद्दल वर्तुलाकृति काढतात, त्याप्रमाणें अद्वैत स्पष्ट करून सांगावयाचें म्हटलें, म्हणजे द्वैताचा स्वीकार करूनच स्पष्टीकरण करावें लागतें ८८ नाहीं तर, अर्जुना, गुरुशिष्यसंप्रदाय चहूंकडे बंद पडेल, आणि अद्वैतविषयीं सर्व भाषण बंद होईल ८९ म्हणून श्रुतींनीं द्वैताच्या रूपानें अद्वैताचें प्रतिपादन करण्याचा राजमार्ग सुरू केला ८९० तेव्हा आता, आपल्या नेत्रांना जो आकार दिसतो, त्यात तें ब्रह्म कसें व्यापक आहे, तें ऐक. ९१

**तें सर्व इंद्रियांना त्यांच्या विषयांचें ज्ञान करून देणारें असून, सर्वेंद्रियरहित आहे, तें कोठेंही सक्त नसून सर्वांना धारण करणारें आहे; आणि गुणरहित असून गुणांचा उपभोग घेणारें आहे. ॥ १४ ॥**

तरि तें गा किरीटी ऐसें । अवकाशी आकाश जैसें । पटी पट्ट होऊनि असे । तंतु जेवी ॥९२॥ उदक होऊनि उदकी । रसु जैसा अवलोकी । दीपपणें दीपकी । तेज जैसें ॥९३॥ कर्पूरत्वें कापुरीं । सौरभ्य असे जयापरी । शरीर होऊनि शरीरी । कर्म जेवी ॥९४॥ किंबहुना पांडवा । सोनेंचि सोनयाचा रवा । तैसें जे या सर्वा । रावांगीं असे ॥९५॥ परी असे रवेपणामाजिवडे । तंव रवा ऐसें आवडे । वांचूनि सोनें सागडे । सोनया जेवी ॥९६॥ पै गा वोघुवि वाकुडा । परि पाणी उजू सुहाडा । वन्हि आला लोखंडा । लोह नव्हे की ॥९७॥ घटाकारें वेंटाळे । तेथ नभ गमे वाटोळें । मठी तरी चौफळें । आयें दिसे ॥९८॥ परि तें अवकाश जैसें । नोहिजतीचि का आकाशें । जें विकार होऊनि तैसें । विकारी नोहे ॥९९॥ मन मुख्य इंद्रिया । सत्त्वादि गुणां यया । सारिखें ऐसें धनंजया । आवडे कीर ॥९००॥ पै गुळाची गोडी । नोहे बांधया सांगडी । तैसी गुण इंद्रियें फुडी । नाही तेथ ॥१॥ अगा क्षीराचिये दशे । घृत क्षीराकारें असे । परि क्षीरचि नोहे जैसें । कपिध्वजा ॥२॥ तैसें जें इयें विकारी । विकार नोहे अवधारी । पै आकारा नाम भोंवरी । येर सोने तें सोनें ॥३॥ इया उघड मन्हाटिया । तें वेगळेपण धनंजया । जाण गुणइंद्रियां- । पासोनियां ॥४॥ नामरूपसंबंधु । जातिक्रियाभेदु । हा आकारासीच प्रवादु । वस्तूसि नाही ॥ ५ ॥ तें गुण नव्हे कही । गुणा तया संबंधु नाही । परि तयाच्याचि ठाईं । आभासती ॥ ६ ॥ येतुलेया- साठीं । सभ्रांताच्या पोटीं । ऐसें जाय किरीटी । जें हैंचि धरी ॥७॥ तरि तें गा धरणें ऐसें । अआतें जेवि आकाशें । कां प्रतिबिंबन जैसें । आरसेनि ॥८॥ नातरी सूर्य प्रतिमंडळ । जैसेनि भरी सलिल । का रश्मिकरी मृगजळ । धरिजे जेवी ॥९॥ तैसें गा सबभावेंविण । यया सर्वांतें धर्ता निर्गुण । परि तें वाया जाण । मिथ्यादृष्टी ॥१०॥ आणि यापरि निर्गुणें । गुणातें भोगणें । रंका राज्य करणें । स्वप्नी जैसें ॥११॥ म्हणोनि गुणाचा संगु । अथवा गुणभोगु । हा निर्गुणी लागु । बोलों नये ॥१२॥

**बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च ।**
**सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत् ॥१५॥**

तत भूतानां बहि अंत: च ( अस्ति ), अचरं चर च एव ( अस्ति ), सूक्ष्मत्वात अविज्ञेय ( अस्ति ), दूरस्थं च अंतिके ( अस्ति ) ॥ १५ ॥

जे चराचर भूतां- । माजि असे पांडुसुता । नाना वन्ही उष्णता । अभेदें जैसी ॥१३॥ तैसेनि अविनाशभावें । जें सूक्ष्मदशे आघवें । व्यापूनि असे तें जाणावें । ज्ञेय एथ ॥१४॥ जे एक आंतुबाहेरी । जें एक जवळ दुरी । जे एकवांचूनि परी । दुजी नाही ॥१५॥ क्षीरसागरींची गोडी । माजि बहु थडिये थोडी । हें नाही तया परवडी । पूर्ण जें गा ॥१६॥ स्वेदजप्रभृती । वेगळाल्या भूतीं । जयाचिये अनुस्यूती । खोमणें नाही ॥ १७ ॥ पै श्रोतेमुखटिळका । घटसहस्रां अनेकां । माजि बिंबोनि चंद्रिका । न भेदे जेवी ॥१८॥ नाना लवणकणांचिये राशी । क्षारता एकचि जैसी । कां कोडी एकी उसी । एकचि गोडी ॥१९॥

**अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।**
**भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥१६॥**

तत ज्ञेयं अविभक्तं भूतेषु च विभक्तं इव स्थितम्, भूतभर्तृ च ग्रसिष्णु च प्रभविष्णु च ( अस्ति ) ॥ १६ ॥

तैसें अनेकीं भूतजातीं । जें आहे एकी व्याप्ती । विश्वकार्या सुमती । कारण जें गा ॥९२०॥ म्हणोनि हा भूताकारु । जेथोनि तेचि या आधारु । कल्लोळा सागरु । जियापरी ॥ २१ ॥ बाल्यादि

हें परा-अर्जुना, तें ब्रह्म म्हणावें, ज्याप्रमाणें पोकळीत सर्व आकाश भरलेलें असतें, तितकें तत्तु हे पदार्थ हे तद्रूप होऊन असतात ९२ हें वस्त्र-रस ज्याप्रमाणें उदका-मध्यें उदकरूप होऊन असतो, तेज ज्याप्रमाणें दीपाचे ठायीं दीपपणानें असतें, ९३ सुगंध जसा कापुराच्या रूपानें कापुरात भरलेला असतो, व क्रिया शरीराच्या रूपानें शरीरात दृष्टीस पडते, ९४ किंबहुना, अर्जुना, सोनें ज्याप्रमाणें सोन्याच्या रव्याच्या रूपानें दृष्टीस पडतें, त्याप्रमाणें जें या सर्व जगाचें आदिकारण असून सर्वांत दृष्टीस पडतें, ९५ तें सोनें ज्या वेळेस रव्याच्या रूपानें दृष्टीस पडतें, त्या वेळेस आपल्यास तो रवा आहे असें वाटतें, परंतु सोनें या दृष्टीनें पाहूं गेलें असता तो रवा सोनेंच होय ९६ अर्जुना, पाण्याचा ओघ वाकडा असला म्हणजे पाणी वाकडें दिसतें, परंतु तें खरोखर वाकडें नाहीं, लोखंड तापवून लाल झाल्यावर त्याचा आकार दृष्टीस पडतो, तो अग्नीचा नसून लोखंडाचा आहे, ९७ घराच्या आकारानें आकाश वाटोळें दिसतें, व तेंच घराचे चौकांत पाहिलें म्हणजे चौकोनी दिसतें, ९८ परंतु तोच मठ व घट नाश पावल्यावर आकाशाचा नाश होत नाहीं, त्याप्रमाणें जें ब्रह्म मायेचे उपाधीनें विश्वमय होतें, परंतु मायेंत नसतें, ९९ अर्जुना, तें ब्रह्म मन इत्यादि इंद्रियांप्रमाणें व सत्त्वादि गुणांप्रमाणें आकारास आलें आहे असा भास होतो, ९०० परंतु ज्याप्रमाणें गुळाची गोडी ही गुळाच्या आकारांत नसते, त्याप्रमाणें इंद्रियें व गुण यांत ब्रह्म नसतें १ हे कपिध्वजा, ज्याप्रमाणें दुधाच्या अवस्थेंत तूप दुधाच्या आकारानें असतें, परंतु तें दूध म्हणजे तूप नव्हे, २ त्याप्रमाणें जें ब्रह्म विश्वांत भरलेलें असून तें विश्व नव्हे कारण, सुवर्णाचे अलंकार बनविल्यावर त्यास आपण फूल, वाळा अशीं नांवें देतो, बाकी सुवर्णदृष्टीनें सोनें तें सोनेंच ! ३ याप्रमाणें मी उघड मराठी भाषेंत सांगतो. अर्जुना, ब्रह्म हें गुण व इंद्रियें यांपासून वेगळें आहे ४ नांव, रूप, संबंध, जाति, क्रिया, भेद हे सर्व प्रकार आकारासच लागू आहेत, ब्रह्माला नाहींत ५ तें ब्रह्म गुण नाहीं, व त्याचा आणि गुणांचा संबंध नाहीं, परंतु त्याचेच ठिकाणीं ते भासतात ६ या कारणावरून, अर्जुना, अज्ञान्यांच्या मनांत असें येतें कीं, गुण हे ब्रह्माचेच आहेत ७ परंतु ब्रह्माच्या ठिकाणीं गुण आहेत असें मानणें, म्हणजे ज्याप्रमाणें ढग आकाशांत दृष्टीस पडतात म्हणून त्यांना आकाश धारण करतें, किंवा आरशांत पाहत असतां तें प्रतिबिंब दृष्टीस पडतें तें आरशाचेंच आहे, असें म्हणण्याप्रमाणें होय ८ किंवा समुद्राचें प्रतिबिंब पाणी धारण करतें, अथवा सूर्यरश्मी मृगजळ धारण करितात, असें वास्तविक नसतांना लोक समजतात ९ गुणांचा व ब्रह्माचा संबंध नसतांनाही ब्रह्म गुणांला धारण करतें असा जो निश्चय तो भ्रांतिमुळें व्यर्थ आहे ९१० ज्याप्रमाणें भिकारी मनुष्य स्वप्नांत राज्याचा उपभोग घेतो हें मिथ्या होय, त्याप्रमाणें ब्रह्म स्वतः निर्गुण असतां गुणांचा भोग घेतें, हें म्हणणें व्यर्थ होय ११ म्हणून, ब्रह्म गुणांचा संग करतें अथवा गुणांचा उपभोग घेतें, असें म्हणतां येत नाहीं १२

तें [ सर्व ] भूतांच्या बाहेर असून आंतही आहे, स्थिर असून हालणारें आहे, अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें जाणतां येत नाहीं, आणि दूर असून जवळही आहे. ॥ १५ ॥

हे पांडुसुता, अग्नीचे निखारे जरी पुष्कळ आकाराचे निरनिराळे असले, तरी त्यांतील उष्णता ज्याप्रमाणें एकच होय, त्याप्रमाणें चराचर भूतांस जें ब्रह्म व्यापक आहे १३ याप्रमाणें, जें अविनाशी असून सूक्ष्मपणानें सर्व जगास व्यापून आहे, तें प्रस्तुतचें ज्ञेय आहे १४ जें शरीराचे आंत असतें व बाहेरही असतें, तसेंच जें पाहिलें असतां जवळ आहे व दूरही आहे, व जें एक असून दुसरा प्रकारच नाहीं १५ क्षीरसागराची गोडी काठाशीं थोडी व मध्यभागीं पुष्कळ अशी नसते, त्याप्रमाणें जें सर्वत्र व्यापक असून पूर्ण आहे, १६ जारज, अंडज, स्वेदज व उद्भिज्ज या सर्व वेगळाल्या भूतांच्या ठिकाणीं ज्याच्या अखंडपणाला हानि नाहीं, १७ हे भ्रातृशिरोमणे, हजारों घटांच्या निराळ्या आकारांत चंद्राचें बिंब निराळें दिसतें, परंतु त्याला जसा भेद नाहीं, १८ मिठाच्या पुष्कळ राशी जरी असल्या तरी सर्वांचा खारटपणा जसा एक असतो, अथवा मोळीभर ऊस जरी असले तरी त्या सर्वांचा गोडी जशी एकच असते, १९

तें ब्रह्म मूळचें विभागलेलें नसून प्राणिमात्राच्या ठिकाणीं विभागल्यासारखें दिसतें, आणि तें सर्व भूतांना धारण करणारें, सर्वांचा नाश करणारें, व सर्वांची उत्पत्ति करणारें आहे ॥ १६ ॥

तशी अनेक भूतमात्रांत ज्याची एकत्वानें व्याप्ति आहे, आणि अर्जुना, विश्वाच्या रचनेंत जें आदिकारण आहे, ९२० म्हणून ज्याप्रमाणें लाटा समुद्रापासून उत्पन्न होऊन लाटांना आधार समुद्रच असतो, त्याप्रमाणें प्राणिमात्राच्या उत्पत्तीला जो हेतु तोच त्याचा आधार आहे, २१ बाल्या-

तीन्हीं वयसां । काया एकचि जैसी । तैसें आदिस्थितिग्रासीं । अखंड जें ॥२२॥ सायंप्रातर्मध्यान्ह । होतां जातां दिनमान । तैसें का गगन । पालटेना ॥२३॥ अगा सृष्टीवेळे प्रियोत्तमा । जया नांव म्हणती ब्रह्मा । त्यासि जें विष्णुनामा । पात्र जाहलें ॥२४॥ मग आकारु हा हारपे । तेव्हां रुद्र जें म्हणिपे । तेही गुणत्रय जेव्हां लोपे । तैं जें शून्य ॥२५॥ नभाचें शून्यत्व गिळून । गुणत्रयातें तुरंऊन । तें शून्य तें महाशून्य । श्रुतिवचनसंमत ॥२६॥

**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।**
**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् १७**

तत् ज्योतिषां अपि ज्योतिः (अस्ति), तमसः परं उच्यते ज्ञानं, ज्ञेयं, ज्ञानगम्यं (अस्ति), सर्वस्य हृदि धिष्ठितम् (अस्ति) ॥ १७ ॥

जें अग्नीचें दीपन । जें चंद्राचें जीवन । सूर्याचे नयन । देखती जेणें २७ जयाचे उजियेडें । तारागण उजळडे । महातेज सुरवाडें । राहाटे जेणें ॥२८॥ जें आदीची आदी । जें वृद्धीची वृद्धी । बुद्धीची जे बुद्धी । जीवाचा जीवु २९ जें मनाचें मन । जें नेत्राचें नयन । कानाचे कान । वाचेची वाचा ॥ ९३० ॥ जें प्राणाचा प्राण । जें गतीचे चरण । क्रियेचें कर्तेपण । जयाचेनी ॥ ३१ ॥ आकारु जेणें आकारे । विस्तारु जेणें विस्तारे । संहारु जेणें संहारे । पांडुकुमरा ॥३२॥ जें मेदिनीची मेदिनी । जें पाणी पिऊनि असे पाणी । तेजा दिवे लावणी । जेणें तेजें ॥३३॥ जें वायूचा श्वासोश्वासु । जें गगनाचा अवकाशु । हें असो आघवाचि आभासु । आभासे जेणें ॥३४॥ किंबहुना पांडवा । जें आघवेंचि असे आघवा । जेथ नाहीं रिगावा । द्वैतभावासी ॥३५॥ जें देखिलियाचि सरे । दृश्य द्रष्टा हें आघवें । एकवाट कालवे । सामरस्यें ॥३६॥ मग तेंचि होय ज्ञान । ज्ञाता ज्ञेय हें । जेणें गमिजे स्थान । तेंहि तेंचि ॥३७॥ जैसें सरलिया लेख । आंक होती एक । तैसें साध्यसाधनादिक । ऐक्यासि ये ॥ ३८ ॥ अर्जुना जिये ठायीं । न सरे द्वैताची वही । हें असो जें हृदयीं । सर्वांच्या असे ॥ ३९ ॥

**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।**
**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥१८॥**

इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं च समासतः उक्तं, मद्भक्तः एतत् विज्ञाय मद्भावाय उपपद्यते ॥ १८ ॥

एवं हें तुजपुढां । आदीं क्षेत्र सुहाडा । दाविलें फाडोवाडा । विवंचुनी ॥९४०॥ तैसेंचि क्षेत्रापाठीं । जैसेनि देखसी दिठी । तें ज्ञानही किरीटी । सांगितलें ॥४१॥ अज्ञानाही कौतुकें । रूप केलें निकें । जंव आयणी तुझी टेंके । पुरे म्हणे ॥४२॥ आणि आतां हें रोकडें । उपपत्तीचेनि पवाडें । निरूपिलें उघडें । ज्ञेय पैं गा ॥४३॥ हे आघवीच विवंचना । । बुद्धी भरोनि अर्जुना । मतिसिद्धिभावना । माझिया येती ॥ ४४ ॥ देहादि परिग्रहीं । संन्यासु करूनिया जिहीं । जीवु माझ्या ठाईं । वृत्तिकु केला ॥४५॥ ते मातें किरीटी । हेचि जाणोनिया शेवटीं । आपणपयां साटोवाटी । मीचि होती ॥४६॥ मीचि होती परी । हे मुख्य गा अवधारीं । सोहोपी सर्वांपरी । रचिली आम्हीं ॥४७॥ कडा पायरी कीजे । निराळीं माचु बांधिजे । अथावीं सुइजे । तरी जैसी ॥४८॥ एऱ्हवीं अघवेंचि आत्मा । हें सांगों जरी वीरोत्तमा । परी तुझिया मनोधर्मा । मिळेल ना ॥४९॥ म्हणोनि एकाचि संचलें । चतुर्धा आम्हीं केलें । जें अदळपण देखिलें । तुझिये प्रज्ञे ॥५०॥ पैं बाळ जैं जेवविजे । तैं घांसु विसा ठायीं कीजे । तैसें एकचि हें चतुर्व्यांजें । कथिलें आम्हीं ॥५१॥ एक क्षेत्र एक ज्ञान । एक ज्ञेय एक अज्ञान । हे भाग केले अवधान । जाणोनि तुझें ॥५२॥ आणि

अवस्था, तारुण्यावस्था व वृद्धावस्था, त्यांना जसें एकच शरीर आधारभूत असतें, तरी उत्पत्ति, स्थिति व लय ह्या तिन्ही अवस्थांस जें आधारभूत आहे, २२ प्रातःकाळ मध्यान्हकाळ व सायंकाळ हे दिवसाचे तिन्ही काळ जरी गेले, तरी आकाशात जसा पालट नसतो, २३ हे प्रियोत्तमा, सृष्टीच्या उत्पत्तिकाळीं ज्याला आपण ब्रह्मदेव म्हणतो, व व्याप्तिकाला ह्मणजे स्थितिकालीं ज्याला विष्णु हे नाव देतों, २४ मग लय करते वेळेस ज्याला आपण रुद्र असे ह्मणतो, व हा तिन्ही कार्य ज्या वेळेस लोप पावतात, त्या वेळेस जें शून्य असतें त्याला प्रकृति असें ह्मणतो, २५ आणि आकाशाचे शून्यत्व गिळून गुणत्रय नाहींसें करणारें जें प्रकृतिशून्य, त्याला जें नाहींसें करतें, तें श्रुतींनी वर्णन केलेलें महाशून्य तेंच आमचें ज्ञेय होय २६

**तें ब्रह्म चंद्रसूर्यादिकानाही प्रकाश देणारें आहे, तें अज्ञानरूप अंधकाराच्या पलीकडे आहे असें म्हणतात, तें ज्ञानस्वरूप आहे, ज्ञेयस्वरूप आहे, व ज्ञानानें मिळण्याजोगें आहे, आणि तेंच सर्वांच्या हृदयामध्यें विद्यमान आहे. ॥ १७ ॥**

जें ब्रह्म अग्नीला दीपन करण्याची शक्ति देतें, ज्या चंद्रापासून जगतात अमृताची प्राप्ति होते, त्याला जें अमृत देतें, ज्या सूर्याचे उजेडापासून सर्व जग व्यवहार करितें, त्याला ज्याचेपासून दृष्टि प्राप्त होते, २७ ज्याचे तेजानें तारागणास तेज प्राप्त होतें, तसेंच महातेज ज्याचे तेजानें तेजस्वी होतें, २८ जगतात जे मूळ पदार्थ ह्मणून आहेत, त्यांचेंही जें मूळ म्हणजे आदि, जें वृद्धीची वृद्धी, तसेंच बुद्धीची बुद्धी व जीवाचा जीव, २९ जें मनाचें मन, डोळ्याचा डोळा, कानाचा कान व वाचेची वाचा, १३० जें प्राणाचें जीवन, गतीचे चरण व ज्याच्यामुळें क्रियेस कर्तेपणा येतो, ३१ हे पाडुकुमरा, ज्याच्यामुळें आकार, विस्तार व संहार यांना आपापलें रूप प्राप्त होत, ३२ जें पृथ्वीस धारण करणारें, जें पाण्याचें जीवन, व ज्याचे योगानें तेज प्रकाशमान होतें, ३३ जें वायूस वाहण्याची शक्ति देतें व ज्यात आकाश सामावतें, फार काय सांगावें, सर्व भासमान वस्तु ज्याचे तेजानें भासत्या जातात ३४ हे पांडवा, या सर्व जगतात सर्व पदार्थांच्या रूपानें सर्वगणानें आहे, आणि ज्याच्या ठिकाणीं द्वैतभावाचा प्रवेशच नाहीं, ३५ ज्याचें दर्शन होण्याबरोबर द्रष्टा, दृश्य व दर्शन हा त्रिपुटी ज्ञानस्वरूपाच्या ठिकाणीं ऐक्य भावाला येत, ३६ मग तत्र ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान ही त्रिपुटी होऊन ज्याचे योगानें ब्रह्म स्फुरते, तेंहि तत्र होय ३७ ज्याप्रमाणें हिशेबाचा ताळा जमल्यावर हिशेबाच्या कच्च्या कागदाचें काम संपतें, त्याप्रमाणें ब्रह्मप्राप्ति झाल्यावर साध्य व साधक हे भाव नाहींसे होतात ३८ अर्जुना, ब्रह्माचे ठिकाणीं द्वैताचा संचारही रहात नाहीं, आता हें गूढ दें. तें सर्वांच्या हृदयात वास करतें ३९

**याप्रमाणें, क्षेत्र, ज्ञान आणि ज्ञेय हीं संक्षेपानें तुला सांगितलीं. हीं जाणल्यानें माझा भक्त माझ्या रूपाला मिळतो ॥ १८ ॥**

याप्रमाणें, हे प्रियमित्रा, तुला क्षेत्र म्हणजे काय हें सर्व माइन विभागानें कळविलें १४० त्याचप्रमाणें, अर्जुना, त्या क्षेत्रानंतर, तुला उघड दृष्टीनें पहाता येईल अशा रीतीनें ज्ञानही समजून सांगितलें ४१ त्याप्रमाणेंच, तुझे बुद्धीची तृप्ति होऊन तू पुरे म्हणेपर्यंत अज्ञानाच्याही लक्षणाचें कौतुकानें निरूपण केलें ४२ आणि आताच दृष्टांत देऊन तुला ज्ञेय म्हणजे काय तें स्पष्ट करून सांगितलें ४३ अर्जुना, या सर्व गोष्टीचा विचार करून, माझ्या प्राप्तीची इच्छा धरून माझे भक्त मद्रूप होतात ४४ देहादिक परिवाराचा त्याग करून जे माझे ठिकाणीं आपलें चित्त वतनदार करतात, ४५ हे किरीटी, ते माझे भक्त आपलें चित्त मला अर्पण करून व माझें चित्त आपलेकडे घेऊन मद्रूप होतात ४६ अशा रीतीनें मद्रूप होण्याचा सर्वांत सुलभ मार्ग मी मुमुक्षूंकरिता तयार करून ठेवला आहे ४७ कड्यावर चढून जाणें झाल्यास जशा पायऱ्या कराव्या लागतात, किंवा अंतराळीं चढून जाणें असल्यास जसा पहाड बांधावा लागतो, किंवा खोल पाण्यातून तरून जावयाचें असल्यास जशी नाव घालावी लागते, ४८ एऱ्हवीं हे वीरोत्तमा, सर्वत्र आत्मा आहे असें जर तुला वर्णन करून सांगूं लागलों, तर तुला तें स्पष्ट कळणार नाहीं ४९ ह्मणून, तुझी बुद्धि जड आहे असें पाहून, तें एकच ब्रह्म चार विभाग करून सांगितलें, १५० ज्याप्रमाणें मुलाला जेऊं घालावयाचें असलें ह्मणजे जो आपण एक घास घेतों तोच त्याला वीस वेळ थोडथोडा द्यावा लागतो, त्याप्रमाणें ब्रह्म हें चार प्रकारांनीं तुला मी स्पष्ट करून सांगितलें ५१ तुझी अवधानशक्ति पाहून एक क्षेत्र, एक ज्ञान, एक ज्ञेय व एक अज्ञान असे त्या ब्रह्माचे चार भाग केले. ५२ आणि पार्था, इतकें

गम्मतही पार्था । तरी हा अभिप्रावो तुज होता । नये तरी हे व्यवस्था । एक वेळ सांगों ॥ ५३ ॥ आता चौठार्या न करूं । गकहीं म्हणोनि न सरूं । आत्मानात्मया धरूं । सरिसा पातु ॥५४॥ परि तुवा येतुलें करावें । मागों ते आम्हां देआवें । जे कानाचे नाव ठेवावें । आपणपें गा तें ॥ ५५ ॥ या श्रीकृष्णाचिया बोला । पार्थु रोमावितु जाहला । तेथ देवो म्हणती भला । उचवळेना ५६ ऐसेनि तो येता वेगु । धरूनि म्हणे श्रीरंगु । प्रकृतिपुरुषविभागु । परिसें सांगों ॥५७॥ जया सांगाते जगीं । सांख्य म्हणती योगी । जयाचिये आदिवेळागी । पी कपिल जाहलों ॥ ५८ ॥ तो आईक निर्दोखु । प्रकृतिपुरुषविवेकु । म्हणे आदिपुरुखु । अर्जुनातें ॥५९॥

**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।**
**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् १९.**

(त्वं) प्रकृतिं पुरुषं च उभौ अपि अनादी एव विद्धि, विकारान् च गुणान् च प्रकृतिसंभवान् एव विद्धि ॥ १९ ॥

तरि पुरुष अनादि आथी । आणि तैचि लागोनि प्रकृती । ससरिसी दिवाराती । दोनी जैसी ॥९६०॥ कां रूप नोहे वाया । परी रूपा लागली छाया । निकणु वाढे धनंजया । कणसी कोंडा ॥ ६१ ॥ तेसी जाण जवटें । दोन्ही इयें एकवटें । प्रकृतिपुरुष प्रकटें । अनादिसिद्धें ६२ पै क्षेत्र येणें नावें । जें सांगितलें आघवें । तेचि एथ जाणावें । प्रकृति हे गा ॥६३॥ आणि क्षेत्रज्ञ ऐसें । जयातें म्हणितलें असे । तो पुरुष हें अनारिसें । न बोलों वेई ॥६४॥ इयें आनानें नावें । परि निरूप्य आन नोहे । हे लक्षण न चुकावें । पुढतपुढती ॥६५॥ तरी केवळ जे सत्ता । तो पुरुषु गा पांडुसुता । प्रकृतीतें समस्ता । क्रिया नाम ॥६६॥ बुद्धि इंद्रियें अंतःकरण । इत्यादि विकारभरण । आणि ते तीन्ही गुण । सत्वादिक ॥६७॥ हा आवघाचि मेळावा । प्रकृती जाहला जाणावा । हेचि हेतु संभवा । कर्माचिया ॥६८॥

**कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥२०॥**

प्रकृतिः कार्यकारणकर्तृत्वे हेतुः उच्यते, पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुः उच्यते ॥ २० ॥

तेथ इच्छा आणि बुद्धी । घडवी अहंकारेसीं आधीं । मग तिया लाविती वेधी । कारणाच्या ॥६९॥ तेंचि कारण ठाकावया । जें सूत्र धरणें उपाया । तया नाव धनंजया । कार्य पैं गा ९७० आणि इच्छामदाच्या थावीं । लागली मनातें उठवी । ते इंद्रियें राहाटवी । हें कर्तृत्व पैं गा ॥७१॥ म्हणोनि तीन्ही या जाणा । कार्यकर्तृत्वकारणा । प्रकृति मूळ हे राणा । सिद्धांचा म्हणे ॥७२॥ एव तिहींचेनि समवायें । प्रकृति कर्मरूप होये । परि जया गुणा वाढे त्राये । त्याचि सारिखी ७३ जें सत्वगुणें अधिष्ठिजे । तें सत्कर्म म्हणिजे । रजोगुणें निपजे । मध्यम तें ॥७४॥ जें का केवळ तमें । होती जियें कर्में । निषिद्धें अधर्में । जाण तियें ॥७५॥ ऐसेनि संतासतें । कर्में प्रकृतीस्तव होतें । तयापासोनि निर्वाळतें । सुखदुःख गा ॥७६॥ असंतीं दुःख उपजे । सत्कर्मीं सुख निफजे । तया दोहींचा बोलिजे । भोगु पुरुषा ॥ ७७ ॥ सुखदुःखें जववरी । निफजती साचोकारी । तव प्रकृति उद्यमु करी । पुरुषु भोगी ॥७८॥ प्रकृतिपुरुषाची कुळवाडी । सांगतां असगडी । जे आंबुली जोडी । आंबुला खाय ७९ आंबुला आंबुलिये । संगती ना सोये । कीं आंबुली जग विये । चोज ऐका ॥९८०॥

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते प्रकृतिजान् गुणान् ।**
**कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥२१॥**

पुरुषः प्रकृतिस्थः (सन्) प्रकृतिजान् गुणान् भुङ्क्ते हि गुणसंगः अस्य सदसद्योनिजन्मसु कारणं (अस्ति). ॥२१॥

जे अनंगु तो पैंधा । निकवडा गुसधा । जीर्णु अतिवृद्धा । पासोनि वृद्धु ॥८१॥ तया आडनाव पुरुषु । एऱ्हवीं स्त्री ना नपुंसकु । किंबहुना एकु । निश्चयो नाहीं ॥८२॥ तो अचक्षु अश्र-

गरज जर ब्रह्म तुला नीट कळत नसल, तर तुला दुसऱ्या रीतीने आणखी एकदा स्पष्ट करून सांगतो ५३ आता त्याचे चार भाग न करिता, तसेच ते एकही न मानता, आत्मा व अनात्मा ( पुरुष व प्रकृति ) असे दोन भाग करून ते तुला सांगतो ५४ परंतु तू एक गोष्ट कर का, आम्ही मागूं तें आह्मांला दे. ते काय म्हणशील, तर तू लक्षपूर्वक कान देऊन आम्ही सांगूं ते ऐक. ५५ असें श्रीकृष्णाचे वचन ऐकून पार्थाचे अंगावर रोमांच उभे राहिले तेव्हा देव म्हणाले की, याचे मनात ही गोष्ट पूर्णपणे बिंबली आहे. ५६ याप्रमाणे श्रीकृष्णालाही वेग आला, परंतु ता आवरून धरून ते म्हणतात – अर्जुना, तुला ब्रह्माचे प्रकृति व पुरुष असे दोन भाग स्पष्ट करून सांगतो, तें ऐक ५७ प्रकृति व पुरुष याचे ज्यात विवेचन आहे, त्या मार्गाला योगी लोक ' सांख्यमार्ग ' असे ह्मणतात, व ज्याचे पूर्णपणे वर्णन करण्याकरिता मी कपिलावतार घेतला, ५८ तो प्रकृति व पुरुष यांचेविषयी निर्दोष विचार ऐक, असे श्रीकृष्ण परमात्मा अर्जुनास म्हणाले ५९

**प्रकृति आणि पुरुष हे दोन्ही अनादिच आहेत, असें तू समज, आणि विकार व गुण हे प्रकृतीपासूनच उत्पन्न झाले आहेत, असे तू समज**

तरी पुरुष हा अनादि आणि तेव्हापासून त्याला लागूनच प्रकृतिही आहे ज्याप्रमाणे दिवस व रात याची जोड आहे, ९६० छाया ही रूप नव्हे, परंतु ती रूपाबरोबर असते, तसेच, हे धनंजया, बी पेरल्यावर त्याचे बरोबर ज्याप्रमाणें कण व कोंडा ही दोन्ही बरोबरच उत्पन्न होतात, ६१ त्याप्रमाणे प्रकृति व पुरुष ह्यांचे अनादिसिद्ध जोडपे प्रसिद्ध आहे ६२ तर क्षेत्र या नावानें तुला जे सांगितलें, त्यालाच या ठिकाणी प्रकृति म्हणून समजावे, ६३ आणि क्षेत्रज्ञ म्हणून ज्याला म्हणतात, तो पुरुष हे आम्ही निःसंशय सांगतो, असे समज ६४ याचीं जरी ही निरनिराळीं नावे आहेत, तरी त्याजविषयी निरूपण निराळे नाहीं, ही गोष्ट तू वरचेवर पूर्णपणे लक्षात ठेव ६५ हे पांडुसुता, ज्या सत्तेला कधीही नाश नाही, तिला पुरुष असे समजावे व सत्तेच्या योगाने ज्या क्रिया घडतात, त्यांना प्रकृति असें ह्मणावें. ६६ बुद्धि, इंद्रियें, अंतःकरण इत्यादि ज्यापासून विकार उत्पन्न होतात–आणि सत्व, रज व तम हे तिन्ही गुण ६७ या सर्वांची प्रकृतीपासून उत्पत्ति होते व जिचेपासून सर्व कर्मे होतात ६८

**प्रकृति ही कार्य म्हणजे शरीर व करण ह्मणजे तेरा इंद्रिये यांच्या उत्पत्तीला कारण आहे; आणि पुरुष हा सुखदुःखाच्या भोक्तेपणास कारण आहे. ॥ २० ॥**

त्या ठिकाणी इच्छा व बुद्धि यांच्यापासून अहंकार उत्पन्न होतो, व त्यामुळे ती इच्छा व बुद्धि फलप्राप्तीकरिता इंद्रियांना आपापलें काम करण्याकरिता नादी लावतात ६९ तेंच फल प्राप्त होण्याकरिता जो उपाय करावयाचा, त्यास, हे धनंजया, कार्य असे म्हणतात ९७० तीच इच्छा प्रबळ होऊन मन जागृत करते, व त्याजकडून सर्व व्यवहार करविते ७१ म्हणून कार्य, कर्तृत्व व कारण या त्रिपुटीस प्रकृति मूळ होय, असे सिद्धांताचा राणा जो श्रीकृष्ण परमात्मा तो म्हणाला ७२ याप्रमाणे तिन्ही एकत्र झाल्यावर प्रकृति क्रियारूप होते, परंतु ज्या गुणाचा विशेष जोर होईल, त्या गुणाप्रमाणे ती क्रिया घडते ७३ जे कर्म सत्त्वगुणापासून उत्पन्न होते, ते सत्कर्म होय रजोगुणापासून उत्पन्न होते, ते मध्यम, ७४ आणि जीं कर्मे केवळ तमोगुणापासून उत्पन्न होतात, ती निषिद्ध म्हणजे धर्मविरुद्ध कर्मे होत ७५ याप्रमाणे प्रकृतीपासून चांगली व वाईट कर्मे घडतात, व त्या कर्मापासून सुखदुःख प्राप्त होतें ७६ वाईट कर्मापासून दुःख उत्पन्न होतें, सत्कर्मापासून सुख उत्पन्न होते, व त्या दोहोंचा उपभोग पुरुषास घ्यावा लागतो ७७ जोपर्यंत सुख व दुःख सत्यत्वानें उत्पन्न होतें, तोपर्यंत व्यापार प्रकृतीचा व भोग पुरुषाचा ७८ प्रकृति व पुरुष याचा व्यापार इतका विसंगत आहे कीं, स्त्रीनें मिळवावे व नवऱ्याने स्वस्थ बसून खावे ७९ काय चमत्कार आहे पहा का, या स्त्रीपुरुषांचा कधीही संग न घडता स्त्रीपासून जगाची उत्पत्ति होते ९८०

**पुरुष प्रकृतीशी संबंध ठेवून प्रकृतीच्या गुणांचा उपभोग घेतो; व गुणसंबंध हाच पुरुषाच्या बऱ्या–वाईट जन्माला कारण होतो. ॥२१॥**

जो पुरुष ब्रह्म निराकार असून उदासीन आहे, तसेच निर्धन असून केवळ एकटा आहे आणि जीर्ण असून, या जगात जी अति वृद्ध वस्तु असेल तिच्यापेक्षाही वृद्ध आहे, ८१ त्याला आडनाव पुरुष हे आहे. एऱ्हवीं तें स्त्री किंवा नपुंसक यांपैकी निश्चयानें कोणतेंच सांगता येत नाहीं. ८२ त्याला डोळे, कान, हात, पाय, रूप, वर्ण व नाव हें

वणु । अहम्नु अचरणु । रूप ना वर्णु । नाम आथी ॥८३॥ अर्जुना काहींचि जेथ नाहीं । तो प्रकृतीचा भर्ता पाहीं । की भोगणें ऐसयाही । सुखदु खाचें ॥८४॥ तो तरी अकर्ता । उदासु अभोक्ता । परि इया पतिव्रता । भोगविजे ॥८५॥ जियेतें अळुमाळु । रूपागुणाचा चाळढाळु । ते भलतैसाही खेळु । लेखा आणी ॥८६॥ इये प्रकृती तव । गुणमयी हेंचि नाव । किंबहुना सावेव । गुण तेचि हे ॥८७॥ हे प्रतिक्षणीं नित्य नवी । रूपा गुणाचीच आघवी । जडातेंही माजवी । इयेचा माजु ॥८८॥ नामें इयें प्रसिद्धे । स्नेहो इया स्निग्धें । इंद्रियें प्रवुद्धे । इयेचेनि ॥ ८९ ॥ कायि मन हें नपुंसक । की तें हिंडवी तिन्ही लोक । ऐसें ऐसें अलौकिक । करणें इयेचें ९९० हे भ्रमाचें महाद्वीप । हे व्याप्तीचें रूप । विकार उमप । इया केले ॥९१॥ हे कामाची मांडवी । हे मोहवनींची माधवी । इये प्रसिद्धचि दैवी । माया हें नाम ॥९२॥ हे वाङ्मयाची वाढी । हे साकारपणाची जोडी । प्रपंचाची धाडी । अभंग हे ॥९३॥ कळा येथूनि जालिया । विद्या इयेच्या केलिया । इच्छा ज्ञान क्रिया । वियाली हे ॥९४॥ हे नादाची टाकसाळ । हे चमत्काराचें वेळाउळ । किंबहुना सकळ । खेळु इयेचा ॥९५॥ जे उत्पत्ति प्रलयो होत । ते इयेचे सायंप्रात । हें असो अद्भुत । मोहन हे ॥९६॥ हे अद्वयाचें दुसरें । हे नि.सगाचें सोयरें । हे निराळेंसि घरें । नांदतु असे ॥९७॥ इयेतें गेतुलावरी । सौभाग्यव्यासी थोरी । म्हणोनि तया आवरी । अनावरातें ॥९८॥ तयाच्या तव ठायीं । निपटूनि काहींचि नाहीं । कीं तया आघवेंही । आपणचि होय ॥९९॥ तया स्वयंभाची संभूती । तया अमूर्ताची मूर्ती । आपण होय स्थिती । ठावो तया ॥१०००॥ तया अनाप्तांची आर्ती । तया पूर्णाची तृप्ती । तया अकुळाची जाती । गोत होय ॥१॥ तया अचर्चाचें चिन्ह । तया अपारानें मान । तया अमनस्काचें मन । बुद्धी ही होय ॥ २ ॥ तया निराकाराचा आकारु । तया निर्व्यापाराचा व्यापारु । निरहंकाराचा अहंकारु । होऊनि ठाके ॥ ३ ॥ तया अनामाचें नाम । तया अजाचें जन्म । आपण होय कर्म । क्रिया तया ॥४॥ तया निर्गुणाचे गुण । तया अचरणाचे चरण । तया अश्रवणाचे श्रवण । अचक्षूचे चक्षु ॥५॥ तया भावातीताचे भाव । तया निरवयवाचे अवयव । किंबहुना होय सर्व । पुरुषाचें हे ॥६॥ ऐसेनि इया प्रकृती । आपुलिया सर्व व्याप्ती । तया अविकारातें विकृती- । माजीं कीजे ॥७॥ तेथ पुरुषत्व जें असे । तें ये प्रकृतिदशे । चंद्रमा अवसे । पडिला जैसा ॥८॥ विदळ बहु चोखा । मीनलिया वाला एका । कसु होय पाचका । जयापरी ॥९॥ का साधूतें गोंधळी । संचरोनि मुये मैळी । नाना सुदिनाचा आभाळीं । दुर्दिनु कीजे ॥१०१०॥ जेवि पय पशूच्या पोटीं । का वन्हि जैसा काष्ठीं । गुंडूनि घेतला पटीं । रत्नदीपु ॥११॥ राजा पराधीनु जाहला । की सिंहु रोगें रुधला । तैसा पुरुष प्रकृती आला । स्वतेजा मुके ॥१२॥ जागता नरु सहसा । निद्रा पाडूनि तैसा । स्वप्नीचिया सोसा । वश्यु कीजे ॥१३॥ तैसें प्रकृति जालेपणें । पुरुषा गुण भोगणें । उदास अतुरीगुणें । आतुडे जेवी ॥१४॥ तैसें अजा नित्या होये । आंगीं जन्ममृत्यूचे घाये । वाजती जै लाहे । गुणसंगातें ॥१५॥ परि तें ऐसें पडसुता । तातलें लोह पिटितां । जेवी वन्हीसीवि घाता । बोलती तया ॥१६॥ कां आंदोळलिया उदक । प्रतिमा होय अनेक । तें नानात्व म्हणती लोक । चंद्री जेवीं ॥१७॥ दर्पणाचिया जवळिका । दुजेपण जैसें ये मुखा । कां कुंकुमें स्फटिका । लोहितत्व ये ॥१८॥ तैसा गुणसंगमें । अ-

काहीएक नाही ८३ अर्जुना, ज्याला कोणतेही अवयव नाहीत, असा हा प्रकृतीचा नवरा असून त्यालाही सुख-दुःख भोगावे लागते ८४ तो कर्म न करणारा, उदासीन व उपभोग न घेणारा असा जरी आहे, तरी ही पतिव्रता प्रकृति त्याला उपभोग घेण्यास लावते ८५ ही प्रकृति आपल्या गुणाच्या व रूपाच्या अनुरोधाने विलक्षण खेळ करून दाखविते, ८६ म्हणून या प्रकृतीला गुणमयी असे नाव दिले आहे, किंबहुना ही मूर्तिमंत गुणच आहे ८७ ही क्षणोक्षणी नित्य नवी असून रूप व गुण यांनी युक्त आहे, व ही जड वस्तूकडूनही आपले कर्तबगारीने कर्म करविते ८८ नाव, प्रीति, इंद्रिये या सर्वांचे व्यापाराला ही कारण आहे ८९ पाहूं गेले असता मन हे नपुंसक असूनही त्याला तिन्ही लोकात हिंडविते याप्रमाणे हिचा अलौकिक करणी आहे ९९० ही भ्रमाचे केवळ महाद्वीप स्वयमेव व्याप्ति करणारी व अमर्याद विकार उत्पन्न करणारी अशी आहे. ९९१ ही कामरूप वेलीचा मांडव असून मोहरूप वनाचा वसंत ऋतु आहे, व ही दैवी माया या नावाने प्रसिद्ध आहे ९२ ही शब्दमय शास्त्राची वाटी आहे, ही निराकाराला आकार देणारी आहे, व प्रपंचाची सतत धाड घालणारी आहे ९३ सर्व कला हिच्यापासून उत्पन्न झालेल्या असून, सर्व विद्याही हिनेच केलेल्या आहेत, आणि इच्छा, ज्ञान व क्रिया यासही हीच व्यायली आहे. ९४ ही नादाची ( छंदाची ) टाकसाळ आहे, ही चमत्काराचे घर आहे फार काय सांगावे! हा सर्व खेळ हिचाच आहे. ९५ जगाची उत्पत्ति आणि प्रळय जे होतात ते हिचे सायं-प्रातःकाल होत हें असो, ही जगाला अद्भुत मोह घालणारी आहे ९६ ही अद्वयाची दुसरी मूर्ति आहे, ही संगरहिताची सोबतीण आहे, आणि हिचें वास्तव्य शून्यात असून त्या ठिकाणी ही नांदते ९७ याप्रमाणे हिच्या सौभाग्याचा महिमा आहे, म्हणूनच अनावर असे जे ब्रह्म त्याला ही आवरते ९८ वस्तुतः ब्रह्माचे ठिकाणी कोणतेच विकार नाहीत, परंतु त्याचे ठिकाणी ही आपण स्वतः विकार बनते ९९ त्या स्वयंभूला उत्पत्ति, त्या निराकाराला आकार, स्थिति व ठिकाण आपणच बनते. १००० त्या इच्छारहिताची इच्छा, त्या पूर्णाची तृप्ति, त्या कुलरहिताची जात व गोतही आपणच होते. १ त्या अवर्णनीयाचें लक्षण, त्या अपाराचे प्रमाण, आणि अमनस्काचे मन व बुद्धिही आपणच होते. २ त्या निराकाराचा आकार, निर्व्यापाराचा व्यापार, व निरहंकाराचा अहंकारही आपणच होऊन रहाते ३ त्या नामरहिताचे नाव, व त्या जन्मरहिताचा जन्म, आणि कर्म व क्रिया आपणच होऊन रहाते ४ त्या निर्गुणाचे गुण, त्या अचरणाचे चरण, त्या अश्रवणाचे कान व अचक्षुचे नेत्र आपण होऊन रहाते ५ त्या भावातीताचे भाव, निरवयवाचे अवयव, किंबहुना माया आपण स्वतःच पुरुषाचे सर्व विकार बनते ६ याप्रमाणे प्रकृति आपल्या सामर्थ्याने त्या अविकारी ब्रह्माला विकारग्रस्त करते ७ ज्याप्रमाणे अमावास्येच्या दिवशी चंद्राचें तेज लोपते, त्याप्रमाणें ब्रह्माचे तेज या प्रकृतीच्या पुढे पडत नाही ८ उत्तम प्रकारच्या सोन्यात जर वालभर अन्य धातु मिसळला, तर त्या सर्व सोन्याचा कस जमा कमी लागतो, ९ अथवा सदाचारी मनुष्यही संध्याकाळी अपवित्र जागेत गेला असता त्यास पिशाच्चबाधा होऊन तो जसा वेडा होतो, अथवा ढग जसे दोनप्रहरच्या वेळी स्वच्छ आकाशात निबिड अंधकार करून सुदिनाचा दुर्दिन करतात, १०१० ज्याप्रमाणे गाईचे पोटात दूध किंवा लाकडात अग्नि असतो, अथवा उत्तम रत्नाचे तेज वस्त्रात गुंडाळून घेतल्यावर बाहेर पडत नाही, ११ राजा पराधीन झाल्यावर किंवा सिंह रोगग्रस्त झाल्यावर ज्याप्रमाणे त्याचे तेज लोपते, त्याप्रमाणें, पुरुष प्रकृतीच्या अधीन झाल्यावर त्याचे तेज पडत नाही १२ झोप जशी जागृत अवस्थेत असलेल्या पुरुषाला तो निजल्यावर सहज स्वप्नातील सुखदुःख भोगावयास लावते. १३ त्याप्रमाणे, प्रकृतीच्या आधीन झाल्यामुळे पुरुषाला गुण भोगावे लागतात. ज्याप्रमाणे उदासीन पुरुष असला तरी स्त्रीच्या अधीन झाला म्हणजे तिच्या नादानें अगदींच वेडा होऊन जातो, १४ त्याप्रमाणे, ते ब्रह्म अज आणि नित्य आहे, तरी ते प्रकृतीच्या अधीन होऊन त्याला गुणसंग झाला म्हणजे जन्ममृत्यूचे घाव सोसावे लागतात. १५ परंतु अर्जुना, हे कसे आहे म्हणशील, तर तापलेल्या लोखंडावर घाव घालतेवेळी ते घाव अग्नीवर बसतात असे लोक म्हणतात, १६ किंवा पाणी हालले म्हणजे त्यात चंद्राची अनेक बिंबे दृष्टीस पडतात, व त्यायोगे लोक चंद्राचे ठिकाणी अनेकत्व कल्पितात, १७ आरशात तोंड पाहिल्यावर ज्याप्रमाणे दोन तोंडें दृष्टीस पडतात, किंवा कुंकुवावर स्फटिक मणि ठेविला म्हणजे तो लाल दिसतो, १८ त्याप्रमाणें, गुणाच्या संगतीनें, जन्मरहित जो पुरुष

जन्म। हा जन्मे । पावनु ऐसा गमे । एऱ्हवीं नाहीं ॥१९॥ अधमोत्तम योनी । यासि ऐसिया मानी। जैसा सन्यासी होय स्वप्नीं । अत्यजादि जाती ॥१०२०॥ म्हणोनि केवळा पुरुषा । नाहीं होणें भोगणें देखा । येथ गुणसंगुचि अशेखा- । लागीं मूळ ॥ २१ ॥

**उपद्रष्टाऽनुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।**
**परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥२२॥**

उपद्रष्टा, अनुमन्ता, भर्ता, भोक्ता, महेश्वर , अपि च पर मात्मा इति उक्त पर पुरुष अस्मिन् देह (अस्ति) ॥२२॥

हा प्रकृतिमाजी उभा । परि जुई जैसा वोथंबा । इया प्रकृति पृथ्वीनभा । तेतुला पाडु ॥२२॥ प्रकृतिसरितेच्या तटीं । मेरु होय हा किरीटी । माजि बिंबे परी लोटी । लोटों नेणे ॥२३॥ प्रकृति होय जाये । हा तो असतुचि आहे । म्हणोनि आब्रह्माचें होये । शासन हा ॥२४॥ प्रकृति येणे जिये । याचिया सत्ता जग विये । इयालागी इये । वरपेतु हा ॥२५॥ अनंतें काळें किरीटी । जिया मिळति इया सृष्टी । तिया रिगती ययाच्या पोटीं । कल्पांतसमयीं ॥२६॥ हा महद्ब्रह्मगोसावी । ब्रह्मगोळलाघवी । अपारपणें मवी । प्रपंचातें ॥२७॥ पैं या देहामाझारी । परमात्मा ऐसी जे परी । बोलिजे ते अवधारी । ययातेंचि ॥ २८ ॥ अगा प्रकृतिपरौता । एकु आथी पडुसता । ऐसा प्रवादु तो तत्त्वता । पुरुषु हा पैं ॥ २९ ॥

**य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥२३॥**

यः एवं पुरुषं गुणैः सह प्रकृतिं च वेत्ति, सः सर्वथा वर्तमानः अपि भूयः न अभिजायते. ॥ २३ ॥

जो निखळपणें येणें । पुरुषा यया जाणे । आणि गुणाचें करणें । प्रकृतीचें तें ॥ १०३० ॥ हें रूप हे छाया । पैल जळ हे माया । ऐसा निवाडु धनंजया । जेवि कीजे ॥३१॥ तेणें पाडें अर्जुना । प्रकृतिपुरुषविवेचना । जयाचिया मना । गोचर जाहली ॥ ३२ ॥ तो शरीराचेनि मेळें । करू का कर्मे सकळें । परि आकाश धुई न मैळे । तैसा असे ॥३३॥ आथिलेनि देहें । जो न घेपे देहमोहें । देह गेलिया नोहे । पुनरपि तो ३४ ऐसा तया एकु । प्रकृतिपुरुषविवेकु । उपकारु अलौकिकु । करी पैं गा ॥३५॥ परि हाचि अंतरीं । विवेक भानूचियापरी । उदैजे ते अवधारी । उपाय बहुत ॥ ३६ ॥

**ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मानमात्मना ।**
**अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चाऽपरे ॥२४॥**

केचित् ध्यानेन आत्मना आत्मनि आत्मानं पश्यति, अन्ये सांख्येन योगेन ( आत्मानं पश्यन्ति, ) अपरे च कर्मयोगेन ( आत्मानं पश्यन्ति ) ॥ २४ ॥

कोणी एकु सुभटा । विचाराचा आगिटा । आत्मानात्माकिटा । पुटें देउनी ॥३७॥ छत्तीसही वानी भेद । तोडोनिया निर्विवाद । निवडिती शुद्ध । आपणपे ३८ तया आपणपयाच्या पोटीं । आत्मध्यानाचिया दिठीं । देखती गा किरीटी । आपणपेंचि ॥३९॥ आणि पैं दैवबगें । चित्त देती सांख्ययोगें । एक ते अगलगें । कर्माचेनि १०४०

**अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वाऽन्येभ्य उपासते ।**
**तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥२५॥**

अन्ये तु एवम् अजानंतः अन्येभ्यः श्रुत्वा उपासते, ते श्रुतिपरायणाः च अपि मृत्युं अतितरंति एव. ॥ २५ ॥

येणें येणें प्रकारें । निस्तरती साचोकारें । हें भवभिउरें । आघवेंचि ॥ ४१ ॥ परि ते करिती ऐसें । अभिमानु दवडूनि देशें । एकाचिया विश्वासें । टेंकती बोला ॥४२॥ जे हिताहित देखती । हानि कणवा घेपती । पुसोनि शिणु हरिती । देती सुख ॥४३॥ तयाचेनि मुखें जें निघे । तेतुलें आदरें चांगें । ऐकोनियां आंगें । मनें होती ॥ ४४ ॥ तया ऐकणेयाचेनि नावें । ठेविती गा

तो जन्म घेतो असे वाटते, परंतु त्याच्यावर पाहू गेले असता तशी गोष्ट नाही १९ पुरुष उत्तम व वाईट योनीत जन्म घेतो असे वाटते, पण ज्याप्रमाणे मनुष्य हा स्वप्नात आपण अंत्यजादि जातीत प्रविष्ट झालो आहो असे पहातो, पण ते सत्य नसते, त्याप्रमाणे असे वाटणे हा केवळ भास होय १०२० म्हणून, तो पुरुष, त्याला जन्ममृत्यु हे भोगावे लागत नाहीत, परंतु तसे वाटते, याला सर्व कारण, प्रकृतीच्या गुणांचा संगत होय २१

**साक्षिभूत, प्रवृत्तीला अनुकूल असणारा धारण करणारा, उपभोग घेणारा, परमेश्वर, आणि ज्याला परमात्मा असें म्हटलें आहे, असा श्रेष्ठ पुरुष या देहामध्ये विद्यमान आहे ॥ २२ ॥**

हा पुरुष प्रकृतीचे ठिकाणी आहे, पण जुईच्या झाडाला टेका देण्याकरिता उभा केलेला खांब ज्याप्रमाणे त्या झाडाच्या सर्व विकारापासून अलिप्त असतो, त्याप्रमाणे अलिप्त आहे, आणि प्रकृतीत व यात जमीन-अस्मानाचे अंतर आहे, २२ अर्जुना, हा प्रकृतिरूप नदीच्या तीरावर मेरु पर्वताप्रमाणे अचल उभा असतो, आणि याचे प्रतिबिंब जरी नदीत पडलेले असते, तरी तिच्या प्रवाहाने हा वाहून जात नाही २३ प्रकृति उत्पन्न होते व लयही पावते, तथापि हा कायमच असतो, म्हणून सर्व जगताचा हा शास्ता आहे. २४ प्रकृति याचे योगाने वाचते, व याच्याच सत्तेने ती जग निर्माण करिते, म्हणून हा प्रकृतीचा भर्ता होय. २५हे किरीटी, अनंत कालापासून चालत आलेली सृष्टि कल्पांतसमयीं याच ठिकाणी लय पावते २६ हा प्रकृतीचा स्वामी आहे व या ब्रह्मांडाचा सूत्रधार असून आपल्या थोरपणाने प्रपंचाला अजमावणारा आहे, २७ व या देहात परमात्मा म्हणून जो म्हणतात, तो हाच होय, असे समज २८ हे पांडुसुता, प्रकृतीच्या पलीकडे एक पुरुष आहे असें जे म्हणतात, तो खरोखर हा होय. २९

**जो याप्रमाणें परमात्म्याला आणि गुणांसह प्रकृतीला जाणतो, तो सर्व प्रकारांनी कर्म करीत असला तरी पुनः जन्म पावत नाही. ॥ २३ ॥**

जो या पुरुषाला याप्रमाणे पूर्णपणे जाणतो, आणि तसेच, सर्व गुण व कर्म प्रकृतीची आहेत हे जाणतो, १०३०हे धनंजया, हे रूप, ही छाया, हे पलीकडील सत्य जल, व हे पलीकडील मृगजल असा निर्णय ज्याप्रमाणे शाहणा मनुष्य करितो, ३१ त्याप्रमाणे अर्जुना, ज्याने आपले मनाशीं प्रकृति व पुरुष यांच्या स्वरूपाचा यथार्थ विचार केल्याने त्या मनाचा प्रकार आहे ३२ तो शरीराने जरी सर्व कर्म करीत असला, तरी आकाश जसे धूळ उडून उठल्याने मळत नाही तसा तो प्रकृतीच्या कर्मानें लिप्त होत नाही ३३ निश्चलपणा जो त्याच्या मोहात पडून प्रकृतीच्या आधीन होत नाही, तो देह गेल्यावर पुन जन्म पावत नाही, म्हणजे जन्ममरणापासून मुक्त होतो ३४ असा तऱ्हेचा अलौकिक प्रकार प्रकृतिपुरुषांच्या यथार्थ विचारापासून होतो ३५ आता, अंतःकरणामध्ये हाच विचार सूर्याप्रमाणे उदय करून देतील असे उपाय पुष्कळ आहेत, ते ऐक ३६

**कोणी ध्यानाच्या योगाने शुद्ध झालेल्या मनानेच आपल्या ठिकाणी आत्म्याला पाहतात, कोणी सांख्य विचारानें, आणि कोणी कर्मयोगानें आपल्या ठिकाणी आत्म्याला पाहतात ॥२४॥**

हे सुभद्रा, कोणी विचाररूप शेगडीत श्रवणमननरूपी दिव्याग्निरूपी पुढे ठेऊन आत्म्यावरील अनात्मरूप किटाळ काढून टाकून आत्मरूप सुवर्ण शुद्ध करतात, ३७ छत्तीस अडरूपी हिणरस गाळून आपले शुद्ध तत्त्व निवडून घेतात, ३८ मग, अर्जुना, त्या आत्मस्वरूपाच पोटात आत्मज्ञानाच्या दृष्टीने आत्मस्वरूप पहातात ३९ आणि कोणी भक्तिमार्गानें, कोणी विचाराच्या योगानें व कोणी कर्मयोगाच्या आचरणाने आत्मस्वरूपाची ओळख करून घेतात १०४०

**पण, याप्रमाणें ज्यांना आत्म्याचें ज्ञान नाही असे दुसरे लोक गुरुमुखानें आत्म्याचे ज्ञान ऐकून आत्म्याची उपासना करितात, व ते श्रवणानुरूप उपासना करणारेही जन्ममृत्यु तरून जातात. २५**

अशा प्रकारानें खरोखर या संसाररूप सागरातून सर्व तरून जातात ४१ पण ते असे करितात कोणी अभिमान टाकून श्रद्धेने एकाच्या शब्दावर विश्वास ठेवतात ४२ कोणाच्या शब्दावर विश्वास ठेवतात असे म्हणशील तर—जे पुरुष प्राणिमात्राचे हित कशात आहे व अहित कशात आहे हे यथार्थ जाणतात, आणि कळकळीने त्यांची ज्यांत हानि असेल ती आपण होऊन विचारून नाहीशी करितात व त्यास सुख देतात ४३ मग त्या पुरुषाच्या मुखातून जे जे शब्द निघतील त्याचा उत्तम रीतीनें आदर करून श्रवण केल्यावर, आपले तनमन त्याचे ठिकाणी अर्पण करतात ४४ आणि त्या श्रवण करण्यालाच दान, धर्म, तप इत्यादि नावे ठेवतात, फार काय सांगावें, ज्यांच्या मुखातून निघणाऱ्या अक्षरावरून जी-

आघवें । नया अक्षरासी जीवें । लोण करिती ॥४५॥ तेही अती कपिध्वजा । इया मरणार्णव-समाजा- । पासूनि निश्चती वोजा । गोमटेया ४६ ऐसेंसें हे उपाये । बहुवस एथ पाहें । जाणावया होये । एकी वस्तु ॥४७॥ आतां पुरे हे बहुत । पै सर्वार्थांचे मथित । सिद्धांतनवनीत । देऊं तुज ॥४८॥ येतुलेनि पङ्डुसुता । अनुभव लाहाणा आ-यिता । येर तव तुज होता । सायास नाहीं ४९ म्हणोनि बुद्धि रचू । मतवाद हे खाचू । सोलीव निर्वचू । फलितार्थुचि ॥१०५०॥

**यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजंगमम् ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥२६॥**

भरतर्षभ, यावत किंचित् स्थावरजंगम सत्त्व सजायते, तत क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात ( सजायते इति त्व ) विद्धि ॥ २६ ॥

तरी क्षेत्रज्ञ येणें बोलें । तुज आपणपें जें दा-विलें । आणि क्षेत्रही सांगितलें । आघवें जे ५१ तया येरयेराच्या मेळीं । होइजे भूतीं सकळीं । अनिलसंगें सलिलीं । कल्लोळ जैसे ॥५२॥ कां तेजा आणि उखरा । भेटी जालिया वीरा । मृग-जळाचिया पूरा । रूप होय ॥५३॥ नाना धारा-धरधारीं । झळंबलिया वसुंधरी । उठिजे जेवीं अं-कुरीं । नानाविधीं ॥५४॥ तैसें चराचर आघवें । जें कांहीं जीवु येणें नांवें । तें तों उभययोगें सं-भवे । ऐसें जाण ॥५५॥ इयालागीं अर्जुना । क्षे-त्रज्ञा प्रधाना । पासूनि न होती भिन्ना । भूत-व्यक्ति ॥ ५६ ॥

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंत परमेश्वरम् ।**
**विनश्यत्स्वविनश्यत यः पश्यति स पश्यति २७**

यः विनश्यत्सु सर्वेषु भूतेषु सम तिष्ठन्त अविनश्यत परमेश्वर पश्यति, स पश्यति. ॥ २७ ॥

पैं पटत्व तंतु नव्हे । तरि तंतूसीचि तें आहे । ऐसें खोलीं डोळां पाहें । ऐक्य हें गा ॥ ५७ ॥ भूतें आघवींचि होती । एकाचीं एक आहाती । परी तूं प्रतीती । याची घे पां ॥ ५८ ॥ ययांचीं नामेंही आनानें । अनारिसीं वर्तनें । वेषही सि-नाने । आघवेयांचे ॥५९॥ ऐसें देखोनि किरीटी । भेद सूसी हन पोटीं । तरि जन्मांवियां कोटी । न लाहसी निघों ॥ १०६० ॥ पैं नानाप्रयोजन-शीळें । दीर्घें वक्रें वर्तुळें । होतीं एकीचीच फळें । तुंबिणीयेचीं ॥६१॥ होतु कां उजू वांकुडें । परि बोरीचें हें न मोडे । तैसीं भूतें अवघडें । परि वस्तु उजू ॥६२॥ अंगारकणीं बहुवसीं । उष्णता समान जैसी । तैसा नाना जीवराशीं । परेशु असे ॥६३॥ गगनभरी धारा । परि पाणी एकचि वीरा । तैसा या भूताकारा । सर्वांगीं तो ॥६४॥ हे भूत-ग्राम विषम । परि वस्तु ते एथ सम । घटमठीं व्योम । जियापरी ॥६५॥ हा नाशतां भूताभासु । एथ आत्मा तो अविनाशु । जैसा केयूरादिकीं कसु । सुवर्णाचा ॥६६॥ एवं जीवधर्महीनु । जो जीवेंसीं अभिन्नु । देखे तो सुनयनु । ज्ञानियां-माजी ॥६७॥ ज्ञानाचा डोळा डोळसां- । माजि डोळस तो वीरेशा । हे स्तुति नोहे बहुवसा । भाग्याचा तो ॥ ६८ ॥

**समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥**

( य. ) सर्वत्र समवस्थितम् ईश्वर सम पश्यन् आत्मना आत्मान न हिनस्ति, ( स ) तत. परां गति याति ॥२८॥

हे गुणेंद्रिय धोकोटी । देह धातूंची त्रिकुटी । पांचमेळावा वोखटी । दारुण हे ॥६९॥ हे उ-घड पांचवेंउली । पंचधा आगी लागली । जीव-पंचानना सांपडली । हरिणकुटी हे ॥ १०७० ॥ ऐसां असोनि इये शरीरीं । कोण नित्यबुद्धीची सुरी । अनित्यभावाच्या उदरीं । दाटीजिना ७१ परि इये देहीं असतां । जो नयेचि आपणया,

वाचे निवलोण उतरून टाकतात ४५ हे कपिध्वजा, अशा रीतीने जे वागतात, ते अशी ह्या मृत्युरूप समुद्रातून उत्तम प्रकारे पार पडतात ४६ याप्रमाणे ब्रह्मवस्तु जाणण्याचे या मृत्युलोकी पुष्कळ मार्ग आहेत ४७ पण आता हे बहुत उपाय राहू दे त्या सगळ्याचें मंथन करून सिद्धानरूप नवनीत तुला देतो ४८ त्यामुळे अर्जुना, तुला सहज अनुभव येऊन ब्रह्मरूप होण्यास श्रम पडणार नाहीत, ४९ म्हणून मतवाद्याचें खंडन करून सिद्धान्त ठरवून केवळ शुद्धतत्त्व तुला सागतो १०५०

हे भरतश्रेष्ठा, स्थावर अथवा जगम असा जो कोणताही प्राणी उत्पन्न होतो तो क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांच्या सयोगानें उत्पन्न होतो, असे तू समज. ॥ २६ ॥

तरी ‘ क्षेत्रज्ञ ’ या शब्दाने ज तुला आम्ही दाखविले, आणि ‘ क्षेत्र ’ म्हणून जे सर्व काही सागितले,५१ त्या परस्पराच्या ऐक्यापासून या सर्व सृष्टीचा उत्पत्ति होते व ज्याच्या संयोगानें ज्याप्रमाणें उदकात लाटा उत्पन्न होतात, ५२ किंवा, हे वीरा, माळ जमिनीवर सूर्यकिरण पडल्यावर जशा मृगजलाच्या लाटावर लाटा निर्माण होतात, ५३ अथवा पावसाच्या धारा पृथ्वीवर पडल्यावर ज्याप्रमाणें कोट्यवधि अंकूर जमिनीवर उत्पन्न होतात, ५४ त्याप्रमाणे, सर्व चराचर–ज्याला म्हणून ‘ जीव ’ असे नाव आहे, ते या दोघांच्या संयोगापासून उत्पन्न होतें, असे समज ५५ वास्तव, अर्जुना, पुरुष व प्रकृति याहून भूतव्यक्ति भिन्न नाहीत ५६

जो नाशवत अशा सर्व भूताच्या ठिकाणी सारखेपणानें राहणारा आणि नाश न पावणारा परमेश्वर आहे असे जाणितो, तोच खरा ज्ञानी होय. ॥ २७ ॥

हे पहा–वस्त्र हे जरी ततु नव्हे, तरी ते ततूचेच केलेले आहे, याप्रमाणें जो पूर्ण दृष्टि देऊन पुरुष आणि प्रकृति याच्यामधील ऐक्य पहातो, ५७ ही सर्व भूतें एकापासून एक निर्माण झालेली आहेत, पण तूं याचा अनुभव असा घे, ५८ त्याचप्रमाणें त्याची नावे निरनिराळी असून, वर्तनही भिन्न असतें, आणि सर्वांचे वेषही तन्हेतन्हेचे असतात. ५९ असे पाहून जर तू मनात अशी गाठ मारलीस की, आत्मा व भूतें याचे ठिकाणीं भेद आहे तर, अर्जुना, तू या संसारातून कोट्यवधि जन्मपर्यंत पार पडणार नाहीस १०६० ज्याप्रमाण एकाच भोपळ्याच वेगळ्या जमतेचा आकार असल तमतसे लाब वाटोळे व वाकडे असे भोपळे येतात, ६१ बोरीचे झाडाचा फादा सरळ असो किंवा वाकडा असो, तिला बोरीचीच म्हणतात त्याप्रमाणे जीवमात्र जरी वेडेवाकडे असले तरी त्यातील आत्मा म्हणून जी वस्तु आहे ती सरळच आहे ६२ पुष्कळ निखारे जरी असले, तरी त्याची ऊष्णता सारखीच असते, त्याप्रमाणे पुष्कळ जीवराशी जरी असल्या, तरी त्यातील परमात्मा एकच आहे ६३ वीरा अर्जुना, सर्व गगनातून जरी पावसाच्या धारा पडत असल्या, तरी त्यातील पाणी एकच आहे, त्याप्रमाणे, हे भूताचे आकार जरी निरनिराळे असले, तरी सर्वांचे ठिकाणी परमात्मा म्हणून जो आहे तो एकच आहे ६४ घट अथवा मठ यामधील आकाश जरी निरळ्या आकाराचे असले, तरी ते आकाशरूपाने एकच असते, त्याप्रमाणे, भूते जरी निराळी असली, तरी त्यातील आत्मा म्हणून जी वस्तु आहे ती एकच आहे. ६५ सुवर्णाचे बाहुभूषणे इत्यादि अलकार जरी पुष्कळ असले, तरी सर्वांतील सोन्याचा कस एकच असतो, त्याप्रमाणे, भूताना भास नाशवंत असून त्या सर्वांतील आत्मा हा अविनाशी आहे ६६ याप्रमाणे व्यावहारिक जीवधर्माहून वेगळा आणि पारमार्थिक निवाडा अभिन्न असा परमात्मा आहे असे ज्ञाना लोकात जो बघतो, तोच उत्तम डोळस होय ६७ ज्ञानाच्या डोळ्यामुळे जे डोळस आहेत, त्याच्यातीलही हा मुख्य डोळस होय अर्जुना, ही त्याची स्तुति करितो असे समजू नको फार काय सागू, परमभाग्यवान पुरुष तोच ६८

सर्व भूताचे ठिकाणी परमात्मा समदृष्टीनें आहे असे पाहून जो आपल्या आत्मस्वरूपाचा नाश करीत नाही, तो उत्तम गतीस पोहोंचतो. ॥२८॥

हे शरीर म्हणजे गुण व इंद्रिये याची बोकडी आहे, वात, पित्त व कफ या धातूंनी हे भरलेले आहे, वाईट अशा पचतत्त्वांनी बनलेले असून हे बलवान आहे, ६९ हे उघड उघड पाच नागर्याची इंगळीच होय, याला पाच प्रकारचे अग्नि लागले आहत, व जीवरूप सिंहाला शरीररूपी हरिणाचें खोपट सापडले आहे वास्तविक सिंहाला ज्याप्रमाणें हरिणाच्या खोपटीचा नाश करून टाकण्यास काहीच प्रयास नाही, त्याप्रमाणे जीवाने अनित्य शरीरादिकाचा नाश करून टाकण्यास काहीच अडचण नाही, तथापि काय चमत्कार सांगावा ? कोणीही त्याच्या नित्यभावाचो सुरी अनित्य जे देहादिक याच्या पोटात घालून नाश करीतच नाहीत. १०७०।७१ तथापि अर्जुना,

धाना । आणि शर्मा पडुसुता । तेथेंचि मिळे ७२ जेथ योगज्ञानाचिया प्रौढी । बोलाइनिया जन्म-कोडी । न निगो इया भाषा बुटी । देती योगी ॥७३॥ जे आकाशाचे पैल तीर । जे नादाची पैल मेर । तुर्येचें माजघर । परब्रह्म जे ॥७४॥ मोक्षा-सगट गती । जेथ येती विश्राती । गगादि अपा-पती । सरिता जेवी ॥७५॥ ते सुख येणवि देहें । पाय पाखाळीं लाहे । जो भूतवैषम्यें नोहे । विषमबुद्धी ॥७६॥ दीपाचिया कोडी जैसें । एक चि तेज सरिसें । तैसा जो असतचि असे । सर्वत्र ईशु ॥७७॥ ऐसेनि समत्वे पडुसुता । जिये जो देखत साता । तो मरणा आणि जीविता । नागवे फुडा ॥ ७८ ॥ म्हणोनि तो दैवागळा । वानीत असों वेळोवेळा । जे साम्यसेजे डोळा । लागला तया ॥ ७९ ॥

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।**
**यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥२९॥**

यः च प्रकृत्या एव कर्माणि सर्वशः क्रियमाणानि ( सन्ति इति ) पश्यति, तथा आत्मानं अकर्तारं पश्यति, स पश्यति

आणि मनोबुद्धीप्रमुखे । कर्मेंद्रियें अशेखें । करी प्रकृतीचि हे देखे । साचें जो गा ॥१०८०॥ घरींची राहटती घरीं । घर कांहीं न करी । अभ्र धावे अंबरी । अंबर तें उगें ॥८१॥ तैसी प्रकृति आत्मप्रभा । खेळे गुणी विविधारंभा । येथ आत्मा तो बोधंबा । नेणे कोण ॥८२॥ ऐसेनि येणें नि-वाडें । जयाच्या जीवीं उजिवडें । अकर्तयातें फुडें । देखिलें तेणें ॥८३॥

**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।**
**तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥३०॥**

यदा भूतपृथग्भावं एकस्थं च ततः एव च विस्तारं अनुपश्यति तदा ब्रह्म संपद्यते. ॥ ३० ॥

एऱ्हवीं तेणें अर्जुना । होइजे ब्रह्मसंपन्ना । जे या भूताकृती भिन्ना । दिसती एकीं ॥८४॥ लहरी जैसिया जळीं । परमाणुकणिका स्थळीं । रश्मिकरमंडळी । सूर्याच्या जेवीं ॥ ८५ ॥ नातरी देहीं अवेव । मनीं आघवेचि भाव । विस्फुलिंग सावेव । वन्ही एकीं ॥८६॥ तैसे भूताकार ए-काचे । हें दिठी रिगे जें साचें । तैचि ब्रह्मसंप-त्तीचे । तारूं लागे ॥८७॥ मग जया तया कडे । ब्रह्मचि दिठी उघडे । किंबहुना जोडे । अपार सुख ॥८८॥ येतुलेनि तुज पार्था । प्रकृतिपुरुष-व्यवस्था । ठायें ठावो प्रतिपथा- । माजी जाहली ॥८९॥ अमृत जैसें ये चुळा । कां निधान देखिजे डोळा । तेतुला जिव्हाळा । मानावा हा १०९० जी जाहलिये प्रतीती । घर बांधणें जें चित्तीं । तें आता ना सुभद्रापती । इयावरी ॥९१॥ तरि एक दोनी ते बोल । बोलिजती सखोल । देईं मनातें वोल । मग तें घेईं ॥९२॥ ऐसें देवें म्हणितलें । मग बोलो आदरिलें । तेथें अवधानाचेंचि केलें । सर्वांग येरें ॥९३॥

**अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।**
**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ३१**

कौन्तेय, अयं परमात्मा अनादित्वात्, निर्गुणत्वात, अव्ययः अस्ति, ( अतः ) स शरीरस्थः ( सन् ) अपि न करोति, न ( च ) लिप्यते ॥३१॥

तरि परमात्मा म्हणिपे । तो ऐसा जाण स्वरूपे । जळीं जळें न लिंपे । सूर्यु जैसा ॥९४॥ कां जे जळा आदीं पाठीं । तो असतुचि असे किरी-टी । माजि बिंबे तें दृष्टी । आणिकांचिये ॥९५॥ तैसा आत्मा देहीं । आथि म्हणिपे हें कांहीं । साचें तरी नाहीं । तो जेथिचा तेथें ॥ ९६ ॥

जो ज्ञानी आहे, तो या देहात असताही आपला घात क-रून न घेता शेवटी ब्रह्मपदालाच जाऊन मिळतो ७२ ज्या पदाला योगज्ञानाच्या प्रेमाने कोटावधि जन्म ओलां-डून ' पुनः जन्म घेणार नाही ' असे म्हणून त्या ठि-काणी योगी लोक बुडी देतात, ७३ ते ठिकाण कोणते म्हणशील तर, जे आकाराच्या व नादाच्या पलीकडील व तुर्येचे जे माहेरघर, ज्याला परब्रह्म असे म्हणतात, ७४ आणि गंगादि नद्या समुद्राला जाऊन विश्रांति पावतात, त्याप्रमाणे मोक्षासहवर्तमान सर्व गती ज्या ठिकाणी विश्रां-तीला येतात ७५ अशा तऱ्हेचे सौख्य ज्या पुरुषाला भ-ताच्या ठिकाणी समत्वेकरून विषम बुद्धि नाही त्या पुरु-षास याच देहामध्ये पाश पुण्यास मिळते ७६ पुष्कळ दिवे जरी असले, तरी त्या सर्वांचे तेज एकत्र असते, याप्रमा-णे, पूर्वीपासून अनादि असा जो परमात्मा, तो सर्वत्र भर-लेला आहे ७७ हे पाडुसुता, याप्रमाणे ज्याचे जीव व आत्मा यांविषयी समत्व आहे, तो जन्ममरणाच्या सपा-ट्यात सापडत नाही. ७८ जो साम्यरूप निशाण्यावर स्वस्थ निजला आहे, म्हणून त्याचे भाग्यवान् असे वरचे-वर वर्णन करितो ७९

प्रकृतीच्या योगानेच सर्व प्रकारे कर्मे केली जातात, आणि आत्मा हा कर्ता नाही असे जो पाहतो, तोच खरा ज्ञानी होय. ॥ २९ ॥

आणि मन, बुद्धि इत्यादि पाच ज्ञानेंद्रिये व पाच कर्मे-द्रिये यांचेपासून होणारी कर्मे ही प्रकृतीचा धर्म होत, असे पूर्णपणे जाणतो. १०८० घरातील रहाणारी माणसे सर्व व्यापार करतात, परंतु घर काहीएक करीत नाही, तसेच आकाशात ढग धावताना दृष्टीस पडले, तरी आकाश ज्या-प्रमाणे स्थिर असते, ८१ त्याप्रमाणे प्रकृति आत्म्याचे प्र-काशाने गुणांशी युक्त होऊन पुष्कळ खेळ खेळते, तथापि आत्मा हा खांबाप्रमाणे अचल असून तिने केलेले कर्म जाणीत नाही. ८२ याप्रमाणे अनुभव घेऊन ज्याने आ-पल्या हृदयात प्रकाश पाडला आहे, त्याने अकर्त्या आ-त्म्याला पूर्णपणे जाणले, असे समज. ८३

जेव्हां मनुष्य सर्व भूतांचा वेगळेपणा एका परमेश्वराचे ठिकाणी पहातो, आणि परमेश्वरापा-सूनच या जगाचा विस्तार झाला आहे असे जा-णतो तेव्हां तो ब्रह्मसंपन्न होतो. ॥ ३० ॥

अर्जुना, ज्या वेळेस भिन्न भिन्न असलेली भूते एकरू-पाने पाहतो त्या वेळेसच तो ब्रह्मसंपन्न झाला असे म्हणा-वे ८४ ज्याप्रमाणे पाण्यावरील लाटा, किंवा जमिनीवरील परमाणूंचे कण, अथवा सूर्यमंडलातील सूर्यकिरण, ८५ अथवा देहातील सर्व अवयव, मनातील सर्व भाव, व विस्तवापासून निघणाऱ्या सर्व ठिणग्या, या सर्व गोष्टी आपल्या उत्पत्तिस्थानापासून भिन्न दिसल्या, तरी ज्या धर्मिकेपासून त्या उत्पन्न झाल्या आहेत, त्यांच्याशी त्या साम्यत्वानेच असतात ८६ त्याप्रमाणे, प्राणिमात्र एकच आ-त्म्यापासून उत्पन्न झाले आहेत, असा ज्याच्या मनाचा खरो-खर खात्री झाली आहे, त्यालाच ब्रह्मरूप संपत्तीचे जहाज सापडले, असे म्हणता येईल ८७ मग तो जिकडे पाहील तिकडे त्याला सर्व ब्रह्ममयच दिसते फार काय सांगावे, त्याला अपार सुख होते. ८८ पार्था, याप्रमाणे तुला प्रकृति व पुरुष यांचा व्यवस्था अनुभवसिद्ध दाखले देऊन सांगितली, ती समजली ना ? ८९ ज्याप्रमाणे अमृत हा-तात यावे, किंवा ठेवा दृष्टीस पडावा, त्या योग्यतेचा हा लाभ आहे असे मान १०९० हे सुभद्रापते, या आले-ल्या अनुभवावरून तू आपले मनात जो एक कायम वि-चार करणार असशील, तो इतक्यात करू नको कारण, यावर ९१ तुला आणखी एक दोन गहन विचार मी सांग-णार आहे, ते तू आपले मन मला जामीन दिल्यावर मग सांगेन ९२ याप्रमाणे भगवंतांनी बोलून सांगण्यास आरंभ केला, तो आपले सर्वांग अवधानमय करून अर्जुन ऐक-ण्यास तयार झाला ९३

हे कौंतेया हा परमात्मा अनादि व निर्गुण असल्यामुळे अविनाशी आहे, आणि यामुळे, तो शरीरात असला तरी काही करीत नाही, व कशा-नेही लिप्त होत नाही. ॥ ३१ ॥

ज्याप्रमाणे सूर्याचे प्रतिबिंब पाण्यात पडले असतां त्याजपासून अलिप्त असते, त्याप्रमाणे, परमात्मा म्हणून ज्याला म्हणतात, तो असा–शरीरात असूनही शुद्धस्वरूपच– असतो, असे जाण ९४ हे किरीटी, सूर्य पाणी उत्पन्न हो-ण्याचे अगोदर व मागूनही पूर्वी होता त्याप्रमाणेच कायम असतो, परंतु अज्ञानी लोकांच्या दृष्टीने पाण्यात दृष्टीस पड-ल्यावर त्यास ते प्रतिबिंब सूर्य व भासते, ९५ त्याप्रमाणे आ-त्मा देहात आहे हे म्हणणे खरे नसून, देह उत्पन्न होण्याचे पूर्वीपासून तो जेथे होता तेथेच नंतरही असतो. ९६

आरिसा मुख जैसें । विवळिया नाम असे । देहीं वसणें तैसें । आत्मतत्त्वा ॥९७॥ तया देहा म्हणती भेटी । हे सपार्था निर्जीव गोठी । वारिया वाळुवे गाठी । कैही आहे ॥९८॥ आगी आणि कापुसा । दोरा सुवावा कैसा । केउता सादा आकाशा । पापाणेंसी ॥९९॥ एक निघे पूर्वकडे । एक तें पश्चिमेकडे । तिये भेटीचेनि पाडें । सबधु हा ॥११००॥ उजियेडा आणि आधारेया । जो पाडु मृता उभया । तोचि गा आत्मया । देहा जाण ॥१॥ रात्री आणि दिवसा । कनका आणि कापुसा । अपाडु का जैसा । तैसाचि यासी ॥२॥ देह तव पांचाचें जालें । हे कर्माचे गुणीं गुथलें । भवतसें चाकी सूदलें । जन्ममृत्यूच्या ॥३॥ हे कालानळाच्या तोंडीं । घातली लोणियाची उडी । माशी पांखु पाखडी । तव हे सरे ॥ ४ ॥ हें विपायें आगीत पडे । तरि भस्म होऊनि उडे । जाहलें श्वाना वरपडें । तरि ते विष्ठा ॥ ५ ॥ या चुके दोहीं काजा । तरि होय कृमीचा पुजा । हा परिणामु कपिध्वजा । कश्मलु गा ॥६॥ या देहाची हे दशा । आणि आत्मा तो एथ ऐसा । पै नित्य सिद्ध अपैसा । अनादिपणें ॥७॥ सकळु ना निष्कळु । अक्रियु ना क्रियाशीळु । कृशु ना स्थूळु । निर्गुणपणें ॥८॥ आभासु ना निराभासु । प्रकाशु ना अप्रकाशु । अल्प ना बहुवसु । अरूपपणें ॥ ९ ॥ रिता ना भरितु । रहितु ना सहितु । मूर्तु ना अमूर्तु । शून्यपणें ॥ १११० ॥ आनंदु ना निरानंदु । एकु ना विविधु । मुक्त ना बध्दु । आत्मपणें ॥११॥ येतुला ना तेतुला । आइता ना रचिला । बोलता ना उगला । अलक्षपणें ॥१२॥ सृष्टीचा होणा न रचे । सर्वसंहारें न वेचे । आथी नाथी या दोहींचे । पचत्व तो ॥१३॥ मवे ना चर्चे । वाढे ना खांचे । विटे ना वेंचे । अव्ययपणें ॥१४॥ एवरूप पैं आत्मा । देहीं जें म्हणती प्रियोत्तमा । तें मठाकारें व्योमा । नाम जैसें ॥१५॥ तैसें तयाचिये अनुस्यूती । होती जाती देहाकृती । तो घे ना साडी सुमती । जैसा तैसा ॥१६॥ अहोरात्रें जैसीं । येती जाती आकाशीं । आत्मसत्ते तैसीं । देहें जाण ॥ १७ ॥ म्हणोनि इये शरीरीं । काही करवी ना करी । आयताही व्यापारीं । सज्ज न होय ॥१८॥ यालागीं स्वरूपें । उणा पुरा न घेपे । हें असो तो न लिपे । देहीं देहा ॥१९॥

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।**
**सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥३२॥**

यथा सर्वगत आकाश सौक्ष्म्यात् न उपलिप्यते, तथा सर्वत्र देहे अवस्थित आत्मा न उपलिप्यते ॥३२॥

अगा आकाश कें नाहीं । हें न रिघेचि कवणे ठायीं । परि कायिसेनि कहीं । गादिजेना ॥ ११२० ॥ तैसा सर्वत्र सर्व देहीं । आत्मा असतुचि असे पाहीं । परी संगदोषें एकेंही । लिप्त नोहे ॥२१॥ पुढतपुढती एथें । हेंचि लक्षण निरुतें । जे जाणावें क्षेत्रज्ञातें । क्षेत्रविहीना ॥२२॥

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥३३॥**

भारत, यथा एक रवि इम कृत्स्न लोक प्रकाशयति, तथा क्षेत्री कृत्स्न क्षेत्र प्रकाशयति. ॥३३॥

ज्याप्रमाणे आरशात आपले स्वरूप आहे असा भास होतो, त्याप्रमाणे आत्मा देहात वास करतो हे म्हणणे मिथ्या होय ९७ त्या देहाचा व आत्म्याचा संबंध आहे हे म्हणणे सर्वथैव व्यर्थ होय हे पहा—वारा व वाळू यांची कधी गाठ मारता येईल काय ? कारण, एक अदृश्य व दुसरी जड वस्तु आहे. ९८ तसेच, अग्नि आणि कापूस ही दोन्ही दोऱ्यात कशी ओवता येतील ? आणि आकाश व पाषाण यांचा जोड कसा करता येईल ? ९९ एकाच ठिकाणाहून निघून एक मनुष्य पूर्वेकडे जावयास निघावा, आणि एक पश्चिमेकडे जावयास निघावा, मग त्यांची गाठ पडावी, त्याप्रमाणे हा संबंध आहे ! ११०० उजेड व अंधार, मेलेला व जिवंत मनुष्य यांचा ज्याप्रमाणे एकमेकांशी संबंध नाही, त्याचप्रमाणे आत्मा व शरीर यांचा संबंध नाही, असे समज १ रात्र व दिवस, सोने आणि कापूस यांचा ज्याप्रमाणे संबंध नाही, त्याचप्रमाणे आत्मा व देह यांचा संबंध नाही २ पाहू गेले असता शरीर हे पंचतत्त्वांचे बनलेले आहे, व कर्मांच्या दोऱ्यात गोवलेले आहे, व जन्ममृत्यूच्या सवचक्रात फिरत आहे, ३ कालरूपी अग्नीच्या तोंडात लोण्याच्या उंडीप्रमाणे घातलेले असून, माशीचा पंख हालण्यास जितका वेळ लागतो तितक्या थोड्या वेळात हे शरीर नाहीसे होते ४ हा देह कदाचित् अग्नात पडला, तर त्याची राख होऊन उडून जाते, व कुत्र्याच्या तावडीत सापडला तर त्याची विष्ठा बनते. ५ हे कपिध्वजा, या दोन प्रकारातून जर देह चुकला तर ज्या ठिकाणी हा पडेल त्या ठिकाणी यामध्ये किडे व आळ्या यांचे पुंजकेच्या पुंजके सांपडतात, अशा रीतीने याचा वाईट परिणाम होतो ६ या देहाची ही अशी वाईट दशा होते, परंतु आत्मा तर नित्य सिद्ध व अनादित्वाने सहज आहे ७ तो निर्गुण असल्यामुळे पूर्णही नाही, व अपूर्णही नाही, क्रिया करणारा नाही व क्रिया न करणाराही नाही, तसेच रोडका नाही व लठ्ठही नाही, ८ तो निराकार असल्यामुळे दृश्य नाही व अदृश्यही नाही, तो प्रकाशमान नाही व निस्तेजही नाही, आणि थोडा नाही व पुष्कळही नाही. ९ तो शून्य असल्यामुळे रिकामा नाही व भरलेलाही नाही, कशाविरहित अथवा कशासहितही नाही, आणि तो साकार नाही व निराकारही नाही, १११० तो आत्मरूपाने असल्यामुळे त्याला आनंदही नाही व दुःखही नाही, तो एकही नाही व अनेकही नाही, आणि तो कशापासून मुक्त नाही व कशाने बद्धही नाही, ११ तो लक्षणरहित असल्यामुळे एवढा किंवा तेवढा, आयता किंवा बनलेला, आणि बोलका किंवा मुका असाही नाही १२ सृष्टीच्या होण्याबरोबर हा होत नाही, व सृष्टीचा संहार झाल्यावर लय पावत नाही, आणि हा असणे व नसणे या दोन्ही स्थितींचे लयस्थान होय १३ हा अव्यय असल्यामुळे मोजता व वर्णन करिता येत नाही, हा वाढत अथवा कमी होत नाही, आणि हा विटत नाही किंवा खर्च होत नाही १४ हे प्रियोत्तमा, असे ज्या आत्म्याचे स्वरूप आहे, तो देहात आहे असे जे म्हणतात, त्याचे ते म्हणणे—मठात असलेल्या आकाशाला आकार आहे हे म्हणण्याप्रमाणे आहे १५ तसेच आत्म्याच्या व्यापक स्थितीत देहाकृति उत्पन्न होतात व जातात, देह उत्पन्न झाला म्हणून तो देह धारण करीत नाही व नाश पावला असता तो देह टाकीत नाही तो आपल्या स्वरूपाने जसा आहे तसाच असतो १६ ज्याप्रमाणे आकाशात दिवस व रात्र येतात व जातात, त्याप्रमाणे आत्म्याला आश्रयावर देह येतात व जातात १७ म्हणून या शरीरात तो काही करीत नाही न करवीतही नाही व शरीराच्या कोणत्याही व्यापारात कर्तेपणाने तयार होत नाही १८ वास्तव त्याचे स्वरूपात कमी अधिक जास्त काही होत नाही, इतकेच नव्हे, तर तो देहात असूनही देहाच्या सर्व व्यापारापासून अलिप्त असतो. १९

जसें सर्वव्यापक आकाश सूक्ष्मपणामुळें कशानेही लिप्त होत नाही, तसा सर्व देहाचे ठिकाणी अधिष्ठित असलेला आत्मा देहादिकाच्या कर्मांनी लिप्त होत नाही ॥ ३२ ॥

अर्जुना, आकाश कोठे नाही ? व त्याचा कोठे रिगाव होत नाही ? म्हणजे हे सर्वत्र आहे, परंतु याला कशापासूनही पाडा होत नाही ११२० त्याप्रमाणे सर्वत्र सर्व देहात आत्मा जरी आहे, तरी देहाच्या कोणत्याही उपाधींपासून तो लिप्त होत नाही. २१ तर वारंवार शुद्धत्वाचें हेच लक्षण तू ध्यानात ठेव की, क्षेत्र म्हणजे शरीर किंवा त्याचे धर्म यांहून क्षेत्रज्ञ म्हणजे आत्मा अगदी निराळा आहे २२

हे भारता, जसा एकटा सूर्य या सर्व जगताला प्रकाशित करितो, तसाच क्षेत्रज्ञ हा सर्व क्षेत्रांना प्रकाशित करितो. ॥ ३३ ॥

ससर्गें चेष्टिजे लोहें । परि लोह भ्रामक नोहे । क्षेत्रक्षेत्रज्ञा आहे । तेतुला पाडु ॥२३॥ दीपकाची अर्ची । गहाटी वाहे घरींची । परि वेगळीक कोटीची । दीपा आणि घरा ॥२४॥ पै काष्ठाच्या पोटीं । वन्हि असे किरीटी । परि काष्ठ नोहे या दृष्टी । पाहिजे हा ॥ २५ ॥ अपाडु नभा आभाळा । रवि आणि मृगजळा । तैसाचि हाही डोळां । देखसी जरी ॥२६॥ हें आघवेंचि असो एकु । गगनौनि जैसा अर्कु । प्रगटवी लोकु । नावे नावे ॥२७॥ एथ क्षेत्रज्ञु तो ऐसा । प्रकाशकु क्षेत्राभासा । यावरुते हे न पुसा । शका नेघा २८

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमतरं ज्ञानचक्षुषा ।**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥३४॥**

ये एवं ज्ञानचक्षुषा क्षेत्रक्षेत्रज्ञयोः ( ज्ञान ) भूतप्रकृतिमोक्ष च विदुः, त पर यान्ति ॥ ३४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसवादे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगो नाम त्रयोदशोऽध्याय ॥१३॥

शब्दतत्त्वसारज्ञा । पै देखणी तेचि प्रज्ञा । जे क्षेत्रक्षेत्रज्ञा । अपाडु देखे ॥२९॥ इया दोहींचें अंतर । देखावया चतुर । ज्ञानियाचे द्वार । आराधिती ॥११३०॥ याचिलागी सुमती । जोडिती शातिसपत्ती । शास्त्रांची दुभती । पोसिती घरी ॥३१॥ योगाचिया आकाशा । वळघिजे येवढाचि धिंवसा । याचियाचि आशा । पुरुषासि गा ॥३२॥ शरीरादि समस्त । मानिताति तृणवत । जीवें संताचे होत । वाहणधरु ॥३३॥ ऐसैसिया परी । ज्ञानाचिया भरोवरी । करूनिया अंतरीं । निरुते होती ॥३४॥ मग क्षेत्रक्षेत्रज्ञांचें । जें अंतर देखती साचें । ज्ञाने उन्मेख तयांचें । वोवाळूं आम्ही ॥३५॥ आणि महाभूतादिकीं । प्रभेदलीं अनेकीं । पसरलीसे लटिकी । प्रकृति जे हे ॥३६॥ जे शुकनळिकान्यायें । न लगनि लागली आहे । हे जैंस तैसें होये । ठाउवें जया ॥३७॥ जैसी माळा ते माळा । ऐसीचि देखिजे डोळा । सर्पबुद्धि टवाळा । उखी होउनी ३८ का शुक्ति ते शुक्ती । हे साच होय प्रतीती । रुपयाची भ्राती । जाऊनिया ॥३९॥ तैसी वेगळी वेगळेपणें । प्रकृति जे अतःकरणें । देखती ते मी म्हणें । ब्रह्म होती ॥११४०॥ जे आकाशाहूनि वाड । जे अव्यक्ताची पैल कड । जे भेटलिया अपाडा पाड । पडों नेदी ॥ ४१ ॥ आकारु जेथ सरे । जीवत्व जेथें विरे । द्वैत जेथ नुरे । अद्वय जें ४२ ते परमतत्त्व पार्था । होती ते सर्वथा । जे आत्मानात्मव्यवस्था । राजहसु ॥४३॥ ऐसा हा जी आघवा । श्रीकृष्णें तया पाडवा । उगाणा दिधला जीवा । जीवाचिया ॥४४॥ येर कलशींचे येरीं । रिचविजे जयापरी । आपणपे तया श्रीहरी । दिधलें तैसें ॥४५॥ आणि कोणा देता कोण । तो नर तैसा नारायण । वरि अर्जुनातें श्रीकृष्ण । हा मी म्हणे ॥ ४६ ॥ परि असो तें नाथिलें । न पुसता कां मी बोलें । किंबहुना दिधलें । सर्वस्व देवें ॥ ४७ ॥ की तो पार्थु जी मनीं । अझुनी तृप्ती न मनी । अधिकाधिक उतान्ही । वाढवीतु असे ॥ ४८ ॥ स्नेहाचिया भरोवरी । आबुथिला दीपु घे थोरी । चाड अर्जुना अंतरीं । परिसतां तैसी ॥४९॥ तेथ सुगरिणी आणि उदारें । रसज्ञ आणि जेवणारे । मिळती मग अवतरे । हातु जैसा ॥११५०॥ तैसं जी होतसे देवा । तया अवधानाचिया लवलवा । पाहातां व्याख्यान चढलें थांवा । चौगुणें वरी ॥५१॥ सुवायें मेघु सांवरे । जैसा चंद्रें सिंधु भरे । तैसा मानला रसु आदरें । श्रोतयांचेनि ५२ आतां आनंदमय आघवें । विश्व

आत्म्याच्या सत्तेने शरीरादिकांच्या ठिकाणी चेष्टा दिसल्या तरी देह आत्मा नव्हे. लोहचुंबकाच्या सन्निधानानें लोखंड हालतें, परंतु लोखंड हें लोहचुंबक नव्हे; तीच व्यवस्था आत्मा व देह यांस लागू आहे २६ दीपज्योतीच्या उजेडानें घरांतील सर्व व्यवहार करितां येतात, परंतु दिवा आणि घर यांत कोटिशः अंतर आहे, २७ हें किंवा, लाकडाच्या पोटांत अग्नि आहे, परंतु तो लाकूड नव्हे, असा दृष्टीनें पहावा. २८ आकाश व अभ्र किंवा सूर्य व मृगजल यांच्यांत ज्या मानानें अंतर आहे, त्याच मानानें देह व आत्मा यांजमधील अंतर मागें दिलेले दृष्टांत एके बाजूला ठेवून पहाशील, तर २६ गगनांत सूर्य एकटा असून ज्याप्रमाणें निरनिराळ्या सर्व लोकांना प्रकाशित करितो, २७ त्याप्रमाणें आत्मा हा सर्व देहांत प्रकाश पाडणारा आहे, असें कळून येईल. यापुढें आत्मा व देह याविषयीं पुनः शंका घेऊन विचारूं नको. २८

**जे याप्रमाणें क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांच्यामधील अंतर, आणि सर्व भूतांची प्रकृतीपासून सुटका कशी होते, हें जाणतात, ते ब्रह्माला पावतात. ॥ ३४ ॥**

हे शब्दतत्त्वसारज्ञा, तीच बुद्धि जाणती म्हणावी कीं, जिच्या योगानें शरीर व आत्मा या दोहांमधील अंतर समजतें २९ या दोहोंमधील अंतर समजण्याकरितां चतुर ( मुमुक्षु ) लोक हे ज्ञानीजनांच्या घराच्या उंबऱ्याची साल काटतात, ११३० आणि अर्जुना, हेंच समजण्याकरितां शांतिरूप संपत्ति स्वाधीन करून घेऊन शास्त्ररूपी दुभत्या गाई घरीं पाळतात ( नेहमीं शास्त्राध्ययन करितात ) ३१ हेंच समजण्याकरितां पुरुष योगरूप आकाश चढून जाण्याची मनांत हाव धरितात, ३२ शरीर आदिकरून सर्व तृणप्राय मानतात, आणि संतांच्या पादुका आपल्या डोक्यावर घेतात ३३ याप्रमाणें ज्ञानाचीं साधनें करून अंतर्यामीं खात्री करून घेतात ३४ नंतर शरीर व आत्मा यामधील खरें अंतर त्यांच्या दृष्टीस पडतें, तेव्हां भगवान म्हणतात –आम्ही आपलें ज्ञान त्यांच्या ज्ञानावरून ओंवाळून टाकतों, ३५ आणि या पृथ्वीवर प्राण्यांच्या भिन्न भिन्न रूपानें जी ही लटकी माया पसरलेली आहे, ३६ जी शुकनलिकान्यायानें जीवाच्या मागें न लागतां लागली आहे असें दिसतें, अशी ही वस्तुस्थिति ज्याला पूर्णपणें साक्षात आहे, ३७ ज्याप्रमाणें माळेवरील दृष्टी सर्पबुद्धि नष्ट झाली म्हणजे माळ ती माळच दिसावी, ३८ अथवा शिंपीच्या चकाकण्यामुळें तिजवरील रुप्याचा भास जाऊन ती केवळ शिंपीच आहे असा प्रत्यय यावा, ३९ त्याप्रमाणें, आत्म्यापासून प्रकृति वेगळी आहे, असें जे आपल्या अंतःकरणांत पहातात, ते ब्रह्मरूप होतात असें मी म्हणतों. ११४० जें ब्रह्म आकाशाहूनही व्यापक आहे, जें प्रकृतीच्या पलीकडे आहे, व जें प्राप्त झालें असतां आपल्यापासून दूर करितां येत नाहीं, ४१ ज्या ब्रह्माचे ठिकाणीं प्रकृतीच्या अनुरोधानें आलेला आकार नाहींसा होतो, जीवपणा निरून जातो, आणि द्वैतभाव नाहींसा होतो, असें जें अद्वय आहे ४२ पार्था, असें हें परमतत्त्व तेच पुरुष स्वतः होतात, कीं जे दूध व पाणी निराळें करणाऱ्या राजहंसाप्रमाणें आत्मा व प्रकृति यांचा फाडा करितात ! ४३ महाराज म्हणतात – याप्रमाणें श्रीकृष्णांनीं अर्जुनाला प्रकृति व आत्मा यांजविषयीं अनुभव आणून दिला ४४ ज्याप्रमाणें एका भांड्यांतील पाणी दुसऱ्या भांड्यांत ओतावें, त्याप्रमाणें श्रीहरींनीं आपल्या हृदयांतील हें ज्ञान अर्जुनाच्या हृदयांत ओतलें. ४५ आणि यांत विशेष तें काय झालें ? कारण, जो तर तोच नारायण असल्यामुळें, ज्ञान कोणी कोणास दिलें ? तर श्रीकृष्ण अर्जुनाकडे बोट दाखवून 'हा तो मीच आहें' असें म्हणाले ४६ परंतु ही गोष्ट मला कोणी विचारल्याशिवाय सांगण्याचें कारण नाहीं असो फार काय सांगावें ! देवांनीं अर्जुनास आपलें सर्वस्व दिलें ४७ परंतु भगवंतांनीं इतकें जरी सांगितलें, तरी अर्जुन आपल्या मनांत तृप्त न होतां त्यांनीं अधिक सांगावें अशी हाव करूं लागला. ४८ दिव्यांत जों जों तेल घालावें, तों तों अधिकाधिक प्रकाश पडतो, त्याप्रमाणें, श्रीकृष्ण जों जों जास्ती सांगूं लागले, तों तों अर्जुनाचे मनांत ऐकण्याविषयीं इच्छा वाढत चालली ! ४९ ज्याप्रमाणें एखादी सुगरण नायकी असून वाढण्यांत सढळ हाताची असली व जेवणारे चतुर असून भोक्ते असले म्हणजे दोघांनाही वाढण्याची व जेवणाची परस्पर हौस उत्पन्न होते, ११५० त्याप्रमाणें अर्जुनाची ऐकण्याची चळवळ पाहून देवाची स्थिति झाली, व त्यांचें व्याख्यान चोपट वाटलें ५१ ज्याप्रमाणें अनुकूल वाऱ्यानें मेघ सादरून वृष्टि होते, किंवा चंद्रोदय झाला म्हणजे समुद्रास भरती येते, त्याप्रमाणें ऐकणाराच्या आदरबुद्धीनें वक्त्यास बोलण्याचें स्फुरण येतें. ५२ संजय म्हणतो.–हे

कीजेल देवें । तें रायें परिसावें । संजयो म्हणे ५३ एव जे महाभारती । श्रीव्यासें अप्रातमती । भी-ष्मपर्वंमगती । म्हणितली कथा ॥५४॥ तो श्री-कृष्णार्जुनसंवादु । नागरी बोली विशदु । सांगोनि दाऊं प्रबंधु । वोवियेचा ५५ नुसधीचि शांतिकथा । आणिजेल कीर वाक्पथा । जे शृंगाराच्या माथा । पाय ठेवी ५६ दाऊं वेल्हाळे देशी नवी । जे साहित्यातें वो-जावी । अमृतातें चुकी ठेवी । गोडसपणें ५७ बोल ओल्हावतेनि गुणें । चंद्रासि घे उमाणें । रसरंगी भुलवणें । नादु लोपी ॥५८॥ खेचराचियाही मना । आणी सात्त्विकाचा पान्हा । श्रवणासवें सुमना । समाधि जोडे ॥५९॥ तैसा वाग्विलास विस्तारू । गीतार्थेसी विश्व भरू । आनंदाचे आवारू । मांडू जगा ॥११६०॥ फिटो विवेकाची वाणी । हो काना मनाची जिणी । देखो आवडे तो खाणी । ब्रह्मवि-द्येची ॥६१॥ दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखा-चा सोहळा । रिघो महाबोध सुकाळा- । माजि विश्व ॥ ६२ ॥ हें निफजेल आतां आघवें । ऐसें बोलिजेल बरवें । जे अधिष्ठिला असें परमदेवें । श्रीनिवृत्ति मी ॥६३॥ म्हणोनि अक्षरीं सुभेदीं । उपमा श्लोक कोंदाकोंदी । झाडा देईन प्रतिपदीं । ग्रंथार्थासी ॥ ६४ ॥ हा ठावोवरी मातें । पुरतया सारस्वतें । केलें असे श्रीमतें । श्रीगुरुरायें ॥६५॥ तेणें जी कृपासावायें । मी बोलें तेतुलें सामाये । आणि तुमचिये सभे लाहें । गीता म्हणों ॥६६॥ वरि तुम्हा संतांचे पायें । आजि मी लाधलों आहें । म्हणोनि जी नोहे । अटकु कांही ॥६७॥ प्रभु काश्मिरी मुकें । नुपजे हें काय कौतुकें । नाही उणी सामुद्रिकें । लक्ष्मीयेसी ॥ ६८ ॥ तैसी तुम्हां संतांपासीं । अज्ञानाची गोठी कायसी । यालागीं नवरसीं । वरुषेन मी ॥६९॥ किंबहुना आतां देवा । अवसरु मज देवावा । ज्ञानदेव म्हणे बरवा । सांगेन ग्रंथु ॥ ११७० ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥ श्लोक ३४, ओव्या ११७०.



धृतराष्ट्र राजा, याप्रमाणे अर्जुनाची ऐकण्याची इच्छा पाहून, देव हे ज्या आपल्या वक्तृत्वाने सर्व विश्व आनंदभरित करितात, तें वक्तृत्व एक ५३ याप्रमाणे महाभारतात भीष्मपर्वाच्या संगतीत श्रीव्यास मुनींनी आपल्या अमर्याद बुद्धीने जी कथा सांगितली आहे, ५४ तो कृष्णार्जुनाचा संवाद उत्तम मराठी भाषेत ओवी छंदाने सांगतों ५५ मी आता तुम्हाला शांतिरसकथा सांगेन, पण ती शृंगारादि रसांच्या वरचढ होईल ५६ हा देशभाषा साहित्याला शिकविणारी असून, आपल्या गोडीने अमृतही फिके पाडील ५७ ज्या चंद्राचे उदयापासून चंद्रकांत मण्याला पाझर फुटतात, त्या चंद्रालाही माझे बोलापासून पाझर फुटेल तसेच, माझे वाक्याचे रसाने नादब्रह्म देखील लोपून जाईल, ५८ अज्ञान्याच्या मनास देखील सात्त्विकतेचा पान्हा फुटेल, आणि जो अधिकारी आहे, त्याला तर ऐकण्याबरोबर समाधि लागेल ५९ गीतेचा अर्थ असा सांगेन की, तो सर्व जगभर पसरून सर्व लोकांस आनंददायक होईल ११६० त्यामुळे विचाराचे दैन्य फिटून मन आणि श्रवण ही जगतील, फार काय सांगावें, आज वाटेल त्याने ब्रह्मविद्येची खाणच पहावी ६१ ब्रह्म डोळ्यांनी पाहून सुखाचा सोहळा दृष्टीस पडावा, व सर्व जगात आत्मज्ञानाचा सुकाळ व्हावा. ६२ सद्गुरु श्रीनिवृत्तिमहाराजाचा अनुग्रह असल्यामुळे, मी आता असे भाषण करीन की, या सर्व गोष्टी आपल्या अनुभवास येतील ६३ म्हणून प्रत्यक्ष रसाचे ठिकाणी रचित आणि उपमा याची सांगड घालीन, आणि अप्रत्यक्ष पदार्थाचे अर्थाचा आडा देऊन एक पदही सोडणार नाही —ज्ञानेश्वरमहाराज आपल्या गर्वोक्तीचा परिहार करितात— ६४ येथपर्यंत मला श्रीमत्या श्रीमंत अशा गुरूंनी सर्व शास्त्रांत निपुण केले आहे, ६५ आणि मी जे भाषण करतों तें आपण मान्य करिता, व आपणासारख्या संतमंडळाच्या समक्ष गीतेचा अर्थ सांगण्याची मला योग्यता आली आहे, हे तरी त्यांच्याच कृपेचे ऐश्वर्य आहे! ६६ त्यात तुमच्यासारख्या संतांचे पाय आज माझ्या दृष्टीस पडले आहेत, म्हणून मला कमतीही अडचण पडत नाही ६७ प्रभो, सरस्वती, जी सर्वांस बोलण्याची शक्ति देणारी आहे, तिला मुके मूल होणार नाही यात काही कौतुक का आहे? लक्ष्मीच्या हातावर सामुद्रिक चिन्हांची उणीव असू शकणार नाही, ६८ त्याप्रमाणे, तुम्हा संतांच्या पुढे कोणीही आला असता तो अज्ञानी राहील अशी गोष्ट कशी होईल? तेव्हा मी आता बोलण्यात नवरसाचा रेलचेल करून देईन ६९ तर, हे प्रभो, आता मला थोडा वेळ द्या, म्हणजे मी उत्तम रीतीच्या कथा सांगेन, असे ज्ञानदेव म्हणाले ११७०



# ज्ञानेश्वरी.

## अध्याय चौदावा.

जयजय आचार्या । समस्तसुरवर्या । प्रज्ञाप्रभातसूर्या । सुखोदया ॥१॥ जयजय सर्वविसांवया । सोऽहंभावसुहावया । नाना लोक हेलावया । समुद्रा तूं ॥२॥ आइकें गा आर्तबंधू । निरंतरकारुण्यसिंधू । विशदविद्यावधू- । वल्लभा जी ॥३॥ तूं जयाप्रति लपसी । तया विश्व हें दाविसी । प्रकट तें करिसी । आघवेंचि तूं ॥४॥ कीं पुढिलाची दृष्टि चोरिजे । हा दृष्टिबंधु निफजे । परी नवल लाघव तुझें । जें आपणपें चोरे ॥५॥ जी तूंचि तूं सर्वां यया । मा कोणा बोधु कोणा माया । ऐसिया आपें आप लाघविया । नमो तुज ॥६॥ जाणों जगीं आप बोलें । तें तुझिया बोला सुरस जालें । तुझेनि क्षमत्व आलें । पृथ्वीयेसी ॥७॥ रविचंद्रादि शुक्ति । उदय करिती त्रिजगतीं । ते तुझिया दिसी- । तेज तेजा ॥८॥ जें चळवळिजे अनिळें । तें देविकेनि जी निजबळें । नभ तुजमाजी खेळे । लपिथपि ॥ ९ ॥ किंबहुना माया असोस । ज्ञान जी तुझेनि डोळस । असो वानणें सायास । श्रुतीसि हें ॥१०॥ वेद वानूनि तवंचि चांग । जंव न दिसे तुझें आंग । मग आम्हां तया मुग । एके पातीं ॥११॥ जी एकार्णवाचे ठाईं । पाहतां थेंबाचा पाड नाहीं । मा महानदी काई । जाणिजती ॥१२॥ का उदयलिया भास्वतु । चंद्र जैसा खद्योतु । आम्हा श्रुती तुज आंतु । तो पाडु असे ॥ १३ ॥ आणि दुजया थावो मोडे । जेथ परेशीं वैखरी बुडे । तो तूं मा कोणें तोंडें । नानावासी ॥१४॥ यालागीं आतां । स्तुति सांडूनि निवांता । चरणीं ठेविजे माथा । हेंचि भलें १५ तरी तूं जैसा आहासि तैसिया । नमो जी श्रीगुरुराया । मज ग्रंथोद्यमु फळावया । वेव्हारा होईं ॥१६॥ आतां कृपाभांडवल सोडीं । भरीं मति माझी पोतडी । करीं ज्ञानपद्यजोडी । थोरा मातें ॥१७॥ मग मी ससरेन तेणें । करीन संतासी कर्णभूषणें । लेववीन सुलक्षणें । विवेकाची ॥१८॥ जी गीतार्थनिधान । काढूं माझें मन । सुयीं स्नेहांजन । आपलें तूं ॥ १९ ॥ हे वाक्सृष्टी एके वेळे । देखतु माझे बुद्धीचे डोळे । तैसा उदैजो जी निर्मळें । कारुण्यबिंबें ॥२०॥ माझी प्रज्ञावेली वेल्हाळ । काव्यें होय सफळ । तो वसंतु होयीं स्नेहाळ । शिरोमणी ॥२१॥ प्रमेय महापूरें । हे मतिगंगा ये थोरें । तैसा वरिष उदारें । दिठीवेनी ॥२२॥ अगा विश्वैकधामा । तुझा प्रसादचंद्रमा । करूं मज पूर्णिमा । स्फूर्तीची जी २३ जी अवलोकिलिया मातें । उन्मेषसागरीं भरितें ।

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय चौदावा.

हे गुरो, तुम्ही सकळ देवांत श्रेष्ठ असून आनंदबुद्धीरूप प्रभेचा उदय करणारे सूर्य आहां, तुमचा जयजयकार असो १ तुम्ही सर्वांचे विश्रांतिस्थान असून सर्वांच्या हृदयांत अहंब्रह्म हें तत्त्व घालणारे आहां, किंवा तुम्ही समुद्ररूपी असून तुमच्यांत चौदा लोक लाटांप्रमाणें हेलकावे खातात तुमचा जयजयकार असो २ तुम्ही दीन दयाळ असून निरंतर करुणेचे सागर आहां, आणि ब्रह्मविद्यावधूचे वर आहां ३ जे कोणी तुम्हाला जाणत नाहींत, त्यांना हें सर्व विश्व खरें भासतें, व जे कोणी तुम्हाला जाणतात, त्यांना सर्व विश्वांत तुमच्याशिवाय कांहीं दिसत नाहीं. ४ नजरबंदी खेळांत गारोडी दुसऱ्याची दृष्टि चोरतो असा दिसतो, म्हणजे त्याला स्वतःला लपवितां येत नाहीं, परंतु आपण स्वतःच लपून रहाण्याचें आपलें चातुर्य विलक्षण आहे. ५ महाराज या सर्व जगांत तुम्ही कोणाला ज्ञानाचा बोध करतां, व तुम्हीच कोणाला मायेच्या सपाट्यांत गुंतवितां, असा तुमचा आपल्याच ठिकाणीं सहज खेळ सुरू आहे. अशा तुम्हाला नमस्कार असो ६ जगतांत ज्याला पाणी असें म्हणतात, त्याला जी गोडी आहे, ती तुमच्यामुळें आली आहे, व पृथ्वीला जी सहन करण्याची शक्ति आहे, तिला तुमचीच शक्ति कारण आहे ७ चंद्र व सूर्य हे केवळ मोठ्या शिंपल्याप्रमाणें निस्तेज आहेत, परंतु त्यांचा जो तिन्ही लोकांवर उजेड पडतो, तो तुमच्या तेजाच्या शक्तीचा प्रभाव आहे. ८ चहूंकडे फिरणारा वायु हाही तुमच्याच शक्तीमुळें फिरत असतो व आकाश जरी मोठें दिसतें तरी त्याचा समावेश तुमच्यांत होऊन तें लपंडावाप्रमाणें तुमच्या एका कोपऱ्यांत लपतें ९ फार काय सांगावें! सर्व माया ही तुमच्याच ठिकाणीं असून, ज्ञानही तुमच्याच शक्तीनें चहूंकडे पहातें, इतकेंच नव्हे, तर तुमच्या स्वरूपाचा पार न लागल्यामुळें तें श्रुतीला वर्णन करण्याचे श्रम झाले १० वेद वर्णन करण्यांत चतुर खरा, परंतु जोंपर्यंत तुमचें दर्शन झालें नाहीं, तोंपर्यंतच वेद तुमचें वर्णन करूं शकतात, परंतु तेंच आपलें दर्शन झाल्यावर आमची व त्याची एकच दशा होते, व दोघांसही स्वस्थ बसावें लागतें. ११ सर्व जलमय झाल्यावर त्यांत एका जवाचा खिसगणती नसतेच, परंतु मोठी नदी तरी ओळखतां येते काय? १२ किंवा सूर्य उगवल्यावर चंद्र जसा काजव्याप्रमाणें होतो म्हणजे सूर्यापुढें चंद्र आणि काजवा यांची किंमत एक, त्याप्रमाणें तुमच्या स्वरूपापुढें माझी आणि श्रुतीची किंमत एक. १३ आणि ज्या ठिकाणीं द्वैताचा ठाव मोडून परेसह वैखरी-वाणी शांत रहाते, त्या तुमचें कोणत्या तोंडानें वर्णन करावें, म्हणजे कोणालाही वर्णन करतां येणार नाहीं १४ म्हणून आतां तुमची स्तुति करण्याचें सोडून मुकाट्यानें तुमच्या चरणावर मस्तक ठेवावें हाच उत्तम मार्ग होय १५ तर, हे गुरुराया, तुम्ही जसे आहां तसाच तुम्हाला मी नमस्कार करतों तुम्ही माझ्या गीतार्थकथनरूपी व्यापारांत मला नफा करून देण्याकरितां माझे भागीदार व्हा १६ तर आतां आपल्या कृपारूप साडवलाच्या थैलीची गांठ सोडून माझी मतिरूप पोतडी भरा, आणि आपण थोर आहां, तेव्हां मला ज्ञानपदार्थाची (ज्ञानरूप नफ्याची) जोड करून द्या १७ मग मी या व्यापारावर सावरून संतांच्या कानांत सुंदर अशीं विचाररूप कर्णभूषणें तयार करून घालीन १८ महाराज, गीतार्थरूपी ठेवा बाहेर काढण्याविषयीं माझ्या मनांत जी इच्छा उत्पन्न झाली आहे, ती सफल करण्याकरितां तुम्ही आपलें स्नेहरूप अंजन माझ्या डोळ्यांत घाला १९ माझ्या बुद्धिरूप डोळ्यांना एक वेळ शब्दमय सृष्टि पहातां येईल, अशा तऱ्हेचा आपल्या करुणारूप सूर्यबिंबाचा निर्मळ प्रकाश पाडा. २० माझी बुद्धिरूप वेली पुष्कळ वाढून तिला काव्यरूपी फळें येण्याकरितां वेलींना प्रफुल्लित करण्याची कृपा करण्यामध्यें श्रेष्ठ असा जो वसंत, तो तुम्ही व्हा. २१ आपल्या कृपादृष्टीचा इतका औदार्यानें वर्षाव करा कीं, त्यानें माझ्या बुद्धिरूप गंगेस अर्थरूपी (सिद्धांतरूपी) महापूर यावा. २२ हे विश्वैकधामा, आपला प्रसादचंद्रमा मला स्फूर्तीची पौर्णिमा करो (पूर्णचंद्रोदयानें पौर्णिमा शोभते, त्याप्रमाणें आपल्या कृपेनें मला पूर्ण स्फूर्ति येवो) २३ ती पौर्णिमा मी अवलोकन केली, (आपला कृपाप्रसाद झाला,) म्हणजे माझ्या

वोसंडेल स्फूर्तीनें । रसवृत्तीचे ॥२४॥ तव संतोगोनि श्रीगुरुराजें । म्हणितलें विनतिव्याजें । माडिलें देखोनि दुजें । स्तवनमिषें ॥२५॥ हें असो आता वाजटा । तो ज्ञानार्थ करूनि गोमटा । ग्रंथु दावीं उत्कंठा । भंगा नेदीं ॥२६॥ हो का जी स्वामी । हेंचि पाहत होतां मी । जे श्रीमुखें म्हणा तुम्ही । ग्रंथ मांग ॥२७॥ सहजें दूर्वेचा डिरु । आगोचि तव अमरु । वरी आला पूरु । पीयूषाचा ॥२८॥ तरि आता येणें प्रसादें । विन्यास विदग्ध । मूळशास्त्रपदें । वाखाणीन ॥२९॥ परि जीवा आतुलीकडे । जैसी सदेहाची डोणी बुडे । ना श्रवणी तरि चाडे । वाढी दिसे ॥३०॥ तैसी बोली साचारी । अवतरो माझी माधुरी । माले मागूनि घरी । गुरुकृपेच्या ॥३१॥ तरी मागा त्रयोदशीं । अध्यायीं गोठी ऐसी । श्रीकृष्ण अर्जुनेंसीं । चावळले ॥३२॥ जे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगें । होइजे येणें जगें । आत्मा गुणसगें । समारिया ॥३३॥ आणि ह्याचि प्रकृतिगतु । सुखदुःखभोगी हेतु । अथवा गुणातीतु । केवळु हा ॥३४॥ तरि कैसा पां असंगा संगु । कोण तो क्षेत्रक्षेत्रज्ञायोगु । सुखदुःखादि भोगु । केवि तया ॥ ३५ ॥ गुण ते कैसे किती । बांधती कवणे रीती । नातरी गुणातीती । चिन्हें काई ॥३६॥ एवं इया आघवेया । अर्थारूप करावया । विषो येथ चौदाविया । अध्यायासी ३७ तरि तो आतां ऐसा । प्रस्तुत परियेसा । अभिमावो विश्वेशा । वैकुंठाचा ॥३८॥ तो म्हणे गा अर्जुना । अवधानाची सर्व सेना । मेळऊनि इया ज्ञाना । झोंबावें हो ॥३९॥ आम्ही मागां तुज बहुती । दाविलें हें उपपत्ती । तरि आझुनी अप्रतीती । कुशी न निघे ॥ ४० ॥

श्रीभगवानुवाच—

**परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।**
**यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः १**

यत् ज्ञात्वा सर्व मुनयः इतः परां सिद्धिं गताः, ( तत् ) ज्ञानानां उत्तमं परं ज्ञानं भूयः ( अहं ते ) प्रवक्ष्यामि. १

म्हणौनि गा पुढती । सांगिजेल तुजप्रती । पर म्हण म्हणोन श्रुती । डाहारिलें जे ॥४१॥ एऱ्हवी ज्ञान हें आपुलें । परी पर ऐसेंनि जालें । जे आवडोनि घेतलें । भवस्वर्गादिक ॥४२॥ अगायावि कारणें । हें उत्तम सर्वोपरी मी म्हणें । जे वन्हि हें तृणें । येरें ज्ञानें ॥४३॥ जियें भवस्वर्गातें जाणती । यागचि चांग म्हणती । पारखी फुडी आथी । भेदी जयां ॥४४॥ तियें आघवीचि ज्ञानें । केली येणें स्वप्नें । जैशा वातोर्मी गगनें । गिळिजती अती ॥ ४५ ॥ कां उदितें रश्मिराजें । लोपिली चंद्रादि तेजें । नाना प्रळयांबुमाजें । नदी नद ॥४६॥ तैसें येणें पाहलेया । ज्ञानजात जाय लया । म्हणोनिया धनंजया । उत्तम हें ॥ ४७ ॥ अनादि जे मुक्तता । आपली असे पंडुसुता । तो मोक्षु हाता येता । होय जेणें ॥४८॥ जयाचिया प्रतीती । विचारवीरी समस्ती । नेदिजेचि संसृती । माथा उधऊं ॥ ४९ ॥ मनें मन घालूनि मागें । विश्रांति जालिया आगें । ते देही देहाजोगे । होतीचि ना ॥५०॥ मग तें देहाचें बेळें । बोलांडूनि एकेचि वेळे । संवतुकी कांटाळें । माझे जाले ५१

**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।**
**सर्गेऽपि नोपजायंते प्रलये न व्यथंति च ॥२॥**

( ये ) इदं ज्ञानं उपाश्रित्य मम साधर्म्यं आगताः, (ते) सर्गे अपि न उपजायन्ते, प्रलये च न व्यथन्ति. ॥२॥

जे माझिया नित्यता । तेणें नित्य ते पंडुसुता । परिपूर्ण पूर्णता । माझियाचि ५२ मी जैसा अनंतानंदु । जैसाचि सत्यसिद्धु । तैसेचि ते भेदु । उरेचि ना ॥५३॥ जें मी जेव्हढें जैसें । तेंचि ते जाले तैसें । घटभंगी घटाकाशें । आकाश जेवी ॥५४॥ नातरि दीपमूळकीं । दीपशिखा अनेकी । मीनलिया अवलोकी । होय जैसें ॥५५॥ अर्जुना

ज्ञानसमुद्राला भरतें येईल, आणि नवरस हे स्फूर्ति भरून साठूं लागतील ! २४ असें ज्ञानदेवाचें भाषण ऐकून श्री-गुरु निवृत्तिनाथ महाराज संतोष पावून म्हणाले कां तूं स्तुतीच्या मिषानें द्वैत व्यर्थ वाढवितोस २५ तर आता ही व्यर्थ स्तुति राहूं दे, जो जाणण्याचा विषय आहे, तो चांगला तयार करून ग्रंथ सांग उत्कंठेचा भंग होऊं देऊं नको २६ तेव्हा महाराज म्हणाले– प्रभो, तुम्ही आपल्या मुखानें ग्रंथ सांग, हेंच म्हणण्याची मी वाट पहात होतो २७ अगोदरच हरळीची मुळी अमर, त्यांत तिच्यावर अमृताचा वर्षाव झाला, मग काय विचारता ! २८ आता गुरुप्रसाद झाल्यामुळे, गीतेंतील मूळ शास्त्राच्या प्रत्येक पदाचें सविस्तर व स्पष्ट वर्णन करीन, २९ की जें ऐकल्यामुळे मनांतील सर्व संशय नाहींसा होऊन श्रवणाची इच्छा दुणावेल ३० माझ्या मधुर वाणींतून असे उत्तम शब्द निघावे एवढेंच गुरूंच्या पायापाशीं माझें मागणें आहे ३१ असो पूर्वी तेराव्या अध्यायांत श्रीकृष्णांनीं अर्जुनास अशी कथा सांगितली ३२ कीं, आत्मा व प्रकृति यांच्या संयोगानें हें जग निर्माण होतें व गुणांच्या अनुरोधानें आत्मा संसारांत निमग्न होतो ३३ मायापाशानें त्यालाच सुखदुःख भोगावें लागतें, व तोच गुणसंगरहित झाला म्हणजे मुक्त होतो, ३४ तर संगरहित असा जो आत्मा, त्याला प्रकृतीचा संग व्हावाच कसा ? आत्मा व प्रकृति यांचा संयोग होतो तो कोणता ? त्याला सुखदुःखादिभोग व्हावा कसा ? ३५ ते गुण कसे व किती आहेत ? त्या गुणांची बाधा कशा रीतीनें होते, आणि पुरुष गुणातीत झाला म्हणजे त्याचीं लक्षणें कोणतीं, ३६ अशा प्रकार या सर्व गोष्टींचे वर्णन करणें हाच विषय या चौदाव्या अध्यायांत आहे. ३७ तर आता त्या वैकुंठनिवासी विश्वेशाचा अभिप्राय काय आहे, तो ऐका. ३८ ते म्हणाले – अर्जुना, श्रवण करण्याची सर्व सामग्री जमवून तूं या ज्ञानाला झोंब घेरे का ! ३९ पूर्वी तुला आम्हीं हें ज्ञान अनेक प्रकारें स्पष्ट करून सांगितलें, परंतु तुझें अज्ञान अजून पूर्ण नाहींसें होत नाहीं. ४०

श्रीभगवान् म्हणाले:–ज्या ज्ञानाला जाणून सर्व मुनि या जन्मांतून मोक्षसिद्धि पावले, तें सर्व ज्ञानांत उत्तम व श्रेष्ठ असें ज्ञान मी तुला पुनः सांगतों. ॥ १ ॥

म्हणून बाबारे, ' पर ' या शब्दाचा महिमा श्रुतींनी जो वर्णन केला आहे, तो तुला आम्ही पुन सांगतो ४१ आपणांच आत्मज्ञानास ' पर ' म्हणण्याचें कारण, संसार व स्वर्ग हेंच आपल्या स्वरूपाप्रमाणे आवडलें म्हणून झालें आहे ४२ अरे, याच कारणास्तव आत्मज्ञान सर्वांपेक्षा उत्तम असें मी म्हणतो कारण, हें अग्निरूप असून इतर ज्ञानें ह्याच्यापुढे तृणरूप आहेत ४३ कारण, ज्या ज्ञानाची मजल संसार व स्वर्ग या पुरतीच असते, ज्याला यज्ञयागादिकच उत्तम वाटतात, व ज्याला द्वैतावांचून दुसऱ्या कशाचा आश्रय नसतो, ४४ तीं सर्व ज्ञानें आत्मज्ञानापुढें स्वप्नवत भासतात ज्याप्रमाणें गगनांत उत्पन्न झालेला वायु कितीही मोठा असला तरी त्याचा त्यांतच लय होतो, ४५ किंवा सूर्य उगवल्यावर जसें चंद्रादि नक्षत्रांचें तेज लोपतें अथवा प्रलयकाळचें पाणि वाढल्यावर ज्याप्रमाणें नदी, नद हा भेद रहात नाहीं, ४६ त्याप्रमाणें आत्मज्ञानाचा उदय झाल्यावर इतर सर्व ज्ञानें लय पावतात म्हणून, अर्जुना, याला आम्हीं ' उत्तम ' असें म्हणतो ४७ हे पांडुसुता, अनादिकालापासून आपल्याजवळ सहज असणारी जी आपली मुक्तता किंवा मोक्ष ह्या ज्ञानाच्या प्राप्तीपासून आपल्या हातास येतो ४८ ज्यांना अनुभव आला असता, सर्व ज्ञानें संसाराला वर डोकें काढूं देत नाहींत, ४९ आपल्या मनाची विषयाकडे जाणारी धाव मागें हटवून त्याला जागच्या जागीं बसविल्यावर, सहज विश्रांति प्राप्त होते असें झाल्यावर ते देहीं असूनही नसल्यासारखे होतात ५० नंतर ते देहद्वयाचें वेळेंकरून एकदम ओलांडून माझ्याच योग्यतेस पावतात. ५१

ह्या ज्ञानाचा आश्रय करून जे माझ्या सायुज्याला प्राप्त झाले, ते सृष्टीच्या उत्पत्तिकालींही जन्मत नाहींत आणि प्रलयकालींही नाश पावत नाहींत. ॥ २ ॥

कारण, अर्जुना, जे माझ्या नित्यतेनें नित्य आणि माझ्या परिपूर्णतेनें पूर्ण आहेत, ५२ आणि ज्याप्रमाणें मी जसा नेहमीं अनंत असून महानंदरूप असतो, व सत्यसिद्ध असतों, त्याप्रमाणेंच ते असतात, त्यांच्या व माझ्यांत भेद मुळीच रहात नाहीं ५३ ज्याप्रमाणें मी अनंत आहे, त्याप्रमाणें तेही होतात, ज्याप्रमाणें घटाचा नाश झाल्यावर घटाकाश महाकाशरूप होतें; ५४ किंवा मूळ दिव्यापासून लावलेल्या पुष्कळ वाती एकत्र केल्या म्हणजे त्या मूळ दिव्यांतच तेज मिळतें ५५ त्याप्रमाणें, अर्जुना,

तयापरी । सरली द्वैतार्चा वारी । नादे नामार्थे एकाहारी । मौनृविण ॥५६॥ येणेचि पैं कारणें । जें पहिलें मृष्टीचें जुपणें । तेंही तया होणें । पडेचिना ॥ ५७॥ मृष्टीचिये सर्वादी । जया देहाची नाही बाधी । ते कैंचे प्रळयावधी । निमतील पा ॥५८॥ म्हणौनि जन्मक्षया । अतीत ते धनंजया । मी जाले ज्ञाना इया । अनुसरोनि ॥ ५९ ॥ ऐसी ज्ञानाची वाडी । वानिली देवें आवडी । तेविचि पार्थाही गोडी । लावावया ॥६०॥ तव तया जालें आन । सर्वांगीं निघाले कान । सपाई अवधान । आतला पा ॥६१॥ आतां देवाचिया ऐरों । जाकळीजत असे वोरसें । जे निरूपण आकाशें । वेटाळेना ॥६२॥ मग म्हणे गा प्रज्ञाकांता । उजवली आजि वक्तृत्वना । जे बोलायेवढा श्रोता । जोडलासी ॥६३॥ तरि एकु मी अनेकीं । गोविजे देहपाशकीं । त्रिगुणी लुब्धकीं । कवणेपरी ॥६४॥ कैसा क्षेत्रयोगें । विये इयें जगें । ते परिस सांगे । कवणेपरी ॥६५॥ पैं क्षेत्र येणें व्याजें । यालागी हें बोलिजे । जे मत्संगबीजें । भूती पिके ॥६६॥

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ।**
**संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥३॥**

भारत, महद् ब्रह्म मम योनि (अस्ति), तस्मिन् अहं गर्भं दधामि, ततः सर्वभूतानां संभवः भवति. ॥३॥

एऱ्हवी तरी महद्ब्रह्म । यालागी हें ऐसें नाम । जे महदादिविश्राम । शालिका हें ॥६७॥ विकारां बहुवस थोरी । अर्जुना हेंचि करी । म्हणोनि अवधारीं । महद्ब्रह्म ॥६८॥ अव्यक्तवादमतीं । अव्यक्त ऐसी वदंती । सांख्याचिया प्रतीतीं । प्रकृति हेचि ॥६९॥ वेदांतीं इयेतें माया । ऐसें म्हणिजे प्राज्ञराया । असो किती बोलों वाया । अज्ञान हें ॥७०॥ आपला आपणपेयां । विसरु जो धनंजया । तेंचि रूप यया । अज्ञानासीं ॥७१॥ आणिकही एक असे । जें विचारावेळे न दिसे । वातीं पाहतां जैसें । आंधारें कां ॥७२॥ हालविलिया जाय । निश्चळी तरी होय । दुधीं जैसी साय । दुधाची ते ॥७३॥ पैं जागरु ना स्वप्न । ना स्वरूप अवस्थान । ते सुषुप्ति का घन । जैसी होय ॥७४॥ का न वियता वायूतें । वाझ आकाश रितें । तया ऐसें निरुतें । अज्ञान गा ॥७५॥ पैल खांब का पुरुखु । ऐसा निश्चयो नाही एकु । परि काय नेणो आलोकु । दिसत असे ॥७६॥ तेवि वस्तु जैसी असे । तैसी कीर न दिसे । परि काही अनारिसें । देखिजेना ॥७७॥ ना राती ना तेज । ते संधि जेवि सांज । तेवि निरुद्ध ना निज । अज्ञान आथी ॥७८॥ ऐसी कोण्ही एकी दशा । तिये वादु अज्ञान ऐसा । तया गुंडलिया प्रकाशा । क्षेत्रज्ञु नाम ॥७९॥ अज्ञान थोरिये आणिजे । आपणपें तरी नेणिजे । तें रूप जाणिजे । क्षेत्रज्ञाचें ॥८०॥ हाचि उभय योगु । बुझें बापा चागु । सत्तेचा नैसर्गु । स्वभावो हा ॥८१॥ आता अज्ञानासारिखे । वस्तु आपणपांचि देखे । परि रूपे अनेकें । नेणों कोणें ॥ ८२ ॥ जैसा रंकु भ्रमला । म्हणे जा रे मी रावो आला । कां मूर्च्छितु गेला । स्वर्गलोका ॥८३॥ तेवि लचकलिया दिठी । मग देखणे जें जें उठी । तया नाम सृष्टी । मीचि वियें पै गा ८४ जैसें कां स्वप्नमोहा । तो एकाकी देखे बहुवा । तोचि पाडु आत्मया । स्मरणेंवीण असे ॥८५॥ हेंचि अनिभ्रांती । प्रमेय उपलवूं पुढती । परि तू प्रतीती । याची घे पा ८६ तरी माझी हे गृहिणी । अनादि तरुणी । अनिर्वाच्यगुणी । अविद्या हे ॥८७॥ इये नाही हेंचि रूप । ठाणें हें अति उमप । हे निद्रितां समीप । चेता दुरी ॥८८॥ पैं माझेनिचि आंगें । पहुडल्या हे जागे । आणि सत्तासंभोगें । गुर्विणी होय ॥८९॥ महद्ब्रह्माउदरीं । प्राकृति आठै विकारीं । गर्भाची करी । पेलोवेलीं ॥९०॥ उभयसंगु पहिलें । बुद्धितत्त्व प्रसवलें । बुद्धितत्त्वें भारैलें । होय मन ॥ ९१ ॥ तरुणी ममता मनाची । ते अहंकार तत्त्व रची । तेणें

द्वैतभाव नाहींसा होऊन मी व ते हे भेद एकाच पक्काल्या वसून एकत्र नांदतात ५६ याच कारणामुळें, ज्या वेळी समूळ सृष्टीला आरंभ होतो, त्या वेळी त्यांना जन्म घ्यावा लागत नाहीं ५७ मग, ज्यांना सृष्टीच्या उत्पत्तीबरोबर देह घ्यावा लागत नाहीं, त्यांचा प्रलयकाळीं नाश कोठून होणार ? ५८ म्हणून, धनंजया, जे आत्मज्ञानाला अनुसरून मद्रूप झाले आहेत, ते जन्ममरणातीत आहेत ५९ याप्रमाणें आत्मज्ञानाची प्रौढी देवांनी आपल्या आवडीनें वर्णन केली, आणि अर्जुनालाही त्या ज्ञानाविषयीं आवड उत्पन्न व्हावी अशा हेतूनें ही प्रौढी वर्णन केली ६० तो अर्जुनाची अशी स्थिति झाली का, त्याच्या सर्वांगालाच कान फुटले, म्हणजे अर्जुन नखशिखान्त श्रवणरूप बनला ६१ आपलें सांगणें आकाशाएवढें असलें तरी आवरलें जाणार नाहीं, ते अर्जुन धारण करतो आहे, असें पाहून देवानाही प्रेमाचें भरतें आलें, त्याचा सांगण्याचा हात गगनात मावेना ६२ मग भगवान म्हणाले –अर्जुना, माझ्या वक्तृत्वरूपी कन्येस तू बुद्धिरूप वर मिळाल्यामुळे ती आज उजवली ! कारण माझ्या बोलण्याच्या हौसेप्रमाणें तूं उत्तम श्रोता मिळालास ! ६३ तर आता, मी एक असून, त्रिगुणरूपी पारधी हे देहरूपी पाश टाकून मला अनेक रूपें कशा धावयास लावतात, ६४ व मायेच्या उपाधीनें माझ्यापासून हे जग कसें उत्पन्न होतें, तें सांगतो, ऐक ६५ हें पहा—माझ्या सगरूपी बीजापासून प्राणिमात्र उत्पन्न होतात, याच कारणामुळे प्रकृतीला क्षेत्र असें म्हणावयाचें ६६

**हे भारता, महद्ब्रह्म [ प्रकृति ] हें माझें गर्भ ठेवण्याचें ठिकाण आहे, त्याजमध्यें मी गर्भ ठेवितों, आणि त्यापासून सर्व भूतांची उत्पत्ति होते ॥ ३ ॥**

ही माया महत्तत्त्वादिकांचें मूळ विश्रामस्थान म्हणजे लयस्थान आहे अर्थात सर्व जगापेक्षा मोठी आहे, म्हणून हिला ‘ महद्ब्रह्म ’ असें नाव दिलें आहे ६७ तसेच अर्जुना, हिच्या योगानें विकार व गुण हे वृद्धि पावतात, म्हणून हिला महद्ब्रह्म असें म्हटलें आहे. ६८ अव्यक्त मतवाद्याच्या मतें हिला अव्यक्त असें नाव आहे, व सांख्यमतवादी हिलाच “ प्रकृति ” असें म्हणतात. ६९ हे प्राज्ञशिरोमणे, वेदांती हिला ‘ माया ’ असें म्हणतात असो, उगीच फार काय बोलावं ! अज्ञान जें तें हेंच ७० हे धनंजया, आपल्या आत्मस्वरूपाचा आपल्यास जो विसर पडतो, तेंच या अज्ञानाचें रूप ७१ आणखी एक असें आहे की, ज्याप्रमाणें हातात दिवा घेऊन अंधार शोधूं लागलें असता तो दिसत नाहीं, त्याप्रमाणें आत्मस्वरूपाचा विचार केला कीं ते दिसेनासें होते ७२ दूध घोटीत बसलें म्हणजे जशी त्यावर साय येत नाहीं, व तेंच घोटलें नाहीं म्हणजे त्यावर साय येते ७३ किंवा मनुष्य ज्यावेळेस जागृत [illegible] स्वप्नदर्शन करतो, किंवा गर्भामध्ये [illegible] झोप लागते, ७४ किंवा वारा उत्पन्न [illegible] नसतो म्हणजे ज्याप्रमाणे आकाश मात्र एकटें असतें, त्याप्रमाणें इतर पदार्थांशिवाय जी स्थिति निराकार, तेंच अज्ञान होय ७५ ज्यावेळेस आपल्या समोर एखादा झाडाचा बुंधा असून तो खांब आहे, किंवा पुरुष आहे असें निश्चयानें म्हणता येत नाहीं, परंतु काहीं तरी दिसत आहे, असा भास होतो ७६ त्याप्रमाणें आत्म्याचें निर्मळ स्वरूप त्या वेळेस स्पष्टपणें दिसत नाहीं, व दुसरी काहीं वस्तु आहे असाही निश्चय होत नाहीं, ७७ रात्र नाहीं व दिवस नाहीं या दोहोंच्या मधील जशी सायंकाळ म्हणतात, त्याचप्रमाणें आत्मा व जगत् यांच्या ज्ञानाच्या अभावाच्या स्थितीला अज्ञान असें म्हणतात ७८ जशी ती एक दोहोंमधली अनिर्वचनीय स्थिति तिला ‘ अज्ञान ’ असें म्हणतात व त्या अज्ञानानें आवरण झालेलें जें चैतन्य, त्यालाच क्षेत्रज्ञ असें म्हणतात ७९ आपलें शुद्धस्वरूप न जाणता जें अज्ञान वाटतें, तें तेंच ज्ञानाचें ( जीवात्म्याचें ) रूप होय. ८० ही माया व चैतन्य यांचा योग नीट लक्षांत आण कारण, मूळ स्वरूपावर मायेचा स्वभाव असा आहे ८१ याप्रमाणें मायेच्या अनुरोधानें चैतन्य आत्मस्वरूप विसरून अनेक रूपें घेतें ८२ ज्याप्रमाणें दरिद्री मनुष्याला भ्रम झाला असता, तो स्वप्नांत जाऊं लागला म्हणजे इतर लोकांस ‘आमची राजाची स्वारी आली’ असें म्हणतो, किंवा मूर्च्छा आलेला मनुष्य ज्याप्रमाणे ‘ स्वर्ग पाहून आलो ’ असें म्हणतो, ८३ त्याप्रमाणें एकदा दृष्टि आत्मस्वरूपावरून चळली म्हणजे जी जी कल्पना उत्पन्न होते, तिला सृष्टि असें म्हणतात ती माझ्यापासूनच उत्पन्न होते ८४ मनुष्य एकटा असून स्वप्नाच्या भ्रांतीनें पुष्कळ वस्तु पहातो, ताच प्रकार चैतन्याला आत्मस्वरूपाचा विसर पडला म्हणजे होतो ८५ हाच भ्रांति पुन्हा शुद्ध स्वरूपावर आलेली अन्य प्रकारानें तुला पुढें सांगू परंतु मूळ स्वरूपावर हे मायेचें रूप आहे ही गोष्ट तू विसरूं नको ८६ तर, माया ही माझी स्त्री असून आद्यंतरहित, तरुण, अलौकिक व गुणवान् आहे ८७ हिचें रूप पाहूं गेलें असता, काहीं नाहीं हेंच हिचें रूप हिची आकृति फार व्यापक आहे ही अज्ञान्याच्या सन्निध असते, व ज्ञान्यापासून दूर रहाते ८८ परंतु ही माया माझ्या आत्मस्वरूपावर निजल्यामुळे आत्मसत्तेच्या सद्भावानें गर्भ धारण करते ८९ मग जीवभूत प्रकृतीच्या उदरीं आकृत अष्ट विकाररूप गर्भाची ही वृद्धि करितें ९० आत्मा व प्रकृति यांच्या संयोगापासून प्रथम बुद्धितत्त्व उत्पन्न होतें, व तीच बुद्धि बळावल्यावर मन होतें ९१ मनाची स्त्री ममता हिच्यापासून अहंकार उत्पन्न होतो, व त्याच्या योगानें पंचमहाभूतांची उत्पत्ति

महाभूताची । अभिव्यक्ति होय ॥९२॥ आणि विषयेंद्रिया गोसी । स्वभावें तव भूतासी । म्हणोनि येती सरिसी । तियेही रूपा ॥९३॥ जालेनि विकारक्षोभें । पाठीं त्रिगुणाचें उभें । तेव्हां ये वासनागर्भें । ठायेठावो ॥९४॥ रुखाचा आवाका । जैसी बीजकणिका । जीवीं बाधे उदका । भेटतखेंवो ॥ ९५ ॥ तैसी माझेनि सगें । अविद्या नाना जगें । आर घेवों लागे । अणियाची ॥९६॥ मग गर्भगोळा तया । कैसें रूप ते ये आया । तें परियेसें राया । सुजनाचिया ९७ पै मणिज स्वेदज । उद्भिज जारज । उमटती सहज । अवयव हे ॥९८॥ व्योमवायुवशें । वाढलेनि गर्भरसें । माणिजु उससे । अवयव तो ॥९९॥ पोटीं सूनि तमरजें । आगळिकां तोय तेजें । उठितां निपजे । स्वेदजु गा ॥१००॥ आपपृथ्वी उत्कटें । आणि तमोमात्रें निकृष्टें । स्थावरु उमटे । उद्भिजु हा ॥१॥ पांचा पांचही विरजी । होती मनबुद्ध्यादि साजी । ही हेतु जारजी । ऐसे जाण ॥२॥ ऐसे चारी हे सरळ । करचरणतळ । महाप्रकृति स्थूळ । तेंचि शिर ॥३॥ प्रवृत्ति पेललें पोट । निवृत्ति ते पाठी नीट । सुर योनी आगें आठ । उर्ध्वांची ॥ ४ ॥ कंठु उल्हासता स्वर्गु । मृत्युलोकु मध्यभागु । अधोदेशु चांगु । नितंबु तो ॥५॥ ऐसें लेकरूं एक । प्रसवली हें देख । जयाचें तिन्ही लोक । बाळसें गा ॥ ६ ॥ चौऱ्यांयशी लक्ष योनी । तियें कांडा पेरां सांदणी । वाढे प्रतिदिनीं । बाळक हें ॥७॥ नाना देह अवयवीं । नामाचीं लेणीं लेववी । मोहस्तन्यें वाढवी । नित्य नवें ॥ ८ ॥ सृष्टी वेगळवेगळीया । तिया करांगीं आंगोळियां । भिन्नाभिमान सूदलिया । मुदिया तेथें ॥ ९ ॥ हें एकोलतें चराचर । अविचारित सुंदर । प्रसवोनि थोर । थोरावली ११० पै ब्रह्मा प्रातःकाळु । विष्णु तो मध्यान्ह वेळु । सदाशिव सायंकाळु । बाळा यया ॥११॥ महाप्रळयसेजे । खेळोनि निवांत निजे । विषमज्ञानें उमजे । कल्पोदयीं ॥ १२ ॥ अर्जुना इयापरी । मिथ्यादृष्टीच्या घरीं । युगानुवृत्तीची करी । चोज पाउलें ॥१३॥ संकल्पु जयाचा इष्टु । अहंकारु तो विनटु । ऐसिया होय शेवटु । ज्ञानें यया ॥१४॥ आता असो हे बहु बोली । ऐसें विश्व माया व्याली । तेथ साह्य जाली । माझी सत्ता १५

**सर्वयोनिषु कौंतेय मूर्तयः संभवंति याः ।**
**तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥**

कौन्तेय, मर्त्ययोनिषु या मूर्तयः संभवन्ति, तासां योनिः महद् ब्रह्म ( अस्ति ), अहं बीजप्रदः पिता ( अस्मि ) ॥४॥

याकारणें मी पिता । महद्ब्रह्म हे माता । अपत्य पंडुसुता । जगडंबरु ॥१६॥ आतां शरीरें बहुतें । देखोनि न भेदें हो चित्तें । जे मनबुद्ध्यादि भूतें । एकेंचि येथें १७ हां गा एकचि देहीं । काय अनारिसे अवयव नाहीं । तेवि विचित्र विश्व पाहीं । एकचि हें ॥१८॥ पै उंचा नीचा डाहाळिया । विषमा वेगळालिया । येकाचि जेवीं जालिया । बीजाचिया ॥१९॥ आणि सबंधु तोही ऐसा । मृत्तिके घटु लेंकु जैसा । कां पटत्व कापुसा । नातू होय ॥१२०॥ नाना कल्लोळपरंपरा । संतती जैसी सागरा । आम्हां आणि चराचरा । संबंधु तैसा ॥२१॥ म्हणोनि वन्हि आणि ज्वाळ । दोन्ही वन्हीचि केवळ । तेवि मी गा सकळ । संबंधु वावो २२ जालेंनि जगें मी झांकें । तरि जगत्वें कोण फांके । किळेवरी माणिकें । लोपिजे काई ॥२३॥ अळंकारातें आलें । तरि सोनेपण काइ गेलें । की कमळ फांकलें । कमळत्वा मुके ॥२४॥ सांग पां धनंजया । अवयवी अवयविया । आच्छादिजे

